






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्र-साहित्य-परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारी

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका.

वर्ष १ लें.] आषाढ शुद्ध ११ शके १८५० [अंक २ रा.
गुरुवार, ता. २८ जून सन १९२८

सह वीर्यं करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु ॥

## अनुक्रमणिका



जून १९२८

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद, मुंबई.

आश्रयदाते.

श्रीमंत तुकोजीराव महाराज होळकर, सरकार इंदूर

तहाहयात सभासद.

१ रावबहादूर सरदार माधवराव विनायक किबे
२ श्री. सौ० कमळाबाई साहेब किबे
३ नामदार सर मोरोपंत वि. जोशी
४ रा. रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
६ दि. ब. कृष्णराव लक्ष्मण पावणसकर
५ रा. रा. गणेश वासुदेव मावळणकर
७ रा. रा. हणमंतराव बापूराव अत्रे

महाराष्ट्र-साहित्य-परिषद कार्यकारी मंडळ.

अध्यक्ष

श्रीमंत सरदार माधवराव विनायक किबे

उपाध्यक्ष

१ श्रीमंत सरदार संभाजीराव चंद्रोजीराव आंग्रे
२ रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर
३ रा. रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
४ रा. ब. पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी
५ रा. रा. चिंतामण विनायक वैद्य

कार्यकारी सभा

कार्याध्यक्ष

रा. रा. नारायण गोविंद चापेकर

कार्योपाध्यक्ष

प्रिन्सिपॉल जगन्नाथ रघुनाथ घारपुरे

चिटणीस

रा. रा. न. र. फाटक
रा. रा. द. गो. काळे
रा. रा. ब. माकोडे
डॉ. भा. वि. रायकर
रा. रा. य. रा. दाते

खजीनदार.

रा. रा. सुं. बा. रायकर
रा. रा. सुं. भा. वैद्य

सभासद

१ श्री. सौ. कमळाबाईसाहेब किबे
२ रा. रा. पां. वा. काणे
३ रा. रा. दा. सा. यंदे
४ " " म. रा. बोडस

[ पुढें चालू मलपृष्ठ ३ ]





# महानुभावांस सांकेतिक लिपींची आवश्यकता कां वाटली ?

(ले. वा. अ. भिडे)

महानुभाव पंथ या नांवानें आपण जो संप्रदाय ओळखतों, त्याला जयकृष्णी पंथ, महात्मापंथ, व अच्युतपंथ अशींहि दुसरीं नांवें आहेत. या पंथाची प्राणप्रतिष्ठा चक्रधरस्वामींनीं शकाब्दाच्या बाराव्या शतकाच्या अन्तिम चरणांत केली.

चक्रधरस्वामी हे मूळचे सामवेदी गुर्जर ब्राह्मण. त्यांनीं महाराष्ट्रांतील रितपुर-क्षेत्रस्थ गोविंदप्रभु नांवाच्या सत्पुरुषाचा उपदेश शके ११०७ मध्यें घेतला व याच वेळीं त्यांचें 'चक्रधर' असें नामकरण झालें.

गोविंदप्रभूंचा उपदेश घेतल्यावर चक्रधरस्वामींनीं आपला आयुःक्रम कसा चालविला याबद्दल निरनिराळे संशोधक कांहींशी निरनिराळी व थोडीबहुत विसंगत हकीकत देतात. 'हिन्दीप्रभाकर' म० मुकुन्दराज आराध्य हे आपल्या ' जयकृष्णी पंथ ' नांवाच्या पुस्तकांत सांगतात, कीं, " ( श्रीचक्रधर भगवान् ) श्री क्षेत्र ऋद्धिपुर... पहुंचे और वहां के प्रसिद्ध अवतार श्री गोविंद प्रभु से ज्ञान स्वीकार किया। एवंच संन्यास दीक्षा का अङ्गीकार किया।.... उस समय से संन्यासाश्रम के अनुसार आचरण करते हुए महाराष्ट्र देश में ही फिरते रहे।... वास्तव में संन्यास दीक्षा ग्रहण करने परही भगवान के अवतार कृत्य का प्रारंभ होता है।" ( पृ. ९ )

रा० य. खु. देशपांडे लिहितात, कीं, चक्रधरांना श. ११०७ मध्यें ईश्वरावतारी गोविंदप्रभूंचा उपदेश झाला खरा, परंतु त्या वेळीं चक्रधरांनीं संन्यासदीक्षा घेतली नाहीं, तर " श्रीचक्रधरांनीं आपल्या वयाच्या ११० वे वर्षापर्यंत संसारपथ आक्रमून संन्यासदीक्षा श. ११८५ मध्यें घेतली. व तेव्हांपासून महानुभावांचा पंथ स्थापून सरासरीं ८ वर्षें प्रसाराचें कार्य केलें व शेवटीं शके ११९३ चे सुमारास त्यांनीं बदरीकाश्रमीं प्रयाण केलें." (महानुभावी मराठी वाङ्मय, पृ.४।५).

रा. वि. ल. भावे जरा निराळीच काहाणी बऱ्याच तपशिलानें कथन करतात. त्यांच्या लेखावरून असें दिसतें, कीं, चक्रधरांनीं गोविंद प्रभूंचा उपदेश घेऊन संन्यासदीक्षा घेतल्यावर कांहीं वर्षांनीं औरंगलच्या कमळ नाईक नांवाच्या सामवेदी ब्राह्मणाच्या हंसांबा नामक सुंदर मुलीशीं विवाह करून संसार थाटला. यावर कांहीं वर्षांनीं स्वामींना पुन्हां वैराग्याची हुकी आली, व संसारावर तुळशीपत्र ठेवून ते पुनः संन्याशी झाले. हा संन्यास कांहीं वर्षें टिकला. पण अखेर देवगिरीच्या यादवांचा मांडलिक इलिचपुरचा रामदेवराव दरणा याच्या मुलीचें स्वामींनीं पाणिग्रहण केलें व तिचें 'गौरी' असें नांव ठेवलें. हा संसार

सरासरी तीन वर्षे चालला. एक दिवस चन्द्रभागेच्या पुरांत चक्रधर वाहून बुडाले म्हणून गांवांत बातमी आली. ती ऐकतांच गोरीचें देहावसान झालें. पण चक्रधर कसा तरी पुरांतून बचावून नगराला परत आला. मग पत्नीच्या मृत्यूचा वृत्तान्त ऐकतांच तो वेडा-पिसा झाला व इकडेतिकडे भटकूं लागला. अशा उन्मादस्थितींत चक्रधरस्वामींना श. ११८५ च्या कार्तिकांत श्रीदत्तात्रेयदर्शन घडलें, आणि यानंतर त्यांनीं नवीन धर्मपंथ काढला व उपदेश करीत हिंडून शिष्यसंप्रदाय जमवला. (महाराष्ट्रसारस्वत, भाग पहिला, आवृत्ति तिसरी, पृ. ५७–५९)

रा. भाव्यांनीं दिलेली हकीकत वाचली म्हणजे चक्रधरस्वामी व त्यांचा पंथ हे महाराष्ट्रीयांस सामान्यतः कां प्रिय झाले नाहींत याचा बराचसा उलगडा होतो. चक्र-धरस्वामींची चरित्रकथा एका बाबतींत ज्ञानदेवांचे वडील विठ्ठलपंत यांच्यासारखीच होती. विठ्ठलपंत असलेली बायको टाकून विरक्तीच्या भरांत, 'मला बायकोपोर कोणी नाहीं,' असें बळेंच सांगून सन्यासदीक्षा घेते झाले. पण कालान्तरानें खोटेपणाचें माप पदरीं आल्यावर त्यांना पुन्हा नाइलाजानें संसारांत पडावें लागलें. चक्रधरस्वामींच्या चरित्राचें विठ्ठलपंतांच्या चरित्राशीं संसार सोडून संन्यास घेणें आणि संन्यास सोडून पुन्हा गृहस्थ होणें, इतक्या पुरतेंच सादृश्य आहे. इतर सर्व गोष्टींत त्या दोघांच्या आचारांत फार महत्त्वाचा फरक आहे. विठ्ठलपंतांनीं संन्यासत्याग करून गार्हस्थ्यांत परतण्याचा प्रयोग एकदाच केला, तर चक्रधरस्वामींनीं तसला प्रयोग दोनदा केला, पुनर्गृहस्थ झालेल्या विठ्ठलपंतांनीं पूर्वपरिणीत वधूचाच पुनः स्वीकार केला तर स्वामींनीं प्रत्येक वेळीं नव-वधूपरिणय केला. पुन्हा गृहस्थ झाल्यावर विठ्ठलपंतांना संतति झाली व ब्राह्मणसमाजानें आपल्याला व आपल्या कुटुंबाला पंक्तिपावन करून घ्यावें म्हणून त्यांस घ्यास लागला. परंतु आश्रमपरंपरेंत माघारें पाऊल टाकणें हें अस्वाभाविक, अविचाराचें, व अनवस्था-वह आहे; तेव्हां, तुम्हांला देहदण्डावांचून प्रायश्चित्त नाहीं, असें समाजानें निक्षून सांगतांच, विठ्ठलपंतांनीं वैतागून आपला देह गंगार्पण केला. चक्रधरस्वामींचें चरित्र कांहीं निराळ्याच तेजानें प्रकाशमान झालें. ते आयुःक्रमाच्या अखेरीला खरेखरे संन्यासी झाले, आणि त्यांनीं एका स्वतंत्र संप्रदायाची संस्थापना केली, व या संप्रदायाचा वर्णाश्रमधर्मावरच जोराचा हल्ला झाला. अर्थात् वर्णाश्रमाभिमानी समाजाला हें मानवणें शक्यच नव्हतें, आणि त्यामुळें चक्रधरस्वामींचा महात्मा–पंथ त्याला अप्रिय झाला असला, तर त्यांत आश्चर्य नाहीं. तरी पण चक्रधरस्वामींचें वक्तृत्व आणि आकर्षकसामर्थ्य जबर असलें पाहिजे, यांत शंका नाहीं. त्यांनीं पैठणनगरी हें आपल्या संप्रदायाचें केन्द्रस्थान करून, आपल्या धर्मसंप्रदायाचा महाराष्ट्रांत बराच फैलाव केला, व आरंभीं आरंभीं त्यांच्या पंथांत अनेक विद्वान् ब्राह्मण सामील झाले. या विद्वान् शिष्यप्रशिष्यांनीं आपल्या पंथांतील लोकांकरितां अनेक गद्यपद्य ग्रंथ मोठ्या साक्षेपानें लिहिले. या ग्रंथांची खरी ओळख व महानुभाव किंवा महात्मापंथाचें खरें ज्ञान महाराष्ट्रीय वाङ्मयभक्तांस अलीकडे वीस वर्षेंच उपलब्ध होऊं लागलें आहे. याचें मुख्य कारण हें, कीं, हे ग्रंथ साध्या लिपींत लिहिलेले नसून

सांकेतिक लिपींत लिहिलेले आहेत. ' अक्षौ खगौ ' इ० श्लोकांत वर्णिलेल्या मिताक्षरीप्रमाणेंच महानुभावांच्या संकेतलिपींत अक्षरांची अदलाबदल करणें हीच मुख्य खुबी आहे. अशा संकेतलिपींची संख्या महानुभावपंथामध्यें जवळ जवळ तिसाला जाऊन भिडली आहे. परंतु त्यांपैकीं सुमारें ८ । १० संकेतच प्रधान आहेत, व त्यांतील कांहीं उलगडण्याच्या पद्धति रा. भावे यांनीं आपल्या महाराष्ट्रसारस्वताच्या नव्या आवृत्तींत समाविष्ट केल्या आहेत. आतां हें महानुभावीय वाङ्मय संकेतपटलाच्या आड आजपर्यन्त दडवून कां ठेवण्यांत आलें होतें, या प्रश्नाचा आजमितीस उपलब्ध असलेल्या माहितीवरून तर्क बांधावयाचा आहे.

आपल्या पंथाचे ग्रंथ संकेत–लिपींत लिहून ते इतरांपासून गुप्त राखावे असा चक्रधरस्वामींचा कधींच हेतु नव्हता. नवा पंथ स्थापणें व त्याचा लोकांत प्रसार करणें हेंच ज्याच्या जीविताचें आद्य कर्तव्य होतें, तो अशा आत्महेतुविघातक प्रकाराला कधींच संमति देताना. चक्रधरस्वामी जरी मूळचे गुर्जर ब्राम्हण होते, तरी त्यांची बहुतेक हयात महाराष्ट्रांतच गेली, त्यांचे गुरु गोविंदप्रभु हे महाराष्ट्रीयच होते, त्यांनीं आपल्या पंथाचें केन्द्रस्थान पैठण करून त्याचा व्याप महाराष्ट्रांतच मुख्यतः ताणला, आणि आपल्या धर्मसंप्रदायाची भाषाहि मराठीच ठरविली. त्यांना संस्कृत द्वेष्य नव्हतें, परंतु भगवान् बुद्धाप्रमाणेंच त्यांनीं असें ठरविलें, कीं, लोकांत आपल्या धर्ममताचा व पंथाचा प्रसार करणें तो देशभाषेनेंच केला पाहिजे; त्यावांचून आपला उपदेश व संदेश सर्वांना पोचणार नाहीं व त्यांच्या अन्तःकरणावर बिंबणार नाहीं. महानुभावीय ग्रंथरचनेला आरंभ चक्रधरस्वामी बदरिकाश्रमाकडे गेल्यानन्तरच झाला असें उपलब्ध साधनांवरून दिसतें. परंतु अशी ग्रंथरचना मुख्यत : मराठींतच व्हावी असा त्यांचा मनोदय होता असें मानण्यास चांगला आधार आहे. चक्रधर स्वामींचें पट्टशिष्य नागदेवाचार्य ऊर्फ भट्टोबास ( भट्टोव्यास ) आणि महीबास. पैकीं महीबासांनीं स्वामींचें ' लीलाचरित्र ' गद्यांत लिहिलेलें आहे. त्यांत स्वामींच्या तोंडचीं शेंकडों सूत्रवचनें समाविष्ट केलीं आहेत. हीं सर्व वचनें संकलित करून त्यांस गीर्वाणवाणीचें रूप द्यावें, असें भट्टोबासांचा शिष्य केसोबास ( ऊर्फ केशवराजसूरी ) यांच्या मनांत आलें. तेव्हां केसोबासांनीं तसें करण्याला भट्टोबासांची अनुज्ञा मागितली. पण ' भट्टोबास नागदेवाचार्य ' यांनीं या गोष्टीचा निषेध केला. ते म्हणाले, " नको, गा केशवदेया. येणें माझिये स्वामीचा परिवारु नागवैल कीं ...... सकळांसी अल्पायासें ब्रम्हविद्याचियें ठायें गिवसितां येवौनि परमेश्वरलाभुधमा वाबु होआवा. म्हणौनिचि महाराष्ट्रीयें निरोपिलें कीं, गा. एरवीं, सर्वज्ञा काई देववाणी निरोपूं न लाहे कीं, गा ? भणौनि, केशवा, संस्कृत सूत्रबद्ध प्रकरण न करीं तूं कीं. " यावरून हें अगदीं ढळढळीत स्पष्ट होतें कीं, महात्मापंथाच्या आद्य प्रवर्तकांचा हेतु आपले ग्रंथ व पंथरहस्य सामान्य लोकांपासून गुप्त ठेवावयाचें नव्हतें. आणि खरोखरच चक्रधरस्वामींच्या मागें दोनतीन पिढ्यांपर्यन्त म्हणजे सुमारें पाउणशें वर्षेंपर्यन्त, महानुभावीय वाङ्मय साध्या लिपींतच लिहिलेलें असे.

महानुभाव वाङ्मयांत प्रथमतः सांकेतिक लिपी शिरली, ती शके १२७५ च्या सुमारास. पहिला संकेत रवळोव्यास ऊर्फ राघवव्यास यानें सिद्ध केला. या लिपीस 'सकळी लिपी' हें नांव आहे. यानन्तर महानुभावांच्या निरनिराळ्या पीठांनीं निरनिराळ्या संकेतांची उभारणी केली. अशा प्रकारें संकेतांचें जाळें पसरून त्यांत महानुभावीय वाङ्मय असें गुरफटलें, कीं, आजमितीस साध्या लिपींत लिहिलेली कोणत्याहि महत्वाच्या आद्य महानुभावी ग्रंथाची जुनी प्रत उपलब्ध नाहीं. ( रा. य. खु. देशपांडेकृत ' महानुभावीय मराठी वाङ्मय' पृ. ५०)

आद्य प्रवर्तकांच्या मूळ हेतूशीं विसंगत असा हा प्रकार कां घडला, याचें कारण कोणीहि खात्रीलायक देऊं शकत नाहीं. कै. रा. भावे लिहितात, कीं, होईल तेवढा आपल्या पंथाचा प्रसार करावा "अशी मूळ स्थिति असतां पुढें आपला धर्म व आपलीं धर्मपुस्तकें आत्मपंथीयांशिवाय इतरांस सुगम असूं नयेत या बुद्धीनें गौप्यता सुरू झाली; व संकेतलिपी प्रचारांत आली" (म. सा. पृ. ६७). रा. देशपांडे तर्क करतात, कीं, "नाथपंथ इत्यादि इतर पंथीयांकडून या महानुभाव पंथास उपसर्ग होत असावा व या किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें आपली ब्रह्मविद्या, आपलीं मतें आणि धर्ममतें इतरांपासून गुप्त ठेवण्याची आवश्यकता या पंथीयांस नागदेवाचार्यानंतर (शके ११५८–१२२४) पन्नास वर्षांच्या आंतच भासूं लागली." (महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. ५०). हिंदीप्रभाकर म० मुकुन्दराज आराध्य, हे आपल्या खासगी पत्रांत प्रतिपादितात, कीं, "ज्याप्रमाणें आर्यसमाजाच्या प्रारंभी कालांत प्रत्येक शास्त्री, पंडित, विद्वान् व आस्तिक म्हणविणाराकडून "आर्यसमाजी" म्हणविणाराचा द्वेष केला जात होता, किंवा आजहि पूर्ण कर्मठांकडून केला जातो, त्याचप्रमाणें महानुभाव पंथीयांचाहि अशाच अध्यात्मशून्य, पण बाहेरून कर्मठमालिकेंतील प्रसिद्ध मनुष्यांकडून अतोनात द्वेष केला जात होता, इतकेंच नव्हे, तर अधिकारी वर्गास खोट्यानाट्या चाहड्या सांगून त्यांची विटंबनाहि करण्यास कमी केलें जात नसे. कांहीं धार्मिक मतभेदहि इतके तीव्र आहेत, कीं ते वरील कर्मठांच्या गळीं उतरणें जड वाटतें. अशा अनेक कारणांवरून सांकेतिक लिपी प्रचारांत आली आहे, हें अगदीं त्रिकालाबाधित सत्य आहे."

कोणताहि धर्मपंथ नवीनच निघाला म्हणजे त्याचा आरंभीं लोकांकडून छळ होण्याचा संभव असतो. चक्रधरस्वामींनीं जो पंथ स्थापन केला, तो महाराष्ट्रीयांस प्रिय नसणें अगदीं साहजिक होतें. स्वामींनीं चातुर्वर्ण्यावर हल्ला केला, आणि सामान्यतः महाराष्ट्रीय समाज तर वर्णाश्रमधर्माचा अभिमानी. तेव्हां कर्मठांकडून स्वामींच्या अनुयायांचा कांहींतरी छळ झाला असेलच. पण त्या छळानें पंथाची गळचेपी झाली असें दिसत नाहीं. उलट चक्रधरस्वामींच्या संप्रदायांत चांगले विद्वान् ब्राह्मण सामील झाले, व त्यांनीं आपले धर्मग्रंथ निर्माण करण्यास जोमानें सुरुवात केली. ज्या वेळीं या पंथाची स्थापना झाली, त्या वेळीं महाराष्ट्रांत मराठेशाही होती, म्हणजे सत्ताधारी महाराष्ट्रीय

होते; तरी पण महानुभाव धर्मप्रसारक व त्यांचे ग्रन्थ यांचा नायनाट करण्यांत आला नाहीं, आणि महानुभावीयांसहि आपलें धर्मरहस्य व ग्रंथ गुप्त राखण्याची आवश्यकता भासली नाहीं.

शिवाय, वास्तविक पहातां, महात्मापंथांत असें विलक्षण कांहीं नाहीं, कीं, महाराष्ट्रीयांनीं बेफाम होऊन त्यास रसातळास नेण्याचें कंकण बांधावें. चक्रधरस्वामी हिंदूधर्मांतून फुटून गेले नव्हते. ते वेदाला मान देत. त्यांचें तत्त्वज्ञान द्वैतमतानुसारी होतें. त्यांनीं दत्त व कृष्ण हींच आपल्या पंथाचीं दैवतें मानलीं होतीं. मात्र ते स्वतःला परमेश्वराचा पूर्णावतार समजत आणि ईश्वराप्रमाणें शिष्यशिष्यिणींकडून सेवा घेत. परंतु आपल्या समाजांतील सर्वच गुरुसंप्रदायांत कमीजास्त प्रमाणांत हाच प्रकार आढळतो. ज्ञानदेवीच्या तेराव्या अध्यायांतील 'आचार्योपास्ती' वरील ज्ञानदेवांचें व्याख्यान वाचलें म्हणजे श्रद्धाळु गुरुसेवा कोणत्या अतिकोटीला जाऊं शकते हें सहज लक्ष्यांत येईल. चक्रधरस्वामींनीं 'चातुर्वर्ण्ये चरेद् भैक्षम्' असें अनुशासन महानुभावीय संन्याशांस घालून जातिभेदाची कोंडी फोडल्यासारखें केलें, तरी पण महानुभाव गृहस्थ वर्णाश्रमधर्मासच चिकटून राहिले व त्यामुळें चातुर्वर्ण्यावरील टोला बराच लुला पडला. म. मुकुंदराज आराध्य 'जयकृष्णी पंथ' या पुस्तकांत म्हणतात, "गृहस्थी के गार्हस्थ्यसंबंधी जितने भी कर्म हैं वह सब वैदिक रीति के अनुसार ही करने चाहियें...जबतक हमजन समुदाय से पृथक् नहीं हो सकते...तबतक लौकिक तथा वैदिक रीतियों का पालन करना निहायत जरूरी है, इसके पालन करने में टालमटोल करना मूर्खता समजी जायगी" (पृ. १७–१८). एका महानुभावीय महन्ताचे हे उद्गार वाचले म्हणजे जातिभेदाची मगरमिठी महानुभावांनाहि सुटली नाहीं असें पदरीं पडतें. चक्रधरस्वामींनीं इतर सर्व देवतांस दुय्यम गणून, दत्त व कृष्ण यांनाच पूर्णावतारी दैवतें गणलीं. परंतु हीहि बाब हिंदूंच्या अंगवळणींच पडलेली होती. म. मु. आराध्य सांगतात कीं, "सनातन धर्मान्तर्गत अन्य सांप्रदायिक मतों में उपासना करने की विधिमें जो गड्बड् चौथ मची हुई है वह शास्त्रसंमत नहीं कही जा सकती. अनेक देवीदेवताओं की प्रतिमायें एकत्र कर कभी शंकर, कभी राम, कभी कृष्ण, कभी दुर्गा, और कभी हनुमान् की मूर्ति की उपासना करते नजर आते हैं. इ०" या सर्व लिहिण्याचा मतलब इतकाच कीं महानुभाव संप्रदाय एका ईश्वराकडेच वळल्यामुळें व्यभिचारी व भ्रमिष्ट भक्तीला सोकावलेल्या महाराष्ट्रीयांनीं महानुभावांचा छळ केला. परंतु असा उपदेश करणारे पंथ महाराष्ट्रांत अनेक होते व आहेतहि. प्रत्यक्ष ज्ञानदेव आपल्या ज्ञानदेवींत वर्णन करतात, कीं,—

कुणवटु कुळवाडी तेसा आनु देवो मांडी,
आदिलाची पिंडी करी तेयातें.
तेया गुरुमार्गा टेंके, जेयाचा सुगुरुवा देखे,
तरि तेयाचा मंत्रु शिखे, एर नेघे.
माझी मूर्ति आपजवी, ते घराच्या कोनीं बैसवी,

आणि देवादेवी यात्रे जाएं.
नीच आराधन माझें, काजीं कुलदेवतीं भजे,
पर्वविशेषें भोजे पूजा आन.
माझें अधिष्ठान घरीं, आणि वौसे आनाचे करी,
पितरकार्यअवसरीं पितरांचा होए.
एकादशीच्या दिशीं जेतुला पाडु आम्हांसी,
तेतुलाचि नागांसी पंचमीसी.
चौथी मोटकी पाहे, आणि गणेशाचाचि होए,
चाउदशीं म्हणे, 'माये, तुझाचि, वो दुर्गे.'
नवमीतें मांडी आणि वैसे नवचंडी
आदित्यवारीं वाढी भैरवां भरीं.
पाठीं सोमवारु पावे, आणि बेलेंसीं लिंगा धावे.
ऐसे एकलाची आघवे जोगावी जो,
अखंड भजन करी, उगा न राहे क्षणभरी;
आघवेनि गांवद्री ऐहेव जैसी,
तैसेनि जो गा भक्तु वेखासीं सैरा धावतु,
जाण अज्ञानाचा मूर्तु अवतारु तो. (१३।८१२-२३)

हे उद्गार गीतेवरील आपल्या भाष्यांत नाथपंथी ज्ञानदेवांचे आहेत, आणि ते वर दिलेल्या म० आराध्यांच्या उद्गारांपेक्षां मुळींच कमी जहाल नाहींत. मग असें असतांनाहि जर ज्ञानदेवी किंवा गीता सनातन धर्मीयांपासून बचावण्याकरितां संकेताच्या कडीकुलपांत ठेवावी लागली नाहीं, इतकेंच नव्हे, तर ते ग्रंथ आजपर्यंत उच्च वर्णांना व शिष्ट वर्गांनाहि मान्य होऊन बसले आहेत, तर तींच मतें महानुभावांनीं उपदेशल्याबरोबर त्यांची महाराष्ट्रीयांस इतकी ओकारी यावी व त्यांच्या पंथावर त्यांनीं इतका सरसहा घसरा करावा, कीं त्या पंथाचे ग्रंथ केवळ सांकेतिक लिपीच्या कडेकोट बंदोबस्तानें जगवले जावे, असें मानणें युक्तीस धरून नाहीं. बौद्ध, जैन, लिंगायत, वगैरे राजरोस रीतीनें वर्णाश्रमधर्मविशिष्ट हिंदुसमाजांतून फुटून बाहेर पडलेल्या कट्टया पंथांचें वाङ्मय उजळ माथ्यानें वावरत असतां, महानुभावांच्या जुन्या वाङ्मयावरच मात्र अजब गहजब होऊन संकेतांच्या बुरख्यांत त्यास सपशेल गुरफटून घ्यावें लागलें व आपलें नखाग्रहि उघड्या स्वरूपांत दिसणार नाहीं, अशी चक्कड तजवीज करणें भाग पडलें, हें खरें मानावें तरी कसें?

वास्तविक प्रकार असा आहे, कीं, महानुभावपंथाची स्थापना होऊन पाउणशें वर्षें झालीं, त्या वेळीं महाराष्ट्रांत मोठीच राजकीय व धार्मिक अशी दुहेरी क्रान्ति घडून आली. पहिल्या क्रान्तीनें मराठ्यांचा शासनाधिकार नष्ट होऊन ते स्वदेशांतच दुर्बळ दास बनले. मुसुलमानांची सत्ता सर्वत्र पसरून मराठे अगदींच निस्तेज झाले. आणि याच संधीस महानुभावांचें लिखाण संकेतावगुंठित होण्यास सुरवात झाली. अर्थात् या संकेताला कारण मुसुलमानांची सत्ता असावी, हिंदूंची हतवीर्यता नसावी,

असें अनुमान ओघानेंच फलित होतें. मुसुलमानांचा हिंदुधर्मावर विशेष डोळा, तेव्हां महानुभावांना इतर हिंदूंप्रमाणें सत्ताधारी मुसुलमानांचा छळ सोसावा लागणें साहजिक होतें. महाराष्ट्रीय सत्ताधारी असतांनाहि जो महानुभावपंथ अस्तित्वांत आला, तरारला व ग्रन्थरूपी फुलांफळांनीं डवरला, तोच महाराष्ट्रीयांच्या पडत्या काळांत त्यांच्या भीतीनें म्लान होऊन वठावा व संकेतरूपानें दडून राहावा, हें कार्यकारणभावाला व कोण-त्याहि तर्कपद्धतीला साजणारें नाहीं. मुसुलमानांपासून होणारा अत्याचार व छळ टाळ-ण्याकरितां महानुभावांनींच संकेताचा अंगीकार करून, ' आम्हीं हिंदूंपासून वेगळे आहों, ' असा बहाणा केला. चाहाड्याचुगल्या होऊं नयेत म्हणून त्यांना आपले लिपिसंकेत हिंदूंपासूनहि गुप्त ठेवणें क्रमप्राप्त होतें. याचा अर्थ महानुभाव मुसुलमानांत सामील झाले असा मुळींच नाहीं. फक्त त्यांनीं आपले साध्या लिपींत लिहिलेले जुने धर्मग्रंथ नष्ट करून ते सर्व संकेतलिपींत लिहिले व नवीन ग्रंथहि सांकेतिक लिपींत लिहिण्यास सुरुवात केली. हे संकेत इतर हिंदूंस तसेच मुसुलमानांसहि अगम्य असल्या-मुळें, 'आम्हीं हिंदूंपासून वेगळे आहों' ही महानुभावांची बतावणी खपली व त्यांच्या मागील मुसुलमानांचा ससेमिरा बराच सुटला, यांत शंका नाहीं. वरील विचारसरणी नुसत्या तर्कानें बसविली आहे असें नव्हे, तर तिला पोषक असे दोन भक्कम आधारहि आहेत. ज्ञानदेव—नामदेवांपासून तों एकनाथांपर्यन्तच्या म्हणजे सुमारें अडीचशें वर्षांच्या अवधींत महाराष्ट्रीयांनीं लिहिलेले ग्रन्थ जवळजवळ मुळींच उपलब्ध नाहींत. यावरून दोनच अनुमानें निघतात. एक, या काळांतील दुरवस्थेंत महाराष्ट्रीयांच्या हातून ग्रन्थ-रचनाच झाली नाहीं. किंवा दुसरें, त्यांची ग्रन्थरचना मुसुलमानांनीं सफाई बुडवून टाकली. तिसरें कोणतेंहि अनुमान निघणें शक्य कोटींतील नाहीं. पण याच काळांत महानुभावांच्या हातून जंगी लिखाण झालें व तें सांकेतिक लिपींत आज उपलब्ध आहे. तेव्हां महानुभावांना हा काळ स्वास्थ्याचा — चांगल्या योगक्षेमाचा — गेला असावा, असें सरळ फलित होतें. हिंदूंपासून फटकून व मुसुलमानांपाशीं जमतें घेऊनच असा योगक्षेम चालणें महानुभावांस त्या काळीं शक्य होतें. महानुभावांनीं मुसुलमानांशीं अशा मनमिळाऊपणानें स्वतःला निर्भय केलें; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं अन्य मार्गांनींहि आपलें कल्याण करून घेतलें हें ऐतिहासिक सत्य रा. वि. ल. भावे यांनीं आपल्या महाराष्ट्र—सारस्वताच्या तिसऱ्या आवृत्तींत नमूद केलें आहे. रा. वि. ल. भावे लिहितात, "मूर्तिपूजकांबद्दल मुसुलमान राज्यकर्त्यांच्या मनांत अखंड वैषम्य होतें आणि ते मूर्तिपूजकांना तुच्छ व रानटी मानीत. अर्थात् जे मूर्तिपूजक नव्हते, त्यांच्याविषयीं द्वेषाची तीव्रता तितकी कडक नव्हती. त्यांना ते नरमपणानें वागवून जवळ करीत. मुसुलमान राजवंशांतील एका राजाजवळून मुनीव्यास—पूर्वाश्र-मींचे पंडित कमळाकर अयाचित कोठी या उद्योगी व पाताळयंत्री पुरुषानें एक आज्ञा-पत्राचें फर्मान मिळविलें आणि या आज्ञापत्राच्या जोरावर त्यानें सर्व महाराष्ट्रभर महानु-भावपंथाचे 'ओटे' ऊर्फ पूजास्थानें बांधलीं. अनेक ठिकाणीं हे 'ओटे' महाराष्ट्रीय देवळांच्या आवारांत बीड, पैठण, आपेगांव, फलटण, त्र्यंबक, मढ, पिंपरी, अरणगांव,

भिंगार, रामेश्वर ऊर्फ रामदरा, जोगेश्वरी, वेरूळ वगैरे सारख्या शहरांतून तर प्राचीन देवालयांत बांधणें त्यास अगत्याचें वाटलें." (पृ. ६९). यावर रा. भाव्यांनीं 'अन्वय-स्थळांतील' एक उतारा टीपेंत दिला आहे, तो असा–'कुमरें रेमाइसाचे मुनींव्यास त्यांहीं उभये गंगातीरी स्थानमात्र ओटे घातले. ते रायाचेनि बळें. हा मार्गासी उपयोगू तेयांचा.' यानंतर रा. भावे पुढें सांगतात, कीं, "सर्वांना अप्रिय अशा औरंगजेबाच्या जेजीयाची (डोईपट्टीची) महानुभावांस त्या बादशहाकडून माफी मिळाली होती. सर्व हिंदूंवर लादल्या गेलेल्या या कराची ज्यांच्यावर अंमलबजावणी झाली नाहीं व ज्यांना या हिंदूंवरील जेजियांतून वगळले ते हिंदू नाहींत अशी समजूत महाराष्ट्राची झाली असावी. समजूत इतकेंच नव्हे तर या महानुभावांना ज्या सनदा मुसुलमानांकडून मिळाल्या आहेत त्या सनदांत ते हिंदूंपेक्षां निराळे आहेत असा स्पष्ट ध्वनी आहे. व तो त्या कालीं मान्य केला गेला आहे." (पृ. ७०). ही औरंगजेबानें दाखवलेली समलत अर्थात् इ. स. १७ व्या शतकांतील होय. परंतु मुसुलमान चौदाव्या शतकांत महाराष्ट्रांत घुसून हातपाय ताणून अरेराव झाले, तेव्हांपासूनच जर महानुभाव "आपण हिंदूंपासून भिन्न आहों," अशी संपादणी न करते, तर त्यांना सतराव्यांत तशी संपादणी कधींच करतां आली नसती, हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. महानुभावांनीं सांकेतिक लिपि स्वीकारून आपणांस हिंदूंपासून वेगळें करून सवता सुभा उभारण्याची जी युक्ति योजिली ती केवळ आपद्धर्म म्हणून स्वसंरक्षणाकरितांच होय यांत शंका नाहीं. पुढें जसजसा कालावधि लोटत चालला, तसतसे कांहीं महानुभावी ग्रन्थ साध्या लिपींतहि लिहिण्यांत येऊं लागले. विष्णुदासनाम्याचें महाभारत, नवरसनारायणाचें भारत, शहामुनीचा सिद्धान्तबोध वगैरे ग्रन्थ साध्या लिपींत महाराष्ट्रांत वावरत होते. हल्लीं तर आपले सर्वच ग्रंथ महाराष्ट्रीयांना समजावे व या पंथाविषयींची महाराष्ट्रीयांची आढी नितळ व्हावी म्हणून म० गोपीराज, मुकुंदराज आराध्य, वगैरे महानुभाव जीवाभावानें प्रयत्न करीत आहेत व त्यांस पूर्ण यश यावें अशी आमची मनापासून इच्छा आहे. असो, वर सांगितलेल्या आंपद्धर्मन्यायानें महानुभावांनीं पतकरलेल्या विशिष्ट दिशेमुळें उच्च व शिष्ट वर्णांतील लोक त्या पंथांत सामील होण्याचें चौदावे शतकापासून उत्तरोत्तर कमीच होत गेलें.

मुसुलमान महाराष्ट्रांत उतरण्यापूर्वीच बरींच वर्षे महाराष्ट्रीय समाजांत एक प्रचंड सामाजिक व धार्मिक क्रान्ति घडून येत होती, मुसुलमानांच्या हैदोसानें या क्रान्तीला पुढें अधिकच बळ चढलें. बौद्ध, जैन व लिंगायत, यांच्याबरोबर झगडतांना वैदिकधर्मानुसारी जातिविशिष्ट समाज टेंकीस आला होता. हीन गणलेल्या जाति समाजांतून फुटून जात होत्या व उच्च मानलेल्या जातींतहि विस्खलितपणा येत होता. कर्मठांचें धाबें दणाणून गेलें होतें. पण हट्टी कर्मठांची संख्या दिवसानुदिवस कमीच होत चालली, आणि समाजाला लागलेली ही ओहोटी बंद केली पाहिजे, व त्यासाठीं हीन गणलेल्या जातींस जवळ ओढून, ओंजारूनगोंजारून, त्यांसहि धर्माच्या बाबतींत

मनाचें समाधान व जन्माचें सार्थक करण्याचा कांहींतरी मार्ग दाखविला पाहिजे अशी भावना सामान्यतः उच्च वर्णांतहि सळसळूं लागली होती. याच भावनेनें नाथसंप्रदाय, वैष्णवपंथ, शाक्तमार्ग, महानुभावपंथ, इत्यादि धार्मिक व सामाजिक चळवळींचा उदय झाला. हे सर्व पंथ असें मानतात, कीं, तत्त्वदृष्ट्या जातिभेदाला ठावठिकाण नाहीं, ईश्वरापुढें सर्व मानव एकाच जातीचे आहेत, आणि भक्तिभावानें ईश्वरसेवा केली असतां तो सर्वांवर सारखाच प्रसाद करतो. परंतु सामाजिक व्यवहारांत व गृहस्थाश्रमांत सर्वांनीं वर्णाश्रमधर्माचे निर्बंध पाळून जनराहटीप्रमाणें शुद्ध अन्तःकरणानें वागावें. पुढें महानुभावपंथ जेव्हां हिंदूंच्या पुऱ्यांतून फुटल्यासारखा भासूं लागला तेव्हां उच्चवर्णीय गृहस्थ महानुभावांची गळचेपी होऊं लागली व त्यांनीं महानुभावपंथाला जरासें वळण देऊन त्याला गुरुसंप्रदायाचें किंवा दत्तसंप्रदायाचें स्वरूप दिलें. ते आपल्या नांवापुढें 'महानुभाव' हें बहुमानार्थ बिरुद लावण्यासहि हरकत घेत नसत असें दिसतें; मात्र चक्रधरस्वामींनीं स्थापलेल्या पंथांत ते सामील होत नाहींसे झाले. तुकारामाचे गुरु चैतन्यस्वामी यांच्या सनदेंत त्यांच्या नांवापुढें 'महानुभाव' किंवा 'मानभाव' हें बिरुद आढळतें; परंतु ते महानुभावी नव्हते, निदान त्या शब्दांत कांहीं निंदाव्यंजक अर्थ मानतां येत नाहीं. निरंजन माधवांनीं आपल्या पत्नीस आपल्या संप्रदायाचा इतिहास व आत्मचरित्र सांगितलें होतें व तें त्यांनीं आपल्या शिष्याकडून प्रकट करविलें आहे. त्यांत ते एक ठिकाणीं म्हणतात, "शैव शांभव वैष्णव। गाणपत्य सौर शाक्त महानुभाव। घरा येतां मानिजे देव। भेदमत्सर त्यागोनी॥ (सांप्रदायपरिमळ, ५।१२८). यावरून महानुभावपंथाचे उघडउघड महन्त झालेले जे सत्पुरुष संन्यासी भिक्षु होते, त्यांना शैव, वैष्णव, सौर, इत्यादिकांप्रमाणेंच मानार्ह गणलें जात असे. परंतु जातिहीन पंथांत निरनिराळ्या मानसिक संस्कृतींचीं, व उन्नतीचीं व आचाराचीं, माणसें संन्यासदीक्षा घेऊन शिरलीं म्हणजे सांवळागोंधळ माजण्याचा संभव फार उत्पन्न होतो. वर सांगितलेल्या कारणामुळें उच्चवर्णीय गृहस्थ सत्पुरुष महानुभावपंथांत जाण्याचे बंद झाल्यामुळें दिवसानुदिवस त्या पंथांत हीन संस्काराच्या माणसांचा भरणा जास्त भासूं लागला. तरुण स्त्रीपुरुष संन्यासदीक्षा घेऊन मिरवूं लागल्यामुळें गडबडगुंड्यांचे प्रवाद पसरूं लागले. तरीपण त्या पंथांतील खऱ्या सन्त महन्तांना योग्य मान द्यावा असेंच धोरण महाराष्ट्रीय भक्तमंडळींचें होतें यांत शंका नाहीं, व आजमितीस तेंच धोरण त्यांनीं कायम ठेविलें आहे.

महाराष्ट्रांतील गुरुसंप्रदायांत किंवा दत्तसंप्रदायांतहि अनेक पोटभेद आहेत. परंतु त्यांतील एक पोटभेद महानुभावपंथाची प्रत्यक्ष शाखा आहे यांत मुळींच शंका नाहीं. महानुभाव युगभेदानुसार परमेश्वराचे चार अवतार मानतात—कृतांतला हंस, त्रेतांतला दत्त, द्वापारांतला कृष्ण, व कलींतला चक्रधर. दत्तसंप्रदायी पहिले तीन अवतार मानतात, पण दत्तमहामुनीला प्रामुख्य देतात; आणि चक्रधराऐवजीं प्रत्येक दत्तसंप्रदाय आपापल्या आद्य प्रवर्तकाला तो मान देतो व त्याला श्रीदत्तमहामुनीपासून उप-

देश झाला अशी श्रद्धाबुद्धि बाळगतो. एकनाथस्वामी आपली गुरुपरंपरा देतात ती अशी–दत्तात्रेय< जनार्दन<एकनाथ. निरंजन माधवांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणें आढळते–दत्तात्रेय<विमलानंद<अमृतानंद<ब्रह्मानंद<विमलानंद <सच्चिदानंद<ब्रह्मानंद< लक्ष्मीधर< निरंजन. महानुभावपंथाचा दत्त एकमुख व द्विभुज आहे. या पंथापासून निघालेल्या दत्तसंप्रदायाची दत्तमूर्तिहि अशीच आहे आणि हा दत्तावतार परमेश्वराचा म्हणजे महाविष्णूचा गणलेला आहे. निरंजन माधव सांप्रदायपरिमळांत सांगतात:–

जो आदिगुरु नारायण क्षीराब्धिवास शेषशयन
जो धराइंदिरेचा रमण अखंड पूर्ण अद्वय जो ४
तोचि स्वस्वरूप बोधनार्थ हंस-दत्त-शिवादि स्वरूपें घेत
ब्रह्मकुमरादिकां बोधीत ब्रह्मतत्व तें अकलंक. ८
...जें पद अनंत तेचि पावती सदोदित
तद्बोधनार्थ स्वयें घेत गुरुरूपें अमित प्रतियुगीं. १२
यांमाजीं मुख्य दत्तमुनी. जो संभवला अनुसूयागर्भरत्नीं
अत्रितपाचें फळ भवसेनी जगतारक तो आदिविष्णु. १३
अक्षमालाकमंडल उभयहतीं शोभे विमल
हें निदर्शन कीं मज्जप निर्मळ करिता फळ त्या अमृत मी दाता. १५
माथां विलासे जटाजूट अत्यंत विमल हेमपिंगट
मंदस्मितें वोष्टपुटें शोभती नेत्र कारुण्यें. १६
वाराणसीपुरीं वसणं कोल्हापुर तें जपस्थान
मातापुरीं भिक्षाटन सह्याद्रिशयन सदोदित. १७

(उद्गार २)

हें दत्तात्रेयमुनींचें वर्णन महानुभावपंथांतील दत्तमूर्तीशीं हुबेहूब जुळतें आहे.

असो, अशा प्रकारें गृहस्थाश्रमी उच्चवर्णीयांनीं महानुभाव पंथांतून फुटून स्वतंत्र गुरुसंप्रदाय चालू केल्यावर चक्रधरस्वामींचा महानुभावपंथ बलहीन झाला, आणि त्या पंथानें सांकेतिक लिपीचा अंगीकार करून आपलें धर्मरहस्य व धर्मग्रंथ गुप्त ठेवल्यामुळें त्याच्याविषयीं समाजांत अज्ञान व कुकल्पना पसरूं लागल्या. आपला समाज टिकवण्याकरितां या पंथानें जो संकेतलिपिप्रचार व गुप्तपणा कवटाळला तोच अन्तीं लोकदृष्टीनें त्याला हीनत्व देण्याला कारण झाला. परंतु आजमितीस महानुभाव या हीनपणांतून बाहेर येण्यास खटपट करीत आहेत, आणि खरा प्रकार कळल्यामुळें महाराष्ट्रीयहि या खटपटींत त्यांस सहानुभूतिपूर्वक साह्य करतील असा रंग दिसत आहे. हें उभयपक्षींहि इष्टच आहे.

---

# शास्त्रीय परिभाषा

लेखांक २

लेखक- कृष्णाजी विनायक वझे, नाशीक

शास्त्रांची परिभाषा व त्यांच्या एकसूत्रतेचें विवेचन करण्यापूर्वी हिंदु संस्कृतींत समाविष्ट होणाऱ्या सर्व शास्त्रांची सामान्य कल्पना व मांडणी यांचें दिग्दर्शन केलें पाहिजे. एकंदर ज्ञान व त्याचे विभाग यांजकडे पाहण्याची पाश्चात्यांची दृष्टि निराळी असून त्यांजकडे पाहण्याची हिंदु लोकांची दृष्टि निराळी आहे. हिंदुलोकांच्या सर्व शास्त्रांचें केंद्रीकरण झालेले असून पाश्चात्यांच्या शास्त्रांचें असें केंद्रीकरण अद्याप व्हावयाचें आहे इतकेंच नव्हे तर त्यांचीं कांहीं; शास्त्रें सिद्धांतस्थितीला पोंचलीं नसल्यामुळें 'शास्त्र' या संज्ञेला सुद्धां पात्र झालेलीं नाहींत. केंद्रीकरणामुळें विचारांना जें एक तेज व स्थैर्य येतें तें पाश्चात्य शास्त्रांत अद्याप आलेलें नाहीं हें पुढील विवेचनावरून कळेल.

हिंदुशास्त्रकारांनीं एकंदर जाणीवेचें ज्ञान, विज्ञान व संज्ञान असे तीन प्रकार केले आहेत. दुसऱ्या कशाचीही अपेक्षा न ठेवतां केवळ आपल्याआंच जी जाणीव होते तिचें नांव 'ज्ञान'; विषय व इंद्रियें यांचा संयोग झाल्यामुळें जी जाणीव उत्पन्न होते तिचें नांव विज्ञान; ज्ञान व विज्ञान यांच्या संयोगानें जी जाणीव उत्पन्न होते तिचें नांव संज्ञान. एकांतांत शांतपणें विचार करीत असतांना किंवा स्वप्नांत जी जाणीव असते तें 'ज्ञान' होय; डोळे वगैरे पांच ज्ञानेंद्रियें यांच्या सहाय्यानें वर्ण, गंध, रस वगैरे जी जाणीव उत्पन्न होते तिचें नांव विज्ञान; व कोणी मनुष्य रडतांना पाहून याला दुःख झालें असावें अशी जी जाणीव तिचें नांव 'संज्ञान'. वेदान्त व योग हीं दोन शास्त्रें ज्ञानाचा विचार करणारीं आहेत; सृष्टींतील घडामोडींचा विचार करणारीं शास्त्रें 'विज्ञान' या सदरांत येतात व मानवी समाजांतील व्यवहार हा संज्ञानमय आहे.

विज्ञानांत समाविष्ट होणाऱ्या शास्त्रांचे (१) नियमप्रधान (२) अनुभवप्रधान व (३) दक्षताप्रधान असे तीन प्रकार होतात. भाषा, गणित व धर्म हीं तीन शास्त्रें नियमप्रधान आहेत. यांतील प्रत्येक बाब ठरलेल्या नियमांप्रमाणें चालते व यांच्या परिशीलनानें मनुष्य सुशील होतो. पदार्थविज्ञान रसायन व यंत्र हीं तीन शास्त्रें अनुभवप्रधान आहेत. यांतील प्रत्येक बाब प्रयोग करून अनुभवानें सिद्ध केलेली असते. या शास्त्रांच्या अभ्यासानें मनुष्य चतुर होतो. ज्योतिष, वैद्यक व शिल्प हीं तीन शास्त्रें दक्षताप्रधान आहेत. यांतील प्रत्येक बाबीचा फार काळजीपूर्वक अनेक कार्यकारणपरंपरा पाहून विचार केलेला असतो. या शास्त्रांच्या अध्ययनानें मनुष्य सावध होतो. नियमप्रधानशास्त्रांतील चूक केवळ विचारांत असते, अनुभवप्रधानशास्त्रांतील चुकीचा ठरलेला परिणाम होतो परंतु दक्षताप्रधानशास्त्रांतील चुकीची कारणपरंपरा किती लांब जाईल हें सांगतां येत नाहीं.

वेदांतशास्त्र एकविध, योगशास्त्र द्विविध, भाषाशास्त्र त्रिविध, गणितशास्त्र चतुर्विध, धर्म पंचविध, पदार्थविज्ञान षड्विध, रसायन सप्तविध, यंत्र अष्टविध, ज्योतिष नवविध, वैद्यक दशविध, शिल्प अष्टादशविध व व्यवहार अनेकविध आहे.

शास्त्राचे विद्या किंवा विचार व कला किंवा आचार असे दोन भाग पडतात. काम उत्तम करतां येऊन त्याचें सशास्त्र व सोपपत्तिक विवेचन करतां येणें म्हणजे 'विद्या'. या भागांत त्या शास्त्रांतील प्रमेयांचा केवळ तात्विक दृष्ट्या विचार केलेला असतो. मुक्यालासुद्धां जें करून दाखवितां येतें त्याचें नांव 'कला'. या भागांत शास्त्रीय प्रमेयें प्रत्यक्ष व्यवहारांत कशीं आचरावीं हें दाखविलेलें असतें.

विद्या हा शब्द विद् धातूपासून उत्पन्न झाला आहे व त्या धातूच्या अर्थाप्रमाणें विद्या, गुरु, शिष्य, साध्य, पदवी व वर्तनक्रम यां प्रत्येकांचे चार चार प्रकार होतात. ते खालीं दिल्याप्रमाणें.

| धात्वर्थ | विद्येचें नांव | साध्य | गुरु | शिष्य | पदवी | वर्तन क्रम | नमुना | वर्ग | पोटविद्या लौकिक नांव | कला |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| असणें | आन्वीक्षिकी | मोक्ष | अतिथि | ज्ञानी | ब्राह्मण ज्ञानी | संन्यास | शंकर | १ | १ तत्वज्ञान किंवा शास्त्रीय शिक्षण | १ |
| जाणणें | त्रयी | धर्म | आचार्य | जिज्ञासु | श्रोत्रिय पराक्रमी | वानप्रस्थ | शेषशायी | २ | १४ बौद्धिक शिक्षण धार्मिक शिक्षण | ३२ |
| विचार करणें | वार्त्ता | अर्थ | पिता | अर्थार्थी | द्विज उद्योगी | गृहस्थ | मार्तंड | ३ | ३२ धंदे शिक्षण | ६४ |
| मिळविणें | दंडनीति | काम | माता | आर्त | शूद्र मनुष्य | ब्रह्मचर्य | मारुति | ४ | ५ शारीरिक शिक्षण | ६४ |

टीपः—याप्रमाणें एकंदर ज्ञानाची कला, विद्या, शास्त्र व संहिता अशी प्रणालिका असून निरनिराळ्या भूमिकेवरील माणसांनीं निरनिराळ्या पद्धतीनें हें ज्ञान संपादन करावें असें हिंदू शास्त्रकारांचें सांगणें आहे.

आन्वीक्षिकींत एक 'ब्रम्हविद्या' व एकच 'योगकला' आहे.

त्रयींत खालीं दिल्याप्रमाणें चौदा विद्या व व बत्तीस कला आहेत.

१४ विद्या—चार वेद, सहा वेदांगें, उपनिषद्, धर्मसूत्रें, स्मृति व पुराणें.

३२ कला—ध्यान, आवाहन, पाद्य, अर्घ्य, आचमन, आसन, मधुपर्क, स्नान, नीराजन, वस्त्र उपवीत, भूषा, दर्पण, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, पानीय, फल, तांबूल, अनुलेप, माल्य, गीत, वाद्य, नृत्य, हवन, दक्षणा, प्रदक्षिणा, नमस्कार, स्तुति, प्रार्थना.

वार्तांविद्येंत मुख्य बत्तीस विद्या व चौसष्ट कला आहेत त्याः—

**३२ विद्या**—वृक्ष, पशु, मनुष्य, संसेचन, संहरण, स्तंभन, दति, भस्मीकरण, सांकर्य, पार्थक्य, तरी, नौ, नौका, अध्वपथ, घंटापथ, सेतु, शकृत, विमाननयन, वासः, कुटी, मंदिर, प्रासाद, दुर्ग, कूट, आकर, आपण, राजगृह, आराम, देवालय, नगररचना, युद्ध.

अनुक्रमणिका

**६४ कला**– सीराद्याकर्षण, वृक्षारोहण, इक्षुविकार, वेणुतृणादि कृति, गजाश्वसारथ्य, दुग्धदोहविकार, गतिशिक्षा, पल्याणक्रिया, पशुचर्मांगनिर्हार, चर्ममार्दव, क्षुरकर्म, कंचुकादिसीवन, मांडादिमार्जन, वस्त्रसंमार्जन, मनोनुकूलसेवा, वर्णलेखन, शिशुसंरक्षण, सुयुक्तताडन, शय्यास्तरण, पुष्पादिग्रथन, अन्नपाचन, जलवाय्वाग्निसंयोग, रत्नज्ञान, क्षारनिष्कासन, क्षारपरीक्षा, स्नेहनिष्कासन, इष्टिकादिभाजन, धात्वौषधिसंयोग, काचकरण, लोहाभिसार, भांडक्रिया, स्वर्णदर्शन, मकरंदकरण. धातुसंयोग, जलतरण, सूत्रकरण, पटबंधन, नौकानयन, वृत्तखंडबंधन, समभूमिक्रिया, शिलार्चा, विवरकरण, जलबंधन, वायुबंधन, शकुंतशिक्षा, स्वर्णलेप, चर्मकोषेयवास्यकार्पासादिपटवस्त्रबंधन, मृत्साधन, तृणाद्याच्छादन, चूर्णोपलेप, वर्णकर्म, दारुकर्म, मृत्कर्म, चित्रलेख(प)न, प्रतिमाकरण, तलक्रिया, शिखरकर्म, शस्त्रसंधान, अस्त्रनिपातन व्यूहरचना, शल्याहृति, व्रणव्याधिनिराकरण, मल्लयुद्ध, वनोपवनरचना.

प्रत्येक कलेंत आशुकर्म व चिरक्रिया असे दोन प्रकार असून या दोन्ही प्रकारांत निष्णात त्याला 'सव्यसाची' अशी पदवी आहे.

दंडनीतींत पांच विद्या व चौसष्ट कला आहेत.

**५ विद्या**–रूप, शब्द, गंध, रस, स्पर्श.

**६४ कला**–गीत, नृत्य, वाद्य, लिपिज्ञान, उदारवचन, चित्रविधि, पुस्तककर्म, माल्य, गंध, रत्नपरीक्षा, शीवन, रंगज्ञान, उपकरण, मानविधि, आजीवज्ञान, तिर्यक्चिकित्सा, मापाकरण, क्रीडाकौशल्य, लोकज्ञान, वैचक्षण्य, संवाहन, शरीरसंस्कार, केशरचना, आयुःप्राप्ति, अक्षविधान, रूपकरण, क्रियामार्गण, बीजग्रहण, नयनज्ञान, करणादान, चित्रविधि, गूढराशि, तुल्याभिहार, क्षिप्रग्रहण, लेखस्मृति, अग्निकर्म, छलव्यामोहन, ग्रहदान, उपस्थान, युद्ध, रुत, गत, नृत्त, भाव, राग, प्रत्यंग, नखदंतविचार, नीविस्रंसन, गुह्यस्पर्शन, परमार्थकौशल्य, हर्षण, कृतार्थता, प्रोत्साहन, क्रोधनिवर्तन, क्रुद्धप्रसादन, सुप्तपरित्याग, चरमस्वाप, गुह्यगूहन, शापदान, शपथक्रिया, प्रस्थितानुगमन, पुनर्निरीक्षण.

याप्रमाणें समाजांतील विविक्षितस्थान मंडित करण्यासाठीं ज्याला ज्या कलेची किंवा विद्येची आवश्यकता असेल त्यानें श्रोत्रिय (पुष्कळ ग्रंथांचें परिशीलन केलेल्या) व ब्रम्हनिष्ठ (त्याप्रमाणें स्वतः आचरण करून अनुभव घेतलेल्या) गुरूकडे जाऊन त्याच्या हातापायां पडून वर सांगितल्या पद्धतीनें ती ती विद्या संपादन करावी. शिष्यानें मधुकरवृत्तीनें जेथें जेथें जितकें ज्ञान ज्यावेळीं मिळेल तितकें तत्काल मिळवून एका पोळ्यां(टिपणवह्यां)त सांठवून ठेवणें या पद्धतीनें ज्ञान संपादन करीत असावें.

जगांत सर्वत्र एक वस्तु ओतप्रोत भरली असून आपल्या परिमित ज्ञानसाधनामुळें निरनिराळ्या इंद्रियांना तिच्या एक एकाच गुणाचें ग्रहण करतां येतें म्हणून जगांत विविधता प्रत्ययास येते. ही विविधता इंद्रियदोषांमुळें उत्पन्न झालेली अतएव भ्रमोत्पन्न किंवा खोटी आहे ही एकच गोष्ट वेदांतशास्त्र निरनिराळ्या प्रकारानें सिद्ध करतें. हें शास्त्र आपल्या विवेचनांत सर्व शास्त्रांच्या सिद्धांतांचा उपयोग करतें म्हणून हें सर्व शास्त्राध्ययनानंतर बुद्धि पोक्त व पक्व झाल्यावर शिकावयाचें आहे.

योगशास्त्रांत जीवात्मा व परमात्मा अशा दोन परस्परसापेक्ष वस्तु असून त्यांचा संबंध निश्चित केलेला आहे. या दोन वस्तूंचें स्वरूप सांगून त्यांना एकत्र आणण्याची युक्ति दाखवून दिली आहे. या प्रमाणें राजयोग व हटयोग असे योगाचे दोन प्रकार करून सविस्तर विवेचन या शास्त्रांत आहे.

भाषाशास्त्राचे व्याकरण, न्याय व मीमांसा असे तीन भाग आहेत. भाषेंतील शब्दांचा विचार व्याकरण करतें, वाक्यांचा विचार न्यायांत होतो, व त्यांतील प्रमाणांचा विचार मीमांसा करते. व्याकरणाचे वर्णविचार, शब्दविचार व संबंधविचार असे तीन भाग पडतात. न्यायांत कर्ता, कर्म व क्रिया किंवा विधाता, विधान व विधेय असे तीन भाग आहेत. मीमांसेंत प्रत्यक्ष, अनुमान व आगम असे तीन भाग आहेत. याप्रमाणें भाषाशास्त्र त्रिविध असून त्याची विभागणी तीन तीन याच मानानें शेवटपर्यंत केलेली आहे.

गणितशास्त्राचे व्यक्त किंवा अंकगणित व अव्यक्त किंवा बीजगणित असे दोन भेद असून त्यांचे दोन दोन असे प्रकार होत गेलेले आहेत. बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार; वर्ग, वर्गमूळ, घन, घनमूळ वगैरे चतुर्विध गणित आहे.

धर्मशास्त्रांत परमेश्वराच्या अनंत, सर्वज्ञ, सर्वशक्ति, दयाळु व न्यायी अशा पांच गुणांचें विवेचन करून त्यापासून देव, ऋषि, पितर, मनुष्य व भूत यांचीं ऋणें फेडण्याचे मार्ग व सूर्य, गणेश, देवी, शेषशायी, व शंकर अशा पंचायतनाच्या उपासनेच्या मार्गांचें सविस्तर विवेचन आहे. याप्रमाणें धर्मशास्त्र पंचविध आहे.

पद (शब्द) यांनीं ज्यांचा बोध होतो ते जिन्नस म्हणजे पदार्थ होत. या पदार्थांचें सांकेतिक नांव तें पद होय. पदार्थांचे रंग, वास, रुचि, आवाज, स्पर्श व वजन असे सहा गुण मनासकट सहा इंद्रियामुळें समजतात. पदार्थांच्या या गुणांचें व त्यांच्या परस्परांशीं संबंधांचें विवेचन पदार्थविज्ञानशास्त्र करतें. पंचमहाभूतें व आत्मा अशा सहा गोष्टींचा ऊहापोह हें शास्त्र करतें म्हणून हें षड्विध आहे. आधुनिक पदार्थविज्ञानशास्त्र वजन, उष्णता, प्रकाश, आवाज, विद्युत् व लोहचुंबक अशा सहा बाबींचें विवेचन करतें.

रसायनशास्त्रांत धातु व अधातु यांच्या संयोगवियोगांचें विवेचन सात प्रकारांत केलेलें असतें. दितीपासून सात पुत्र व त्यांचें एकुणपन्नास तुकडे (मरुत्) यांचें विवेचन रसायनशास्त्रांत आहे. यांना प्राचीन संस्कृत ग्रंथांत दिलेलीं नांवें आधुनिक पाश्चात्य ग्रंथांत दिलेलीं नांवें तुलनेसाठीं खालीं दिली आहेत क्षार = Salt. यवक्षार = Nitrate. पीलुक्षार = Phosphate. माषक्षार = Sulphate. कदलीक्षार = cynide. तिलक्षार=Carbonate. भस्म = Hydrate. पलाशक्षार=Chlorate.पुं = Base. स्त्री = Acid. उदाहरणार्थ–यवक्षारयुतं रौप्यं = Silver Vitrate याप्रमाणें रसायनशास्त्र सप्तविध आहे.

यंत्रशास्त्रांत बीज Power, कीलक Fulceum व शक्ति Work यांचा सापेक्ष विचार केलेला असून दंड Lever, चक्र Wheel, दंत Tooth, सरणि Inclind Plane, व भ्रम Screw अशा पांच प्रकारच्या यंत्रांची रचना व उपयोग यांचें विवेचन केलें आहे. जारण, मारण, स्तंभन, वशीकरण, व उच्चाटन अशीं यंत्रांचीं पांच साध्यें आहेत. पृथ्वीतत्वाचें उच्चाटण, जलतत्वाचें वशीकरण, वायुतत्वाचें स्तंभन, तेजस्तत्वाचें जारण व आकाशतत्वाचें मारण यंत्रांच्या योगानें करतां येतें. रूप लांबचें जवळ किंवा लहानाचें मोठें दाखविणें, आवाज मोठा करणें, खालीं, वर किंवा समोर अशा तीन प्रकारची

गति, नेमल्यावेळीं नेमल्या कामाची व्यवस्था म्हणजे ताल, आज्ञाधारकपणा अशा आठ गोष्टी यंत्रांनीं साधावयाच्या असतात. म्हणून यंत्रशास्त्र अष्टविध आहे.

ज्योतिःशास्त्रांत सूर्य, बुध, शुक्र, चंद्र पृथ्वी, मंगळ, गुरु, शनि व नक्षत्रें अशा नऊ गोष्टींची रचना, व्यवस्था व कार्य यांचा विचार असतो म्हणून तें नवविध आहे. बुध, शुक्र, चंद्र व पृथ्वी हे स्त्रीग्रह व सूर्य, मंगळ, गुरु, शनि हे पुरुषग्रह असून यांच्याकडून येणाऱ्या प्रकाशकिरणांच्या रंगांवरून त्यांची घटना व फलें यांचें विवेचन शास्त्रकारांनीं केलें आहे. ग्रहांचें वजन, त्यांचे पृथ्वीपासून अंतर, पृथ्वी व ग्रह यांत होणारे कोन व त्यामुळें त्यांचे एकमेकांवर होणारे परिणाम यांचा विचार ज्योतिःशास्त्रांत आहे. काल व स्थल यांचें हें शास्त्र आहे. हिंदी अयन, मास, पक्ष, तिथि, अहोरात्र, समय वगैरे गोष्टी केव्हांहि आकाशांत दाखवितां येणाऱ्या आहेत व त्यामुळें ज्योतिःशास्त्र निःसंदेह आहे.

वैद्यकशास्त्रांत शरीर व त्याचीं घटक पंचमहाभूतें, क्रिया व तिचीं साधनें, तीन धातु, मन व आत्मा अशा दहा बाबींचा परस्परसापेक्ष विचार केला आहे. शरीरांत या दहा जिनसांच्या सहाय्यानें सारख्या घडामोडी चालू असतात. यांत समता असणें म्हणजे आरोग्य व बिघाड म्हणजे रोग. हा बिघाड फिरून साम्यावस्थेस आणण्यासाठीं औषध असतें. या योजनेंत तीन धातु, मन, आत्मा यांचा समावेश व्हावा म्हणून औषधांत धनधान्यांची योजना हिंदुशास्त्र करतें.

शिल्पांत तीन प्रकारची (अग्निज, जलज, व दिव्य) सामग्री, दोन प्रकारचा (समोरून अगर बाजूनें) सूर्यप्रकाश, दोन प्रकारचा (कमी अगर जोरांत) पाऊस व वारा मिळून अठरा प्रकारच्या साधनांचा उपयोग करून अठरा प्रकार झाले आहेत. वारा, पाऊस व ऊन यापासून बचाव होण्यासाठीं उपलब्ध साधनांचा उपयोग करून शिल्परचना करावयाची असते.

व्यवहारांत शेती व कारागिरी, देवघेव, नेआण, मोजमाप, क्षयवृद्धि, वगैरे अनेक बाबींत निरनिराळ्या प्रकृतीच्या माणसांकडून कामें होत असल्यामुळें अनेक प्रकार होतात. जसजसा समाजांत लबाडीचा प्रादुर्भाव होतो तसतसे व्यवहार जास्त जास्त गुंतागुंतीचे होतात.

शिल्पशास्त्रांत शिल्पकर्माला लागणाऱ्या खनिज द्रव्यांची खनिशास्त्रांतून, कामाला लागणाऱ्या सामानाची माहिती कृषि-(वनस्पति व प्राणि)शास्त्रांतून, लागणारें अगर नको असलेल्या पाण्याची व्यवस्था जलशास्त्रांतून घेतलेली असते. या प्रकरणाला लागणारें सामान गोळा करण्याच्या भागाला धातुखंड असें म्हणतात.

सामान गोळा केल्यावर तें जेथें वापरावयाचें तेथें वाहून न्यावें लागतें. याचें विवेचन करणाऱ्या भागाला साधनखंड म्हणतात. साधनखंडांत माल पाण्यावरून वाहून नेण्याची माहिती नौकाशास्त्रांत, तो जमीनीवरून नेण्याची माहिती रथशास्त्रांत, व तो आकाशांतून नेण्याची माहिती विमानशास्त्रांत सांगितलेली आहे.

आणलेल्या सामानाचीं भांडीकुंडीं, वस्त्रेंपात्रें, घरेंदारें, किल्लेनगरें, बागामंडप वगैरे तयार करण्याची माहिती वास्तुखंडांत दिली आहे. या खंडाचे वेश्मशास्त्र, प्राकारशास्त्र व नगररचनाशास्त्र असे

तीन भाग आहेत. वेश्मशास्त्रांत यःकश्चित् पालापासून तो मोठमोठ्या राजवाड्यांपर्यंत सर्व इमारती वगैरेंची माहिती आहे. प्राकारशास्त्रांत किल्ले, तट, बुरूज, शस्त्रें, अस्त्रें, वगैरेंची माहिती आहे. नगररचनाशास्त्रांत राजकीय नगरें (राजधान्या) धार्मिक नगरें (तीर्थे), व्यापारी नगरें (पुरें, पत्तनें, बंदरें) व चैनीचीं नगरें यांची रचना, व्यवस्था व उपयोग यांचें विवेचन आहे.

गेल्या कृतयुगांत पृथ्वी तरुण व सुपीक होती, माणसें साधीं अल्पसंतुष्ट होतीं व त्यामुळें सर्वत्र आनंदीआनंद होता. त्यानंतर पृथ्वी कठिण व निकस होत चालली आहे, माणसें चैनी व महत्त्वाकांक्षी होत चाललीं आहेत व शिल्पशास्त्र सर्वांना सर्व सुखें प्राप्त करून देण्यासाठीं आपली पराकाष्ठा करीत आहे. शेवटीं माणसांतील द्वेषबुद्धि नाहींशी झाली म्हणजे त्या प्रत्येकास एकएक कल्पवृक्ष किंवा कामधेनु देण्याचा शिल्पाचा प्रयत्न आहे. अशा वेळीं सर्वांच्या सर्व इच्छा तृप्त होऊन फिरून कृतयुगाप्रमाणें सर्व सुखी होतील. अशी हिंदु संस्कृतींतील एकंदर विचारसरणी व शास्त्रांची मांडणी आहे. या पुढें कांहीं पारिभाषिक शब्द घेऊन त्यांचा निरनिराळ्या शास्त्रांत कसा उपयोग केला आहे हें पाहूं.

---

# 'शालिवाहन शक'

(लेखकः- **विद्यासागर सदाशिव वखले**, एम्. ए., एल्एल्. बी.)

शालिवाहन शक सुरू होऊन आतां साडे अठराशें वर्षे झालीं आहेत. लौकिक समजुती-प्रमाणें शालिवाहन राजानें शक राजांचा पराभव करून महाराष्ट्रांत पुनः स्वराज्य-स्थापना केली त्या वेळीं या संवत्सरास सुरवात झाली. ही समजूत बरोबर असो अगर नसो; महाराष्ट्राचा वीरमणि, राजा शालिवाहन, याची कीर्ति मात्र आज जवळ जवळ दोन हजार वर्षे अविरत कायम टिकली असून नर्मदेच्या दक्षिणेस तर त्यानें सुरू केलेली वर्षगणनापद्धति अजूनहि चालू आहे. यावनी सत्तेचें प्राबल्य वाढत असतां विजयनगरच्या हिंदू राजांच्या व त्यांच्या प्रजेच्या डोळ्यांसमोर राजा शालिवाहनाचें उज्वल व वीररसोत्पादक चरित्र ठेवण्यास, या संवत्सराशीं असलेला त्याचा संबंध कारणीभूत झाला असेल यांत संशय नाहीं; पण ही भावना थोडी बाजूस ठेवून खरोखरच शालिवाहनाचा या संवत्सराशीं कितीसा संबंध होता, हा संवत्सर त्यानेंच सुरू केला कां दक्षिणेंतील अत्यंत विख्यात राजा म्हणून त्याचा या संवत्सराशीं संबंध पुढें जोडण्यांत आला या प्रश्नाची चर्चा बरीच उद्बोधक होईल यांत संशय नाहीं.

'शालिवाहन शका' संबंधानें प्रचलित असलेल्या निरनिराळ्या कथांमध्यें ऐकमत्य असें विशेष नाहींच. इ. स. ६२८ च्या सुमारास ब्रह्मगुप्त नांवाच्या ज्योतिर्विदानें 'शकान्ते', 'शक-नृपान्ते' या प्रयोगांवरून शक राजांचा जेव्हां अंत झाला त्यावेळीं या संवत्सरास सुरवात झाली असें सूचित केलें. त्यानंतर वराहमिहिराच्या बृहत्संहितेवरील टीकाकार भट्टोत्पल (इ. स. ९६६) यानें 'शकेन्द्रकालात्' या शब्दावर व्याख्या करितांना शक नांवाच्या म्लेंच्छ जातीच्या राजांचा विक्रमादित्यदेवानें जेव्हां संहार केला तेव्हांपासून हा 'शककाल' सुरू झाला असें सांगितलें आहे. अर्थात् लौकिक समजुतीप्रमाणें या संवत्सराचें प्रवर्तकत्व शालिवाहनाकडे अजूनपर्यंत तरी आलें नव्हतें. जैनवाङ्मयांतील कालिकाचार्यकथेचा काळ ठरविणें कठीण आहे; पण त्यांत विक्रमादित्यानें शकांचा पराभव करून स्वतःचा संवत् सुरू केल्यानंतर एकशें पसतीस वर्षांनीं त्याच्या वंशजांचा दुसऱ्या एका शकराजानें पराभव करून शकसंवत्सर सुरू केला अशी कथा आहे. गझनवीच्या महमूदाबरोबर हिंदुस्थानांत येऊन निरीक्षण करून अल्बेरुनीला जी माहिती मिळाली ती बऱ्याच अंशीं भट्टोत्पलाच्या शककालाच्या उत्पत्तीच्या कथेप्रमाणेंच आहे. यावरून इ. स. ९५६ ते इ. स. १०५० या दरम्यान विक्रमादित्य शककालाचा प्रवर्तक समजला जात असे असें दिसतें. कालिकाचार्य कथेंतील हकीगत याहि पूर्वीची असावी; कारण इ. स. १०५० नंतर विक्रमादित्याचा शककालाशीं असलेला संबंध हळूहळू तुटू लागतो व त्याचें प्रवर्तकत्व शालिवाहनाकडे येऊं लागतें. सतराव्या शतकाच्या आरंभीं या भिन्न कथांची सांगड घालण्याचा सुंदर प्रयत्न केलेला आपणांस आढळून येतो. प्राचीन ज्योतिषग्रंथांत तर शकसंवत्सराचें प्रवर्तकत्व विक्रमा-

अनुक्रमणिका

दित्याला दिलेलें व त्यावेळीं प्रचलित असलेल्या समजुतीप्रमाणें हा संवत्सर शालिवाहनानें सुरू केलेला, अशा स्थितींत 'शकनृपान्ते' यांतील 'शकनृप' या शब्दाचा अर्थ शक+नृ+प म्हणजे 'शकलोकांवर राज्य करणारा विक्रमादित्य राजा' असा करून त्याचा अंत म्हणजे शालिवाहनाचा आरंभ व म्हणून शालिवाहन शकाच्या बाबतींत 'शकनृपान्ते' असा शब्दप्रयोग आढळून येतो असें स्पष्टीकरण देण्यांत आलें. दुसऱ्या एका टीकाकारानें पा [ पिव् ] म्हणजे 'मारयति' असा अर्थ करून वरीलप्रमाणेंच मल्लीनाथी केली आहे. जुन्या ग्रंथांतील विक्रमादित्याला दिलेलें शककालाचें प्रवर्तकत्व व सतराव्या शतकाच्या आरंभीं प्रचलित असलेली समजूत यांची सांगड घालण्यास एवढी करामत वस्त झाली असें दिसतें; कारण यापुढें मात्र विक्रमादित्याचा शालिवाहन शकाशीं पुनः संबंध आला नाहीं. ज्योतिषग्रंथांत या संवत्सराचा उल्लेख प्रथम वराहमिहिरानेंच सुरू केला पण विक्रमादित्याचा अगर शालिवाहनाचा संबंध त्याच्या ध्यानींमनींहि नव्हता हें 'शकेंद्रकाल' 'शकभूपकाल' या त्यानें दिलेल्या नांवावरून दिसतें. त्यानंतर बृहत्संहितेवरील टीकाकारांनीं विक्रमादित्याला या संवत्सराचा जनक ठरविलें व तें जनकत्व शालिवाहनाकडे आल्यानंतर मूळ उल्लेख, त्यावरील टीकाकारांची मल्लीनाथी व प्रचलित समजूत हीं सर्व परस्परविरोधी नाहींत असें दर्शविण्याचा वर सांगितल्याप्रमाणें प्रयत्न करण्यांत आला. यापूर्वींच 'मुहूर्तमार्तंड' व 'कल्पप्रदीप' यांत शालिवाहनानेंच हा शक सुरू केला असें ठांसून सांगण्यांत आलें होतेंच. पण मुहूर्तमार्तंडांतील शालिवाहनाच्या जन्मापासून हा शक सुरू झाल्याबद्दलची हकीगत मागें पडून, शालिवाहन व विक्रमादित्य यांचें युद्ध होऊन त्यांत विक्रमादित्याचा पराभव होऊन शालिवाहनाचा संवत्सर सुरू झाला ही कथाच पुढें जास्त प्रसिद्ध होऊं लागली. मराठींतील पाल्हाळिक शिवदिग्विजय बखर कांहीं फारशी विश्वसनीय नव्हे; पण त्यांतील खालील हकीगतीवरून सतराव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं लौकिक समजूत काय होती हें कळून येईल.

"१३५ विक्रमशक रक्ताक्षीनाम संवत्सरें प्रवर्तला. उजेनी अवंतिका क्षेत्रीं जाहला. नंतर शालिवाहन प्रतिष्ठा नगरीं उत्पन्न जाहला. त्याणीं मृत्तिकेचे घोडे केले. विक्रमानें काष्ठाचे घोडे केले. उभयतांचे नर्मदेंत वाहून गेले. सबब नर्मदोत्तरीं विक्रमशक. दक्षिणतीरीं शालिवाहन शक चालत आहे. बहुधान्यनामसंवत्सरीं विक्रमसंवत्सरीं राहिला. प्रभवापासून चालता केला दक्षिणेस."

शिवदिग्विजयकारांची लांकडाच्या व मातीच्या घोड्यांची हकीगत सोडली तरी शकसंवत्सर शक राजांचाहि नव्हे, विक्रमादित्याचाहि नव्हे तर तो शालिवाहनाचाच आहे ही समजूत मात्र आज दृढमूल झाली आहे. हा संवत्सर प्रथम केव्हां उपयोगांत आलेला आढळतो व त्याला निरनिराळ्या वेळीं कोणकोणतीं नावें दिलेलीं आहेत व तीं कशींकशीं बदलत गेलीं हें पाहिलें असतां या समजुतीच्या यथार्थतेवर बराच प्रकाश पडेल. महाक्षत्रप नहपान याच्या अयम नांवाच्या अमात्याच्या जुन्नर येथील शिलालेखांत 'वसे ४६' असा उल्लेख आढळतो. तसेंच नहपानाचा जामात उषवदात याच्या नाशिक येथील शिलालेखांत 'वसे ४२' 'वसे ४१' 'वसे ४५' असे उल्लेख आढळतात. चाळीस पंचेचाळीस वर्षें राज्य करणारा राजा क्वचितच; तेव्हां हीं वर्षें कोणत्यातरी संवत्सराचीं असलीं पाहिजेत यांत संशय नाहीं. अनेक विद्वानांच्या मतें हीं

शकसंवत्सराचींच वर्षें होत; पण हा प्रश्न जरा वादग्रस्त असल्यामुळें त्यांत शिरण्याचें या लेखांत प्रयोजन नाहीं. या नंतर उज्जयिनीच्या क्षत्रपांच्या नाण्यांवर अगर शिलालेखांवर ५२ पासून ३१०–३१९ पर्यंत वर्षांचा उल्लेख आपणांस आढळतो. पण अजूनपर्यंत नुसता 'वर्षें' असाच उल्लेख आहे. या क्षत्रपांचें राज्य मुख्यत्वें माळवा प्रांतावर असून त्यांची राजधानी उज्जयिनी येथें होती. माळवाप्रांत पुढें गुप्तराजांनीं पादाक्रांत केला. दुसऱ्या चंद्रगुप्ताचा उदयगिरि येथील शिलालेख गुप्तसंवत् ८२ म्हणजे इ० स० ४०१ चा आहे; व क्षत्रपांच्या नाण्यांवरील ३१९वें वर्ष शकसंवत्सराचें वर्ष धरिलें असतां तें नाणें इ. स. ३९७ चें आहे असें ठरतें. क्षत्रपांचें राज्य जाऊन गुप्तांचें राज्य माळव्यावर सुरू झालें; तेव्हां क्षत्रपांच्या अगदीं शेवटल्या नाण्यावरील वर्ष व गुप्तांच्या माळव्यांतील पहिल्याच शिलालेखांतील वर्ष हीं वर्षें थोड्या अंतरानें असणें साहजिक आहे व म्हणून 'वर्षें' असा साधाच उल्लेख क्षत्रपांच्या नाण्यांवर असला तरी तीं शकसंवत्सराचींच वर्षें आहेत असें गृहीत धरून चालण्यास कांहीं हरकत नाहीं. शक ३१९ पर्यंत जरी क्षत्रपांच्या नाण्यांवर नुसता 'वर्षें' असाच उल्लेख असला तरी शक २५९ (अगर २६१) च्या एका शिलालेखांत 'शकाब्द' असें या संवत्सराचें नांव आढळतें. पण हा शिलालेख बनावट असावा असें बऱ्याच विद्वानांचें मत आहे. शकसंवत्सराचा नांवानें उल्लेख प्रथम लोकविभाग नांवाच्या जैनग्रंथांत सांपडतो. हा उल्लेख शकाब्द ३८० चा आहे. यानंतर अनेक शिलालेखांत या संवत्सराचा उल्लेख आपणांस आढळून येतो. विस्तारभयास्तव सर्व शिलालेखांतील या संवत्सराच्या नांवांचा विचार येथें करितां येणार नाहीं;पण एक गोष्ट मात्र निर्विवाद आहे, ती ही कीं इ०स० १२०० पर्यंत शकसंवत्सराचा शालिवाहनाशीं कोठेंहि संबंध जोडलेला नाहीं. उलट या संवत्सराशीं विक्रमादित्याचाहि नाहीं व शालिवाहनाचाहि नाहीं तर शक राजांचाच जास्त संबंध होता हें 'शकनृपतिसंवत्सर' 'शकनृपकाल' वगैरे नांवांवरून वाटूं लागतें. बदामी येथील चालुक्य राजा मंगलीश याच्या राज्याच्या १२ व्या वर्षातील एका शिलालेखांत तर "शकनृपतिराज्याभिषेकसंवत्सरेषु अतिक्रान्तेषु पञ्चसु शतेषु' असा या संवत्सराच्या प्रारंभासंबंधें स्पष्ट उल्लेख आहे. भट्टोत्पलादि टीकाकारांचें लक्ष्य फक्त ज्योतिषग्रंथांतील नांवांकडेच गेल्यामुळें त्यांच्या मल्लीनाथीच्या तडाक्यांतून हा उल्लेख सुटला आहे. असो. बदामीच्या या शिलालेखावरून इ. स. ५७८ च्या सुमारास शकसंवत्सर एका शकराजाच्या राज्याभिषेकाच्या वर्षापासून सुरू झाला अशीच सर्वसाधारण समजूत असावी असें दिसतें. शकसंवत्सराचें जनकत्व विक्रमादित्याकडे यानंतर गेलें असावें.

शकसंवत्सराशीं शालिवाहन राजाचा संबंध प्रथम शके १२७६च्या विजयनगर येथील बुक्करायाच्या हरिहर येथें सांपडलेल्या ताम्रपटांत आपणांस आढळतो. यापूर्वीहि यादवराजा रामचंद्र याच्या ठाणें येथील शके १२१२च्या ताम्रपटांतहि शालिवाहन शकाचा उल्लेख आढळतो. रामचंद्र हा देवगिरीचा शेवटला यादव राजा होय. लंकेहून मोडी लिपी आणणारा हेमाडपंत व कविवर्य ज्ञानेश्वर हे याच रामचंद्राच्या अमदानींत होते. हेमाद्रि अगर हेमाडपंत तर रामचंद्राचाच मंत्री होता व त्याला 'श्रीकरणाधिप' असा हुद्दा असे. वरील ताम्रपटांतील वर्षानंतर तीन चार वर्षांनींच अल्लाउद्दिन खिलजीनें देवगिरीवर स्वारी केली, व रामचंद्राचा पराभव होऊन त्यानें या प्रसंगीं अल्लाउद्दिनशीं तह केला. पण हा तह पुढें टिकावयाचा नव्हता व देवगिरीचें

राज्यहि लवकरच नामशेष व्हावयाचें होतें ! रामचंद्रानें इ. स. १२७१ पासून अदमासें १३०९ पर्यंत राज्य केलें व यानंतर तीन चार वर्षांतच देवगिरीच्या हिंदु राज्याचा अस्त झाला. रामचंद्राचीं वीस पंचवीस दानपत्रें आज उपलब्ध आहेत. पण त्यांमध्यें शकसंवत्सराचा शालिवाहनाशीं संबंध जोडलेला आढळत नाहीं. इतकेंच नव्हें तर याच रामचंद्राच्या शके ११९४ (इ. स. १२७२) च्या ठाणें येथील दुसऱ्या एका दानपत्रांत मुळांत शालिवाहनशक असा उल्लेख नसतांनाहि तो नकलेंत दडपून दिलेला आढळून येतो; या शके १२१२च्या ताम्रपटाचीहि तीच स्थिति आहे कीं काय तें पाहण्यास मूळ ताम्रपटहि उपलब्ध नाहीं. पण बहुतांशीं त्यांत शालिवाहनाचा संबंध शकसंवत्सराशीं जोडलेला नसावा. समकालीन इतर दानपत्रांत तसा संबंध आढळून येत नाहीं; नंतरच्याहि दानपत्रांत नाहीं. शालिवाहनाचा शक हें नांव जर त्या कालीं प्रचलित होतें तर या एकाच दानपत्रांत तें यावें हें जरा आश्चर्यकारकच नाहीं का ? सारांश रामचंद्राच्या या ताम्रपटांत मुळांत शालिवाहन शक असा उल्लेख नाहीं असेंच समजणें भाग आहे. व हें विधान ग्राह्य झालें म्हणजे मग बुक्करायाच्या शके १२७६च्या दानपत्रांतच प्रथम शकसंवत्सराचें जनकत्व शालिवाहनाकडे आलेलें आपणांस आढळतें असें म्हणणें भाग आहे.

प्रथमतः शके १२७६च्या बुक्करायाच्याच ताम्रपटांत 'शालिवाहनशक' असा उल्लेख कां आढळतो हें नीट कळण्यास विजयनगरच्या राज्यस्थापनेसंबंधीं थोडी हकीगत देणें जरूर आहे. अकराव्या शतकाच्या आरंभीं गझनवीच्या महमुदाची सोमनाथावर स्वारी झाल्यानंतर मुसलमानांची सत्ता हळू हळू सर्व उत्तर हिंदुस्थानभर पसरूं लागली. पण नर्मदेच्या दक्षिणेस त्यांची दृष्टि अजूनहि वळली नव्हती. तेराव्या शतकाच्या शेवटापर्यंत सर्व उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत केल्यावर मात्र ह्या विजयलोलुप व धर्मांध मुसलमानांनीं आपला मोर्चा दक्षिणेस वळविला. इ. स. १२९३ च्या सुमारास अल्लाउद्दिन खिलजीनें देवगिरीवर हल्ला केल्याचें वर लिहिलें आहेच. त्यानंतर अल्लाउद्दिन व त्याच्या मागून मलिक काफर यांनीं दक्षिण हिंदुस्थानहि पादाक्रांत करून महम्मदी धर्माचा प्रसार करण्याचा आटोकाट प्रयत्न केला व त्या प्रयत्नास यशहि येईल असें वाटूं लागलें. इ. स. १३१२ च्या सुमारास देवगिरीच्या विख्यात यादववंशास धुळीला मिळविल्यानंतर वारंगळ व द्वारसमुद्र येथील राजांविरुद्ध मुसलमानी सत्तेचा हल्ला सुरू झाला; व वारंगळ येथील काकतीयांचें राज्य उध्वस्त केल्यावर द्वारसमुद्र येथील होयसल बल्लाळांचा पराभव करुन त्यांचा प्रांत दिल्लीच्या साम्राज्यांत सामील करण्यांत आला. या प्रबल राज्यांची ही अवस्था, मग आनेगुंदीसारखें छोटेंसें राज्य मुसलमानी सैन्याविरुद्ध किती दिवस टिकाव धरून राहणार ? अखिल दक्षिण हिंदुस्थान मुसलमानी साम्राज्यास जोडलें जाणार अशी भीति साहजिक उत्पन्न झाली. पण परमेश्वराची इच्छा निराळी होती !

हिंदुसंस्कृति, हिंदुधर्म, हिंदुसमाजव्यवस्था हीं मुसलमानांच्या प्रबल सत्तेपुढें, त्यांच्या धर्मवेडापुढें फार दिवस टिकाव धरूं शकणार नाहींत, आपसांतील दुही, वैय्यक्तिक द्वेष, निरनिराळे धार्मिक पंथ, यांमुळें हिंदुधर्मावर गदा येण्यास चुकणार नाहीं व हिंदुधर्म वांचविणें असल्यास एकजुटीनें मुसलमानांस तोंड देणें हाच एक मार्ग आतां उरला आहे, हें स्पष्टपणें लवकरच दिसूं लागलें. या दृष्टीनें स्वामी विद्यारण्य यांच्या प्रोत्साहनानें जे प्रयत्न झाले त्या

प्रयत्नांचेंच फळ हक्क व बुक्क या बंधूंच्या नेतृत्वाखालीं विजयनगरच्या साम्राज्याची संस्थापना हें होय. विजयनगराची स्थापना इ. स. १३३६ त झाली व हक्क हा हरिहर हें नांव धारण करून विजयनगरचा पहिला राजा झाला. हरिहरानें सातच वर्षे राज्य केलें व त्याच्यानंतर त्याचा भाऊ बुक्कराय गादीवर आला. विजयनगरीच्या खऱ्या ऐश्वर्यास याच बुक्करायाच्या अमदानींत सुरवात झाली. नगराच्या मनोहर रचनेचें श्रेयहि बुक्करायालाच दिलें पाहिजे. मुसलमानी सत्तेविरुद्ध सुरू झालेली ही चळवळ खरी राष्ट्रीय चळवळ होती. हिंदुधर्म व हिंदुसंस्कृति यांचें संरक्षण हेंच या चळवळीचें मुख्य ध्येय होतें. हरिहरापेक्षांहि बुक्करायाकडेच यांचें अधिक श्रेय आहे. त्यानें इ. स. १३४३ पासून १३७१ पर्यंत राज्य केलें व या अवधींत त्यानें आजूबाजूच्या प्रांतावर आपली सत्ता प्रस्थापित केली. राजधानीचें विद्यानगर हें नांव बदलून हिंदुधर्माच्या विजयाचा जयजयकार म्हणून त्यानें तिचें विजयानगरी असें नांव ठेविलें. सामाजिक, धार्मिक व राजकीय बाबतींत त्यानें जी सुव्यवस्था अमलांत आणली ती खरोखरच अभिनंदनीय होती; व विजयनगरचें ऐश्वर्य जें पुढें बरीच वर्षे टिकलें तें बुक्करायाच्याच परिश्रमाचें फळ होय. इ. स. १३३६ त विजयनगरची स्थापना झाली, इ. स. १३४३ त बुक्कराय गादीवर आला व वर उल्लेखिलेला त्याचा ताम्रपट शके १२७६ म्हणजे इ.स. १३५४ तला आहे. याच वेळीं प्रथम शकसंवत्सराला शालिवाहन शक असें नांव पडलें. मुसलमानी संस्कृतीविरुद्ध निकराचा झगडा चालू असतां, लौकिक व्यवहारांत व ज्योतिषग्रंथांत प्रसिद्ध असलेल्या शकांच्या संवत्सरास शालिवाहनाचें नांव जोडून, त्याच्याशीं असलेला परकीय शकांचा संबंध तोडून टाकण्याच्या हेतूनें शकपह्लवनिषूदन शालिवाहनाचें चरित्र आदर्श म्हणून जनतेपुढें ठेवण्याचा प्रयत्न बुक्करायानें केला असल्यास त्यांत आश्चर्यकारक असें कांहींच नाहीं. दक्षिणेंत परकीय शकांची सत्ता प्रबल झाली असतां, तीविरुद्ध धैर्यानें झगडून शकांना नर्मदेपार पिटाळून लावणाऱ्या शालिवाहन राजाखेरीज, तसाच प्रसंग दक्षिण हिंदुस्थानावर पुनः एकदां मुसलमानांकडून आला असतां, त्यांच्याविरुद्ध नेटानें झगडण्यास दुसऱ्या कोणत्या राजाचें चरित्र प्रोत्साहनपर झालें असतें? मुसलमानी सनांच्या तोडीला हिंदू संवत्सराची जरूरी होती, व त्याचा परकीय शकांच्याशीं असलेला संबंध तोडणेंहि इष्ट होतें. हिंदुसंस्कृति व हिंदुधर्म हीं वांचविण्याकरितां ज्यानें आटोकाट प्रयत्न केले त्या दक्षिणच्या वीरमणीचें नांव शकसंवत्सरास जोडून बुक्करायानें जनतेपुढें जो आदर्श ठेविला तो योग्यच होता.

बुक्करायाच्याच ताम्रपटांत प्रथम 'शालिवाहन शक' असा उल्लेख असल्यामुळें, त्याच वेळीं शालिवाहनाचा प्रथम शकसंवत्सराशीं संबंध जोडला गेला असावा हें स्पष्ट आहे. वर आम्हीं जी तत्कालीन परिस्थितीची संक्षेपतः हकीगत दिली आहे त्यावरून नुसत्या शककाल, शकनृपतिसंवत्सर, शककालसंवत्सर या नांवांऐवजीं 'शालिवाहन शक' हें नांव देण्यांत बुक्करायाचा हेतु राष्ट्रीय वृत्ति जागृत करण्याचाच होता असें स्पष्ट दिसून येईल. अर्थात् आमच्या या अनुमानास निश्चित स्वरूप येण्यास जो पुरावा आवश्यक आहे तो आज तरी उपलब्ध नाहीं; पण तत्कालीन परिस्थितीचा विचार करितां हें एकच अनुमान शक्य आहे असें स्पष्ट दिसून येईल.

येथवर शालिवाहनशकाच्या इतिहासाचें विवेचन झालें. चवदाव्या शतकापर्यंत 'शालिवाहन शक' हें नांव उपलब्ध होत नसल्यामुळें शालिवाहनानें मूळ हा शक स्थापन केला नसावा

हाच आतांपर्यंतच्या विवेचनाचा पाया होय. या एका कारणाखेरीज दुसऱ्याहि अनेक कारणां-मुळें शकसंवत्सराचें जनकत्व शालिवाहनाकडे येत नाहीं. त्या सर्व कारणांचा विचार केला असतां आमच्या वरील अनुमानास बरीच पुष्टि येईल.

कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांनीं आपल्या मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या चवथ्या खंडांत शकसंवत्सराचें प्रवर्तकत्व तत्त्वतः कोणाकडे येतें याचा विचार केला आहे. त्या ठिकाणीं कै. राजवाड्यांनीं प्रदर्शित केलेलें आपलें मत व त्याच मताची राधामाधवविलासचंपूंत प्रसिद्ध केलेली सुधारलेली आवृत्ति या दोहींचा या ठिकाणीं उल्लेख करणें भाग आहे. पहिल्यांत वादीचें म्हणणें तर दुसऱ्यांत प्रतिवादीची कैफियत; पहिल्यांत शालिवाहन या संवत्सराचा जनक नव्हता असें दाखविणारीं कारणें तर दुसऱ्यांत त्याचें जनकत्व शालिवाहनाकडेच आलें पाहिजे असें दर्शविणारें विवेचन. इ. स. १९०० सालीं या प्रश्नावर कै. राजवाड्यांचें मत खालील-प्रमाणें होतें:—

"इ. स. पूर्वी एक शतकापासून तों इ. सनानंतर दोन शतकांपर्यंत शातवाहन कुलां-तील राजांनीं महाराष्ट्रांत व तैलंगणांत राज्य केल्याचे दाखले पुराणांतून, शिलालेखांतून व नाण्यांतून सांपडतात. ह्यावरून येवढेंच सिद्ध आहे कीं शालिवाहनांच्या नांवानें जो शक सध्यां प्रचारांत आहे त्याचा आरंभ शातवाहन कुलांतील राजे राज्य करूं लागल्यापासून झाला नाहीं. आपल्याला माहीत असलेल्या शातवाहन कुलांतील मधल्याच एका राजानें म्हणजे इ. स. ७८ त राज्य करणाऱ्या एखाद्या शातवाहन राजानेंहि हा शक सुरू केला नाहीं. कां कीं नाशिक येथील गौतमीपुत्र शातकर्णी, पुळुमायी, ह्यांच्या शिलालेखांत पुळुमायीच्या राज्याभिषेकापासून झालेल्या वर्षांचे आंकडे दिलेले आहेत व शकाचे आंकडे दिलेले नाहींत. म्हणजे शातवाहनांच्या अमदानींत वर्षांची गणना शकानें होत नसे हें उघड आहे. नहपानाचा जांवई जो उषवदात त्याच्या शिलालेखांत वर्षांची गणना शकानें केली आहे असें पौराणिकांचें मत आहे. त्यावरून असें म्हणणें भाग पडतें कीं, वर्षांची गणना क्षत्रप राजे शकानें करीत व आंध्र राजे मोंगल राजाप्रमाणें किंवा शिवाजीप्रमाणें स्वतःच्या राज्यारोहणापासून करीत. शकानें वर्षें मोजण्याचा प्रघात ज्या अर्थी शातवाहन राजांचा नसे त्या अर्थी शातवाहनानें विक्रमाला जिंकून दक्षिणेंत 'शातवाहन शक' सुरू केला व नर्मदेच्या उत्तरेस विक्रमसंवत् चालता राहिला वगैरे दंतकथा इ. स. २०० पर्यंत राज्य करणाऱ्या शातवाहनांच्या संबंधानें तरी निराधार आहेत असें म्हणावें लागतें. महाराष्ट्रांतील पुरातन कालचें मोठें शहर जें पैठण तेथील मराठी राजे जे शातवाहन अथवा शालिवाहन त्यांनीं दक्षिणेंत आपला शक सुरू केला असा जो अभिमान बखरनविसांच्या लिहिण्यांत व कित्येकांच्या बोलण्यांत दिसून येतो तो केवळ भ्रामक व निराधार आहे हें वरील विवरणावरून ध्यानांत येईल."

कै. राजवाड्यांच्या वरील विवेचनांतील मुख्य मुद्दा हाच कीं 'शालिवाहन शक' जर शालिवा-हनानें सुरू केला होता तर त्याच्या वंशजांच्या शिलालेखांत या शकाचा उल्लेख असणें जरूर होतें. शातवाहन राजांचे शिलालेख महाराष्ट्रांत नाणेघाट, नाशिक, कान्हेरी, कार्लें येथें आढळतात. महाराष्ट्राबाहेरहि आंध्रदेशांत व कृष्णा जिल्ह्यांत त्यांचे शिलालेख आहेत, या सर्व लेखांत राज्या-

भिषेकसंवत्सरच दिले आहेत; एकांतहि शकसंवत्सराचा उल्लेख आढळून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर उज्जयिनी येथील क्षत्रपांच्या शिलालेखांतील 'वर्ष' शकसंवत्सराचेंच वर्ष असतां समकालीन सातवाहन राजे मात्र आपल्या राज्याभिषेकापासूनचें वर्ष शिलालेखांत देतात. सातवाहनांच्या नाण्यांवर वर्ष दिलें नाहीं पण क्षत्रपांच्या नाण्यांवर शक २१९ पर्यंत वर्षें आढळतात. शकसंवत्सराचा प्रवर्तक शालिवाहन यानें हा संवत्सर शक लोकांचा पराभव करून तत्प्रीत्यर्थ सुरू केला या दंतकथेंत जर कांहीं तथ्यांश असला तर शातवाहन राजांपैकीं गौतमीपुत्र सातकर्णीनेंच दंतकथेंतील हकीगतीप्रमाणें शकांचा संहार केला असला पाहिजे. कारण त्याच्या आईच्या नाशिकयेथील शिलालेखांत तसा उल्लेखहि आहे. गौतमीपुत्रानंतर पुलुमायी राज्यावर आला व हा पुलुमायी व उज्जयिनीचा क्षत्रप चष्टण हे समकालीन होते असें ग्रीक भूगोलज्ञ टॉलेमी यानें या दोघांचाहि उल्लेख केला आहे यावरून वाटतें. चष्टणाचा नातू रुद्रदामन् याचा शके ५२ (इ. स. १३०) चा एक लेख अन्धौ येथें उपलब्ध झाला आहे. याच रुद्रदामन् क्षत्रपानें सातवाहनांचा पराभव करून त्यांना महाराष्ट्राबाहेर पिटाळून लाविलें असावें. या सुमारचा सातवाहन राजा यज्ञश्री सातकर्णी हा आपल्या शिलालेखांत फक्त स्वतःच्या राज्याचींच वर्षें देतो; त्यास उत्तरेस चालू असलेल्या शकसंवत्सराचा पत्ता देखील नाहीं. शकक्षत्रप हा संवत्सर वापरतात व तो त्यांचाच संवत्सर असल्यामुळें ते 'शकवर्ष' असें न म्हणतां नुसतें 'वर्षच' असें म्हणतात; उलटपक्षीं सातवाहन राजे हा संवत्सर वापरत नाहीत; यावरून एकच अनुमान निघतें कीं शकसंवत्सराशीं सातवाहन राजांचा कोणताहि संबंध नव्हता.

स्वतःच्या राज्याभिषेकाच्या अगर एखाद्या दिग्विजयाच्या वर्षापासून कोणताहि राजा जो संवत्सर सुरू करितो तो तो स्वतः व स्वतःच्या वंशजांनीं वापरण्याच्याच हेतूनें. कांहीं विद्वानांच्या मताप्रमाणें उज्जयिनीचे क्षत्रप सातवाहन राजांचे अंकित होते असें जरी गृहीत धरिलें तरी सातवाहनांच्या शिलालेखांत या संवत्सराचा उल्लेख कोठेंहि न आढळण्याचें कारण सांगणें कठीण आहे. क्षत्रप सातवाहनांचे अंकित. तेव्हां ते सातवाहनांचा संवत्सर वापरणें साहजिक आहे; पण सातवाहनांच्या शिलालेखांत त्यांच्याच संवत्सराचें वर्ष कां नसावें ? याला एकच उत्तर आहे व तें हें कीं जरी सातवाहनांची सत्ता क्षत्रपांच्यावरहि होती तरी ते आपलाच संवत्सर वापरीत असत; व सातवाहनांचा या संवत्सराशीं कांहींच संबंध नसल्यामुळें त्यांना आपल्या लेखांत शकवर्ष देण्याचें प्रयोजनच नव्हतें. येथें एक गोष्ट सांगणें जरूर आहे. उज्जयिनीचे क्षत्रप हे शक अगर कुशाण राजांचे क्षत्रप होते; सातवाहनांचे अंकित नव्हते, इतकेंच नव्हे तर सातवाहनांना महाराष्ट्राबाहेर त्यांनींच पिटाळून लाविलें असावें असें त्यांच्या शिलालेखांवरून दिसतें. महाराष्ट्रावर क्षत्रपांचें राज्य सुरू झाल्यावर येथेंहि त्यांनीं आपला संवत्सर सुरू केला असावा व तो लोकप्रसिद्ध झाल्यानंतर वर सांगितल्याप्रमाणें बुक्करायानें या संवत्सराचा पुनः नामकरणविधि करून 'शालिवाहन शक' म्हणून त्याचा अंगीकार केला असावा. येरवीं सातवाहनांचें या संवत्सरासंबंधें अज्ञान कां असावें हें समजणें कठीण आहे.

वास्तविक पाहतां 'शालिवाहन संवत्सर' हेंच नांव या संवत्सरास योग्य होतें; पण मूळ नांव लोकांच्या स्मरणांतून एकदम जाणें शक्य नव्हतें; म्हणूनच 'शालिवाहन शक' असें गंगाजमनी नांव

या संवत्सरास इ. सनाच्या चवदाव्या शतकांत दिलें असावें. अर्थात् यापूर्वींहि कांहीं शतकें ज्योतिषग्रंथांवरील टीकाकारांस 'शकनृपतिसंवत्सर' वगैरे नांवें आपल्या व्युत्पत्ति-ज्ञानाच्या कसरतीनें विक्रमादित्याला लावणें जसें भाग पडलें तशाच प्रकारची कसरत 'शालिवाहनशक' या नांवाच्या बाबतींत आतां करणें भाग पडलें. 'शालिवाहनसंवत्सर' या ऐवजीं 'शालिवाहनशक' हें नांव देऊन 'शक' म्हणजे संवत्सर असा अर्थ रूढ होण्यास बराच कालावधि लागला. शालिवाहन विख्यात राजा होता तेव्हां 'शक' म्हणजे समर्थ किंवा ऐश्वर्यवान् राजा असा अर्थ भाषाकोविदांनीं करण्याचा प्रयत्न केला. जयरामकवीनें आपल्या राधामाधवविलासचंपूंत याच अर्थानें 'शक' शब्दाचा प्रयोग केला आहे:—

युधिष्टिर विक्रम शालिवाहन शक ।
त्याहूनि राजा कीर्तिनें अधिक ॥

कै. राजवाडे यांनीं युधिष्ठिर, विक्रम व शालिवाहन या तीन कालप्रवर्तक राजांना जयराम येथें शक कां म्हणतो याचें विवेचन केलें आहे. व 'नामानि आख्यातजानि' या यास्काचार्यांच्या सिद्धांताच्या मदतीनें 'शक' याचा 'ऐश्वर्यवान् राजा' असा अर्थ 'शक ऐश्वर्ये' या धातूवरून कसा निघतो तें दाखविलें आहे. कसेंहि असो, जयरामाचा विवक्षित अर्थ 'ऐश्वर्यवान् राजा' असाच असावा यांत संशय नाहीं. मात्र त्या अर्थाचा उपयोग शालिवाहनशक या नांवाची यथार्थता दाखविण्याकरितांच फक्त झालेला दिसतो. कै. राजवाडे म्हणतात "जयरामाचा हा जर अभिप्राय सर्वत्र संमत झाला, तर पुराणेतिहासांतील एक गूढ कायमचें उकललें गेलें असा अर्थ होईल. कालप्रवर्तक राजा या अर्थाचा शक शब्द आणि अहिंदु अशा एक म्लेंच्छ जातीचा वाचक शक शब्द उच्चारांत सारखे असल्यामुळें, शालिवाहन शक या सामासिक शब्दाचा अर्थ करितांना अनेक संशोधक बुचकळ्यांत पडत आलेले आहेत. शकनृपकाल, शककाल, शके, शाके, इत्यादि शब्दांत म्लेंच्छ जे शक लोक त्यांच्या राजांचा कांहींतरी संबंध असावा असा साहजिक तर्क करून, कितीतरी पुराणेतिहाससंशोधकांनीं शककालाचा प्रारंभ म्लेंच्छ जे शक लोक त्यांच्या एखाद्या राजाच्या राज्यारंभाशीं जोडण्याचा खटाटोप केला आहे." मूळचीं शककाल, शकनृपतिकाल, हीं नांवें जयराम म्हणतो त्याच अर्थानें वापरण्यांत आलीं असावींत हें म्हणणें जरा धाष्टर्याचें दिसतें. शकसंवत्सराचें शालिवाहनशक असें नामकरण झाल्यानंतर एक-दोन शतकांनीं हा शक शब्दाचा अर्थ देणारा जयराम बरोबर का अजमासें इ. स. ९६६ त "शका नाम म्लेच्छजातीया राजानः" असें कंठरवानें सांगणारा ज्योतिर्विद भट्टोत्पल बरोबर तें ठरविणें वाचकांवरच आम्हीं सोंपवितों. ज्या वेळीं शककाल, शकनृपतिकाल अशीं नांवें प्रचारांत होतीं त्या वेळींच भट्टोत्पलानें हा अर्थ सांगितला. उलट जयरामाच्या वेळीं शककाल वगैरे शकांचाच संबंध दर्शविणारीं नांवें जाऊन शालिवाहन शक हें नांव प्रचारांत आलें होतें. वर सांगितल्याप्रमाणें 'शकनृप' याचा 'शक लोकांचा संहार करणारा' असा अर्थ ज्या कसरतीनें करण्यांत आला त्याच कसरतीचा हा दुसरा प्रयोग आहे यांत संशय नाहीं. जयरामाचा हा अर्थ शक शब्दाला पूर्वी नव्हता हें भट्टोत्पलाच्या उद्गारांवरून दिसेलच व जयरामानंतरहि हा अर्थ कोणी ग्राह्य धरला नाहीं हें शक या शब्दाचा रूढ अर्थ संवत्सर झाला आहे हें लक्षांत घेतां दिसून येईलच.

सातवाहन अगर शालिवाहन राजांच्या शिलालेखांतील वर्षे शकसंवत्सरांत दिलेलीं नाहींत ही एकच गोष्ट हा संवत्सर त्या राजांपैकीं कोणीहि स्थापन केला नाहीं हें शाबीत करण्यास पुरेशी आहे. तरीहि शालिवाहन राजांपैकीं कोणत्या राजानें हा शक सुरू केला असण्याचा संभव आहे त्याचा आपण आतां विचार करूं. पुराणांतील भविष्यद्राजवर्णनाप्रमाणें सातवाहन कुलांत एकंदर एकतीस राजे झाले असावेत; त्यांपैकीं इ. स. ७८ च्या सुमारास जो राजा राज्य करीत असावा त्याचेवरच शकसंवत्सराचें जनकत्व लादणें शक्य आहे. पुलुमायी व चष्टण हे समकालीन होते असें वर दाखविलें आहेच. चष्टणाचा नातू रुद्रदामन् याचा शके ५२ (इ. स. १३०) चा शिलालेख उपलब्ध आहे. अर्थात् त्यापूर्वी अदमासें ५२ वर्षें रुद्रदामाचा आजा चष्टण उज्जयिनीचा क्षत्रप असावा व सातवाहनांपैकीं पुलुमायी अगर त्याचा बाप गौतमीपुत्र सातकर्णी हे पैठण येथें राज्य करीत असावेत. पुलुमायी व गौतमीपुत्र सातकर्णी या दोघांचेहि शिलालेख उपलब्ध आहेत. त्यांत शक लोकांचा नाश गौतमीपुत्रानें केल्याचा उल्लेख आहे. पुलुमायीच्या वेळेस टोलेमीच्याच म्हणण्याप्रमाणें उत्तरेस उज्जयिनीचा पहिला क्षत्रप चष्टण राज्य करीत असल्यामुळें व चष्टणाचें घराणें पुढेंहि एकदोन शतकें अबाधित राज्य करीत राहिल्यामुळें, शक लोकांचा संहारकर्ता पुलुमायी असणें शक्य नाहीं. उलट गौतमीपुत्राच्या आईनें नाशीक येथील शिलालेखांत आपल्या मुलाचा राज्यविस्तार, त्याचे पराक्रम वगैरेंचें जें जें वर्णन केलें आहे त्यावरून गौतमीपुत्र हा सातवाहन घराण्यांतील अतिविख्यात राजा होऊन गेला हें निर्विवाद दिसून येईल. गौतमीपुत्रानें शक लोकांचा पराभव केला व त्याच्या राज्यविस्तारांत उज्जयिनीचा प्रांतहि होता असें त्या शिलालेखावरून कळतें. अर्थात् शक लोकांचा पराभव करून 'शालिवाहन शक' स्थापन करणारा एकटा गौतमीपुत्रच असूं शकेल. पण गौतमीपुत्राच्या शिलालेखांत या संवत्सराच्या वर्षांचा उल्लेख आढळून येत नाहीं; त्याच्या आईनें पुत्रवात्सल्यानें केलेल्या विस्तृत व रसभरित वर्णनांतहि या गौतमीपुत्राच्या शकप्रवर्तकत्वाचा उल्लेखहि नाहीं. गौतमीपुत्राचे एकंदर तीन शिलालेख उपलब्ध आहेत. दोन नाशीक येथें व एक कार्लें येथें. याशिवाय वर उल्लेखिलेला त्याच्या आईचा शिलालेखहि नाशीक येथें आहे. गौतमीपुत्राचा पहिला शिलालेख त्याच्या राज्यारंभापासून १८ व्या वर्षांत आहे. त्यांत गौतमीपुत्र आपणांस बेनाकटकस्वामी म्हणवितो व त्या शिलालेखांतील दानाचा हुकूम त्यानें आपल्या विजयस्कंधावारांतून पाठविला आहे. कार्लें येथील लेखहि अशाच प्रकारचा आहे. दोनहि हुकूम एकाच अमात्यास असावेत; नाशीक येथें त्याचें शिवगुप्त असें नांव आहे व कार्लें येथें शिवस्कन्दगुप्त असें नांव आहे. गौतमीपुत्राचे पूर्वी महाराष्ट्रावर जुन्नरच्या क्षहरात क्षत्रपांचें राज्य होतें व हे दोनहि हुकूम गौतमीपुत्रानें या क्षत्रपांचा पराभव केल्यानंतर आपल्या विजयी सैन्याच्या छावणींतून पाठविले असावेत. नाशिकच्या १८ व्या वर्षांतील लेखासंबंधें प्रो. रॅप्सन् म्हणतातः—

"There can be little doubt in any case that it indicates the recent transfer of the government in the Nasik Dist. from the Kshaharatas to the Andhras" व गौतमीपुत्रहि आपणास बेनाकटकस्वामी म्हणवितो यावरूनहि असें दिसतें कीं या विजयापूर्वी तो बेनाकटकावर म्हणजे दक्षिण महाराष्ट्रांत कृष्णाकांठच्या प्रांतावर राज्य करीत असावा.

अर्थात् गौतमीपुत्रानें राज्याभिषेकानंतर १८ वर्षांनीं क्षहरात शकांचा पराभव केला असावा; पण नाशिकच्या त्याच्या दुसऱ्या लेखांत त्याच्या राज्याभिषेकापासून २४ व्या वर्षाचा उल्लेख आहे. तेव्हां क्षहरात शकांचा पराभव केल्यानंतर सहा वर्षेपर्यंत तरी आपल्या विजयाप्रीत्यर्थ संवत्सर सुरू करावयाचें त्याला सुचलें नव्हतें. शिवाय जर शकांचा पराभव केला त्यावेळीं गौतमीपुत्रानें हा संवत्सर सुरू केला असता तर त्याच्या विजयानंतर तत्प्रीत्यर्थ दिलेल्या या १८ व्या वर्षातील दानपत्रांत हा संवत्सर सुरू केल्याचा उल्लेख असणें उचित होतें. गौतमीपुत्रानंतर त्याचा मुलगा पुलुमायी देखील आपल्या राज्याभिषेकापासूनचींच वर्षे शिलालेखांत देतो. यावरून शकसंवत्सराचें प्रवर्तकत्व गौतमीपुत्राकडे येणें शक्य नाहीं हें स्पष्ट दिसून येईल. गौतमीपुत्राच्या शिलालेखांतील राज्याभिषेकसंवत्सर हाच पुढें शकसंवत्सर झाला असणेंहि शक्य नाहीं; कारण राज्याभिषेकसंवत्सराच्या १८ व्या वर्षी त्यानें शकांचा पराभव केला. सारांश, गौतमीपुत्र इ. स. ७८ च्या सुमारास गादीवर आला असें जरी गृहीत धरलें तरी शकसंवत्सराचें प्रवर्तकत्व त्याचेकडे येणें शक्य नाहीं हें स्पष्ट आहे.

कांहीं विद्वानांच्या मतें गौतमीपुत्रानें इ. स. १२४ च्या सुमारास क्षहरातांचा पराभव केला. उपलब्ध सर्व पुराव्यांचें नीट परीक्षण केलें असतां हें मत विशेष ग्राह्य ठरत नाहीं. नहपानक्षत्रपाच्या एका शिलालेखांत ४६ व्या वर्षाचा उल्लेख आहे; व गौतमीपुत्रानें शकांचा संहार केल्याची हकीगत नाशीक येथील शिलालेखांत सांगितली आहेच. सेहचाळिसावें वर्ष शकसंवत्सराचें धरून तेंच नहपानाचें शेवटलें उपलब्ध वर्ष असल्यामुळें इ. स. १२४ त गौतमीपुत्रानें नहपानाचा पराभव केला अशी आजपर्यंतची दृढ समजूत होती. पण नहपानाच्या शिलालेखांतील अक्षरांच्या धाटणीवरून, व इतर अनेक कारणांमुळें नहपान खिस्तपूर्व पहिल्या शतकाच्या शेवटीं झाला असावा हेंच मत अधिक ग्राह्य ठरूं पहात आहे. नहपानानंतर त्याच्या वंशजांनीं कांहीं वर्षे राज्य केल्यानंतर वर सांगितल्याप्रमाणें इ. स. ७८ –८० च्या सुमारास गौतमीपुत्रानें नहपानाच्या वंशाचा उच्छेद केला व महाराष्ट्रांत स्वराज्य-संस्थापना केली असें म्हणणेंच एकंदर पुराव्यांचें परीक्षण करितां भाग आहे. गौतमीपुत्रानें शकांचा पराभव केल्यानंतर थोड्याच वर्षांनीं कर्दमक घराण्यांतील चष्टणानें माळवा प्रांत फाबीज करून त्यावर आपली सत्ता बसविली. पुढील इतिहास वर आलाच असल्यामुळें त्याचा पुनरुच्चार येथें करीत नाहीं. शकसंवत्सराचें प्रवर्तकत्व गौतमीपुत्रास कां देतां येत नाहीं या प्रश्नावरील विवेचनाचें आकलन होण्यास येवढी हकीगत पुरेशी आहे; नहपानाच्या कालासंबंधें जास्त विस्तृत विचार येथेंच करणें अप्रस्तुत होईल.

शकसंवत्सराच्या प्रवर्तकत्वाचा मान शालिवाहन राजांपैकीं आणखी कोणास जर मिळाला असेल तर तो हालासच होय. पुराणांतील भविष्यद्राजवर्णनांतील हा सतरावा राजा आहे. हाल सातवाहनाची स्मृति त्याच्या गाथासप्तशतीमुळेंच चिरकाल टिकली असून गौतमीपुत्रापूर्वीचा तो एकटाच विख्यात शालिवाहन राजा असल्यामुळें कांहीं संशोधकांनीं शकसंवत्सराचें जनकत्व त्याला देण्याचा प्रयत्न केला आहे. आपणांस हालांचा काल ठरविण्यास कांहींच साधनें उपलब्ध नाहींत; पुराणांतील भविष्यद्राजवर्णनच पहावयाचें तर गौतमीपुत्राच्या पूर्वी चाळीसपन्नास-

र्षे तरी हाल होऊन गेला असें म्हणणें भाग आहे. गौतमीपुत्र इ. स. १२४ च्या सुमारास राज्य करीत होता असें आपण समजलों तर हालास इ. स. ७८ च्या सुमारास आणून त्याजवर शकसंवत्सराचें जनकत्व लादतां येईल. पण उज्जयिनीचा क्षत्रप चष्टण व सातवाहन राजा पुलुमायी हे समकालीन होते व अन्धौ येथील शिलालेखावरून चष्टणाचा नातू रुद्रदामन् हा इ. स. १३० च्या सुमारास राज्य करीत होता या दोन गोष्टी निर्विवाद सिद्ध झाल्यानंतर पुलुमायीचा बाप गौतमीपुत्र यानें इ. स. १२४ च्या सुमारास राज्य केलें हें म्हणणें हास्यास्पद ठरेल. हाल इ. स. ७८ च्या सुमारास झाला हा सिद्धांतच मूळ ज्या पायावर उभारला तो पायाच असा डळमळींत ठरल्यानंतर हालाकडे ग्रंथकर्तृत्वाखेरीज कोणताहि मान येणें शक्य नाहीं. शृंगारिक गाथा लिहिण्यांत अगर संकलित करण्यांत दंग झालेल्या या राजाला शकांचा पराभव करून दिग्विजय करण्यास अवसरच मिळाला नसेल. गाथासप्तशतीवरून हाल हा एक ऐषआरामी व शृंगारप्रिय राजा असावा असें दिसतें; व असले राजे काय काय पराक्रम करूं शकतील तें कोणत्याहि राष्ट्राचा इतिहास सांगूं शकेल. हालाच्या सप्तशतींतून बरीच माहिती मिळूं शकते, पण त्यांत हालाच्या या पराक्रमाचा कोठेंच उल्लेख नाहीं, त्या वेळीं महाराष्ट्रांत हैदोस घालणाऱ्या शकांचा उल्लेख नाहीं, अगर युधिष्ठिराचें अनुकरण करून स्वतःच्या नांवानें सुरू केलेल्या संवत्सराचाहि कोठें पत्ता नाहीं. एकंदरींत हालानें हा संवत्सर सुरू केला असेल हें शक्य दिसत नाहीं. व हालाचे बाबतींत असें मत देण्याची पाळी आली म्हणजे मग शालिवाहन राजांपैकीं कोणींहि हा संवत्सर सुरू केला नाहीं असेंच म्हणणें भाग आहे. कारण कोणत्यातरी शालिवाहन राजावर शकसंवत्सराचें जनकत्व लादण्याच्या हेतूनें संशोधन करून आजपर्यंत संशोधकांना असे दोनच राजे सांपडले आहेत कीं जे 'शककर्ते' होते असें म्हणणें अगदींच हास्यास्पद ठरणार नाहीं.

शालिवाहन राजांपैकीं कोणींहि शकसंवत्सर सुरू केला नाहीं असें ठरल्यानंतर तो मग कोणीं सुरू केला असेल या प्रश्नाचा विचार करणें क्रमप्राप्तच आहे. पण त्यापूर्वी शकसंवत्सराच्या प्रवर्तकत्वाचा मान शालिवाहनांनाच देणें कां इष्ट आहे याविषयीं कै. राजवाड्यांनीं केलेल्या विवेचनाचा विचार करूं. कै. राजवाड्यांच्याच मताची ज्ञानकोशकारांनीं री ओढून 'शालिवाहन शक' शक नांवाच्या म्लेंच्छ राजांनीं स्थापिला असें भांडारकरादि विद्वानांचें म्हणणें त्यांना चुकीचें कां वाटतें त्याचीं तीन कारणें दिलीं आहेत. पहिलें कारण असें कीं शककाल ज्याअर्थी धर्मकृत्यांत ग्राह्य धरला जातो त्याअर्थी तो कोणातरी हिंदु राजानें स्थापिलेला असला पाहिजे. अर्थात् धर्मकृत्यांत जें जें ग्राह्य धरलें आहे तें सर्व 'स्वदेशी' असून परकीयांकडून घेतलेलें नाहीं असेंच आपणांस समजणें भाग आहे. शककालाचा उल्लेख ज्योतिषग्रंथांत वराहमिहिरानेंच प्रथम केला; जर हा स्वकीयांनीं स्थापिलेला संवत्सर होता तर यापूर्वींच तो रूढ कां झाला नाहीं? वर आम्ही सुचविल्याप्रमाणें शकसंवत्सराचें पुनः नामकरण करून, तो धर्मकृत्यांत ग्राह्य धरून, जनतेला शालिवाहनाच्या पराक्रमाची आठवण देऊन, राष्ट्रीय वृत्ति जागृत करण्याकडे व धर्मसंरक्षणाच्या कर्तव्याची जाणीव उत्पन्न करण्याकडे त्याचा उपयोग करण्यांत आला. तेव्हां धर्मकृत्यांत शककाल आपण ग्राह्य धरतों म्हणून तो

शालिवाहनप्रवर्तित आहे असेंच समजणें अपरिहार्य कसें ठरेल ? शिवाय आपल्या धर्मकृत्यांत परकीय गोष्टी आपण ग्राह्य धरल्या नाहींत असेंहि नाहीं. राशी आम्ही ग्रीक लोकांपासूनच घेतल्या. इ. स. पूर्व ४५० च्या सुमारास त्या घेतल्या गेल्या असें 'भारतीय ज्योतिःशास्त्रांत' दर्शविलें आहे. मग ग्रीक लोकांच्या राशी आमच्या धर्मकृत्यांत ग्राह्य ठराव्यात व शकांचा संवत्सर मात्र ठरूं नये हें शक्य आहे काय ? राशींच्या काय अगर शकसंवत्सराच्या काय, दोनहि बाबतींत प्रथम आमच्या ज्योतिषशास्त्रज्ञांनीं त्यांचा अंगीकार केला व पुढें हळू हळू त्यांचा आमच्या धर्मकृत्यांत प्रवेश झाला. शकसंवत्सराचीं वर्षे आपल्या नाण्यांवर व शिला-लेखांत देणाऱ्या उज्जयिनीच्या क्षत्रपाची राजधानी हीच आमच्या अर्वाचीन आर्य ज्योतिषाचें उगमस्थान होय. वराहमिहिरानें आपली पंचसिद्धांतिका शके ४२७( इ. स. ५०५ )मध्यें लिहिली. त्यावेळीं जरी क्षत्रपांचें राज्य गेलें असलें तरी त्या प्रांतांत शककाल रूढ करून तें गेलें होतें. तेव्हां वराहमिहिरानें बाकीचे सर्व संवत्सर टाकून शकसंवत्सराचाच अंगीकार केला असल्यास तें अगदीं साहजीक होतें. त्यानंतर या संवत्सराच्या नांवाचे व त्याच्या उत्पत्ती-विषयींच्या कथेचे रंग निरनिराळ्या वेळीं कसे पालटले तें आपण पाहिलेंच आहे. पुढें काला-वधीनें आमच्या धर्मकृत्यांतहि या संवत्सराचा शिरकाव झाला. इतर परकीय काल धर्मकृत्यांत आले नाहींत याचें कारण एकच कीं त्यांचा ज्योतिषशास्त्रांत शिरकाव झाला नाहीं. राजकीय परिस्थितीमुळें शकसंवत्सराचा मात्र शिरकाव झाला; व राष्ट्रीय वृत्ति पुनः एकदां जागृत झाल्यावर ही गोष्ट लज्जास्पद वाटली म्हणूनच कीं काय, शकसंवत्सराला देशी पेहेराव चढवि-ण्यांत आला. जनतेंत कित्येक शतकें रूढ झालेला संवत्सर परकीय म्हणून त्याज्य ठरविण्यापेक्षां त्याला देशी पेहेराव चढविण्याची ही बुकरायाची युक्ति सफल झाली यांत संशय नाहीं.

कै. राजवाड्यांचा व ज्ञानकोशकारांचा दुसरा मुद्दा असा कीं शक या शब्दाचे दोन अर्थ आहेत; एक अर्थ म्लेंच्छ लोक असा असून दुसरा अर्थ मात्र शालिवाहन अगर शातवाहन राजे असा आहे. हा दुसरा अर्थ कसा निघतो तें कळणें कठीण; परंतु जयराम कवीनें सूचित केल्याप्रमाणें 'शक ऐश्वर्ये' या धातूपासून ऐश्वर्यवान् ( राजा ) असा अर्थ निघूं शकेल. शक म्हणजे म्लेंच्छ या जयरामापूर्वी कित्येक शतकें रूढ झालेल्या अर्थास त्याज्य ठरविण्यास सबळ कारणें कांहीं नाहींत हें आम्हीं वर दर्शविलें आहेच. नाणेघाटांतील एका लेण्यांत 'कुमारो हकुसिरि' असा लेख आहे व हकुसिरि म्हणजे कल्पप्रदीप नांवाच्या जैन ग्रंथांत सांगितलेला सातवाहनाचा मुलगा शक्तिकुमार अथवा शक्तिश्रीच असावा. कै. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणें 'हकु' हा शब्द 'शकु' या शब्दाचें दुसरें रूप आहे असें गृहीत धरलें तरी येवढ्यावरूनच 'शक' या शब्दाचा या शिलालेखानंतर सुमारें दीड हजार वर्षांनीं दिलेलाच अर्थ ग्राह्य ठरविणें अत्यंत धाष्ट्र्याचें होईल.

तिसरा मुद्दा असा कीं "प्रायः म्लेंच्छ लोक ज्या प्रांतांत जात त्या प्रांतांतील प्रचलित असलेला काल प्रथम योजीत. जसें इंग्रज तीस वर्षांपूर्वी फसली किंवा हिजरी सनानें कालगणना करीत. शक, पारद, यवन वगैरेंचीं राज्यें हिंदुस्थानांत फार वर्षे न टिकल्यामुळें त्यांना आपले सन (असलेच तर) इकडे प्रचलित करण्यास प्रायः अवधि व स्वास्थ्य सांपडलें नाहीं. यांपैकीं

पाहिलें एकच कारण शककाल म्लेंच्छस्थापित नाहीं असें म्हणण्यास वस्स आहे." कदाचित् आरंभीं शकक्षत्रप युधिष्ठिरसंवत् योजीत असतील; पण पुढें तीनशेंवर वर्षें त्यांचें राज्य टिकल्यावर तें फार वर्षें टिकलें नाहीं व त्यांचा संवत्सर सुरू करण्यास त्यांना अवसर मिळाला नसावा हें म्हणणें निव्वळ अज्ञानमूलक होय. शक राजांनीं संवत्सर सुरू केले होते यांत मुळींच संदेह नाहीं. तक्षिला येथें नुकत्याच सांपडलेल्या एका लेखांत शक राजा अँझेस् याच्या संवत्सराचा उल्लेख आहे; तेव्हां संवत्सर सुरू करण्याचा मक्ता फक्त हिंदवासीयांकडेच नव्हता हें दिसून येईल. शिवाय शकसंवत्सर रूढ होण्यास तीनशें वर्षे हा पुरेसा अवधि नव्हता अशी शंका येणें कठीण आहे. ज्या शकांच्या अमदानींत यवन व भारतीय ज्योतिषशास्त्रवेत्त्यांनीं आपली विद्या एकत्र केली व राश्यंशादिघटित ग्रहगणितास प्रारंभ केला, ज्यांच्या अमदानींत यवनज्योतिषाच्या मदतीनें अर्वाचीन आर्यज्योतिष तयार झालें व याच्या स्मरणार्थ ज्यांच्या राजधानीच्या रेखांशास शून्य रेखांश मानितात व ज्यांच्या आश्रयामुळेंच या विद्येची अभिवृद्धि झाली त्या शक क्षत्रपांना त्यांच्या तीन शतकांच्या अमदानींत त्यांचा संवत्सर रूढ करण्यास अवधि अगर स्वास्थ्य मिळालें नाहीं हें म्हणणें हास्यास्पद आहे. आरंभीं जरी शक क्षत्रपांनीं त्यांचा संवत्सर लोकांवर लादला नसला तरी तीन शतकांच्या अवधींत हा प्रयत्न त्यांनीं केव्हां तरी केला असेलच. सारांश शकसंवत्सराचें प्रवर्तकत्व शालिवाहनाकडेच आलें पाहिजे म्हणून सांगितलेलीं हीं तीनहि कारणें फोल आहेत. 'शालिवाहन शक' शालिवाहन राजांपैकीं कोणीहि सुरू केला नाहीं; या संवत्सराचें प्रवर्तकत्व त्यांच्यावर चवदाव्या शतकांत लादण्यांत आलें असावें हेंच जास्त संभवनीय आहे.

शकसंवत्सर शालिवाहन राजांनीं तर सुरू केला नाहींच, तर मग तो मान कोणाकडे जातो या प्रश्नाचा विचार पुढील लेखांत करूं. या प्रश्नावर संशोधकांमध्यें जितके तीव्र मतभेद आहेत तितके प्राचीन इतिहासांतील फारच थोड्या प्रश्नांवर असतील; व म्हणूनच त्यांचा विचार करणें पुढील लेखावर टाकणें भाग आहे.

हे अश्वा, वायु व मनु व सत्तावीस गंधर्व हे तुला रथाला जोडीत आहेत. ते अश्वाला पूर्वकाळीं (अग्रे) रथाला जोडते झाले आणि त्याच्यामध्यें वेग घालते झाले.

येथें 'वा'चा अर्थ 'आणि' असा आहे.

**अह इति च ह इति च विनिग्रहार्थीयौ पूर्वेण संप्रयुज्येते**

अह व ह हे दोन निपात दोन वाक्यांपैकीं पहिल्या वाक्यांत घालतात व जेथें विनिग्रह म्हणजे वेगळेपणा किंवा भेद दाखवावयाचा असतो तेथें त्यांचा उपयोग करितात.

**अयम् अह इदं करोतु अयम् इदम्**

ह्याला हें काम करूं द्या आणखी ह्या दुसऱ्याला हें करूं द्या.

**इदं ह करिष्यति इदं न करिष्यति इति**

हा हें काम करील, हें करणार नाहीं.

**अथापि उकारः एतस्मिन् एवार्थे उत्तरेण संप्रयुज्यते**

उ हाही निपात ह्याच अर्थी म्हणजे भेद दाखविण्यासाठीं वापरला जातो. परंतु दोन वाक्यांपैकीं दुसऱ्या वाक्यांत त्याचा उपयोग करितात.

**मृषा इमे वदन्ति सत्यम् उ ते वदन्ति इति**

हे खोटें बोलतात, परंतु ते खरें बोलतात.

**अथापि पदपूरणः (भवति)**

शिवाय 'उ' हा पादपूरणासाठीं घालतात.

**इदमु त्यत्० पुरस्तात् तमसः ० अस्थात् (ऋ० सं० ४।५१।१)**

ही ती प्रकाशणारी उषा अंधकारामधून पूर्वदिशेकडे बाहेर येत आहे.

**तदु प्रयक्षतममस्य कर्म (ऋ० सं० १।६२।६)**

ह्या इंद्राचें तें कृत्य अतिशय स्तुत्य (प्रयक्षतमं) आहे.

ह्या दोन्हीं उदाहरणांत 'उ' हा पदपूरणार्थ आहे.

**हि इति एषः अनेककर्मा**

हि ह्या निपाताचे अनेक अर्थ आहेत. अ बला म्हणतो हा हें काम करील. तेव्हां ब म्हणतो

**इदं हि करिष्यति इति हेत्वपदेशे**

"तुम्हाला वाटतें हा हें करील?" ह्या वाक्यांत हि ह्यानें हें काम करण्याला हा योग्य नाहीं (हेत्वपदेशे = हेतोः अपदेशे) हा अर्थ दाखविला जातो.

तेव्हां अ पुनः म्हणतो, मला वाटतें हा करील, तेव्हां ब म्हणतो

**कथं हि करिष्यति इत्यनुपृष्टे**

हा कसें करील हो? हा प्रश्न अनें जें पुनः म्हटलें त्याला उत्तर म्हणून आहे.

**कथं हि व्याकरिष्यति**

हा कसें करील, सांगा. असें ब हेवा [असूयायां] दाखवण्यासाठीं दांत-

ओठ खाऊन मोठ्यानें म्हणतो.

**किल इति विद्याप्रकर्षे**

किल हा निपात बोलणारा आपल्याला विशेष प्रकारची माहिती किंवा ज्ञान आहे हें दाखवण्याकरितां घालतो

**एवं किल**

( तद् आसीद् युद्धम् )=(तें युद्ध)अशा प्रकारचें (झालें).

येथें बोलणारा युद्धांत हजर असून त्याचें खात्रीलायक वर्णन करतो. हें किल निपातानें दाखविलें जातें.

ह्या विधानाबद्दल शंका येऊन ऐकणारा विचारतो

**अथापि न ननु इति एताभ्यां संप्रयुज्यते**

असें खात्रीनें ( किल ) नसेल ( न किंवा ननु ) झालें.

ह्याप्रमाणें शंका येऊन प्रश्न केला असतांना किल हा शब्द न किंवा नु ह्याला जोडून घालतात ( संप्रयुज्यते ).

**मा इति प्रतिषेधे**

मा ह्याचा प्रतिषेध म्हणजे निषेध दाखवण्यासाठीं उपयोग करितात. जसें

**मा कार्षीः**=करूं नकोस, **मा हार्षीः इति च**=नेऊं नकोस.

**खलु इति च ( प्रतिषेधार्थे )**

खलु ह्याचाही निषेध दाखवण्याकरितां उपयोग करितात. जसें

**खलु कृत्वा**

**न करून**

**खलु कृतम्**

**न केलेलें.**

**अथापि पदपूरणः एवं खलु तद् बभूव इति**

खलु पदपूरणाकरितांही ( अपि ) घालतात.जसें, असें तें झालें. ह्या ठिकाणीं खलु पदपूरण आहे असें यास्क समजतो. परंतु खरोखर (खलु) असें झालें असाही अर्थ होईल.

**शश्वत् इति विचिकित्सार्थीयः भाषायाम्.**

चालू संस्कृतांत शश्वत् हा जेथें विचारनिश्चय दर्शवावयाचा असतो तेथें घालतात. एकजण दुसऱ्याला विचारतो 'कांहो असें झालें ?' तेव्हां दुसरा म्हणतो

**शश्वदेवम् इत्यनुपृष्टे**

हो, असें झालें. जेव्हां प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें असतें तेव्हां असा प्रयोग करितात.

**एवं शश्वत् अस्वयंपृष्टे**

वरच्याच्या उलट एवं शश्वत् असा जेव्हां प्रयोग करितात तेव्हां आपण दुसऱ्याला प्रश्न न घालतां तिसरा जेव्हां विचारतो तेव्हां असा प्रयोग करितात.

टीपः—हे बोलण्याचे सर्व प्रकार वैदिक वाङ्मयांतले नाहींत. ते यास्ककालीन संस्कृतांतले असावेत. म्हणून 'शश्वदिति विचिकित्सार्थीयो भाषायाम्' येथेंच फक्त भाषायां घालून चालणार नाहीं. बोलण्यांतील ह्या प्रकाराचें खरें रहस्य आपणांस कळणें अशक्य आहे.

**नूनमिति विचिकित्सार्थीयो भाषायाम्**

निश्चय दाखविण्याकरितां नूनं ह्याचा उपयोग चालू संस्कृतांत करितात.

**उभयम् अन्वध्यायम्**

पण वेदांत दोन्हीं कारणाकरितां म्हणजे निश्चय दाखवण्याकरितां आणि पादपूरण करण्याकरितां त्याचा उपयोग करितात.

**विचिकित्सार्थीयश्च पदपूरणश्च**

'नूनम्' हा विचिकित्सा दाखवितो व पादपूरकही होतो.

टीपः—विचिकित्सार्थीयश्च पदपूरणश्च हे दोन शब्द मागाहून कोणीतरी घुसडले असावेत. कारण उभयमन्वध्यायं यामध्यें त्यांचा अंतर्भाव होतो.

**अगस्त्य इन्द्राय हविर्निरुप्य मरुद्भ्यः संप्रदित्सांचकार**

तुला हवि देतों असें इंद्राला वचन देऊन अगस्त्यानें मरुतांना तो हवि देण्याची इच्छा दर्शविली तेव्हां

**स इन्द्र एत्य परिदेवयांचक्रे**

इंद्रानें अगस्त्याकडे येऊन ( आ इत्य ) रडून तक्रार केली ( परिदेवयांचक्रे ).

टीपः—ऋचा रचण्याला जें कारण होतें त्या कारणाला निदान अशी संज्ञा आहे. अगस्त्य इन्द्राय वगैरे पुढील ऋचेचें निदान होय. पण खरोखर पाहतां मरुतांची इंद्राबद्दल अगस्त्यापाशीं ही तक्रार होय.

## खंड ६ वा.

**न नूनमस्ति नो श्वः कस्तद्वेद यदद्भुतम् ।**
**अन्यस्य चित्तमभिसंचरेण्यमुताधीतं विनश्यति ॥** [ ऋ० सं० १।१७०।१ ]

**न नूनम् अस्ति अद्यतनम्**

खात्रीनें आजचा हवि तर नाहींच.

**नो एव श्वस्तनम्**

उद्यांचाही नाहींच.

**अद्य अस्मिन् द्यवि**

'अद्य' शब्द कसा झाला ? अद्य = अ + द्य. अ = अस्मिन्, द्य = द्यवि. अस्मिन् द्यवि = ह्या दिवशीं.

**द्युः इति अह्नो नामधेयं द्योतते इति सतः**

'द्यु' हें दिवसाचें नाम आहे. 'द्यु' हा शब्द कशापासून झाला ? द्युत् धातूपासून. कारण दिवस प्रकाशतो ( द्योतते ).

**श्वः उपाशंसनीयः कालः**

अनुक्रमणिका

श्वः (= उद्यां) हा शब्द कसा झाला? तो उप + आ + शंस् ह्यापासून झाला आहे, म्हणजे त्या काळाची म्हणजे उद्यांची वाट पहावयाची असते.

**ह्यः हीनः कालः**

ह्यः हा शब्द कसा झाला? तो 'हा' धातूपासून झाला आहे. कारण तो टाकलेला (हीनः) म्हणजे गेलेला काळ असतो.

**कः तद् वेद यद् अद्भुतम् = कः तद् वेद यद् अभूतम्**

जें झालेलें नाहीं (अभूतम्) म्हणजे जें व्हावयाचें आहे तें होईल म्हणून कोण जाणतो? तें होईलच अशी कोण खात्री बाळगतो?

**इदमपि इतरत् अद्भुतम् अभूतमिव**

वैदिक भाषेहून भिन्न अशा लौकिक भाषेमध्यें जो अद्भुत शब्द आहे तोही न झाल्यासारखाच या अर्थी आहे. बोलण्यांत आपण नेहमीं म्हणतो कीं ही अद्भुत गोष्ट झाली. कोणचीही गोष्ट अद्भुत असल्यास तिच्यावर सहसा विश्वास बसत नाहीं; ती न झाल्यासारखीच असते. अद्भुतं = अभूतम्.

**अन्यस्य चित्तम् अभिसंचरेण्यम् अभिसंचारि**

अभिसंचरेण्यम् = अभिसंचारि.

दुसऱ्याचें मन हें नेहमीं चलबिचल करणारें असतें. म्हणजे माणसाचे विचार भराभर बदलत असतात. अभिसंचरेण्य हा शब्द अभि + सम् + चर् ह्याला 'एण्य' हा प्रत्यय लागून झाला आहे.

**अन्यः नानेयः**

अन्य शब्द कशापासून झाला आहे? अन्यः = अ + न्यः. अ म्हणजे न, आणि न्यः म्हणजे (आ) नेयः. म्हणजे परक्या मनुष्याला सज्जनांनीं घरांत आणूं नये (न आनेयः); कारण न जाणों तो वाईट मनुष्य असेल. दुर्गाचार्य नानेयः ह्याचा दुसरा अर्थ करितात तो असा:—नानेयः = नानात्वेन व्यवस्थितस्य अपत्यम् असत्कुलप्रसूतः = बाहेरख्यालीं मनुष्याचा किंवा चंगीभंगी मनुष्याचा (नानात्वेन व्यवस्थितस्य) मुलगा म्हणजे वाईट कुलांत जन्मलेला.

टीपः—ह्या व्युत्पत्ति कांहींतरी आहेत; त्यांत कांहीं अर्थ नाहीं.

**चित्तम् चेततेः**

चित्त हा शब्द 'चित्' विचार करणें, जाणणें ह्या धातूपासून झाला आहे.

**उत आधीतं विनश्यति = अपि आध्यातं विनश्यति**

शिवाय मनांत आणलेलें नाहींसें होतें. अमकें करावयाचें म्हणून मनुष्य मनांत आणतो परंतु तें लगेच विसरतो.

**आध्यातम् अभिप्रेतम्**

आध्यातम् = अभिप्रेतम् = मनांत ठरविलेलें.

टीपः—यास्क 'आधीतं' शब्द हा 'आध्यातं' असें समजतो म्हणजे तो ध्यै धातूपासून झाला

आहे असें समजतो. ती त्याची चूक आहे. तो शब्द आ+धी म्हणजे ध्यानांत आणणें ह्यापासून झाला आहे.

सबंध ऋचेचा अर्थः—

आज तर नाहींच; उद्यांही नाहीं; कारण जें घडून आलें नाहीं तें घडेल असें कोण खात्रीनें सांगेल? उद्यांचा दिवस अजून यावयाचा आहे. तेव्हां उद्यां अमुक एक गोष्ट घडणार हें कोणीं खात्रीनें सांगावें? बोलून चालून दुसऱ्याचें मन अस्थिर असणारच. शिवाय मनांत ठरविलेली गोष्ट मनांतून नाहींशी होते. तेव्हां आम्हांला हवि मिळेल हें कशावरून?

## खंड ७ वा

**अथापि पदपूरणः**

नूनं हा निपात पदपूरणही आहे.

**नूनं सा ते प्रति वरं जरित्रे दुहीयदिन्द्र दक्षिणा मघोनी ।**
**शिक्षा स्तोतृभ्यः माति धग्भगो नो बृहद्वदेम विदथे सुवीराः** ( ऋ० सं० २।१६।९ )

भाष्यांत यास्कानें नूनं शब्द पदपूरण असल्याकारणानें गाळला आहे.

**सा** = ती. **ते** = तुझी. प्रति + दुहीयत् = **प्रतिदुग्धाम्** = दूध देवो म्हणजे देवो. प्रति याचा अर्थ मोबदला. मोबदल्यानें देवो. स्तोता स्तुति देतो म्हणजे करतो; त्याचा मोबदला म्हणून स्तुति केलेला देव धन वगैरे देतो. **वरं** = उत्तम वस्तु. **जरित्रे** = स्तुति करणाऱ्याला. **वरः** शब्द वृ धातूपासून झाला आहे. वृ म्हणजे पसंत करणें. **वरयितव्यो भवति** = पसंत करावयाचा असतो. आपल्याला जी गोष्ट पाहिजे आहे ती मागावयाची असते. **जरिता** = **गरिता** = स्तवन करणारा. जृ धातूचा पाणिनीय संस्कृतामध्यें स्तुतिकरणें असा अर्थ नाहीं. तसा अर्थ वेदांत आहे. म्हणून जृबद्दल गृ धातु घावा लागला. **दक्षिणा मघोनी** = धनयुक्त दक्षिणा. मघोनी=**मघवती** = धनयुक्त. **मघम् इति धननामधेयम्** = मघ हें धनाचें एक नांव आहे. **मंहतेर्दानकर्मणः** = 'मघ' शब्द 'मंह्' देणें, ह्यापासून झाला आहे. **दक्षिणा दक्षतेः समर्धयतिकर्मणः** = दक्षिणाशब्द ज्या धातूचा अर्थ समृद्ध करणें, पूर्ण करणें, असा आहे अशा दक्ष् धातूपासूनझाला आहे. **व्यृद्धं समर्धयति इति** = व्यृद्धं (वि+ऋद्धम्) म्हणजे ऋद्ध किंवा पूर्ण नसेल तें म्हणजे यज्ञयागादि कर्म दक्षिणा ही पूर्ण करिते. ऋत्विजाला दक्षिणा दिल्याशिवाय यज्ञयागादि कर्म पूर्ण होत नाहीं. **अपि वा प्रदक्षिणागमनात्** = किंवा दक्षिणेला दक्षिणा हें नांव पडण्याचें कारण सोमयागांत ऋत्विजांना ज्या गाई द्यावयाच्या असतात त्या वेदीचा दक्षिणेकडील जो भाग त्याच्यापुढून उत्तरेच्या बाजूनें दुसरीकडे न्यावयाच्या असतात, म्हणजे त्या गाईंना एका प्रकारची प्रदक्षिणा करावयाची असते, म्हणजे त्यांना डावीकडून उजवीकडे जावयाचें असतें. **दिशमभिप्रेत्य** = म्हणून दक्षिणा हा

शब्द दक्षिण दिशेला अनुलक्षून बनला असावा. दिक् हस्तप्रकृतिः = दक्षिण दिशेला ' दक्षिणा ' हें नांव पडलें तें उजव्या हाताला अनुलक्षून. दंतकथा अशी आहे कीं प्रजापति पूर्वेकडे तोंड करून उभा राहिला तेव्हां त्याच्या उजव्या हाताला जी दिशा होती तिला दक्षिणा हें नांव पडलें. हस्तप्रकृतिः ह्या समासाचा विग्रह येणेंप्रमाणें:— हात आहे प्रकृति म्हणजे मूळ म्हणजे कारण जिचे ती. तेव्हां तो हात कोणता ? त्याला उत्तर, दक्षिणः हस्तः = उजवा हात. उजव्या हाताला दक्षिण हें नांव पडावयाचें काय कारण ? त्याला उत्तर, दक्षतेः उत्साहकर्मणः म्हणजे ज्या धातूचा अर्थ उत्साह म्हणजे जोर असणें किंवा समर्थ असणें असा आहे अशा दक्ष् धातूपासून तो झाला आहे. डाव्या हातापेक्षां उजव्या हातांत जोर ज्यास्त असतो. किंवा ' दाशतेः दानकर्मणः= ज्या धातूचा अर्थ देणें असा आहे त्या दाश् धातूपासून तो शब्द झाला असावा; कारण दक्षिणा उजव्या हातानें द्यावयाची असते. हस्तः हन्तेः = हस्त शब्द हन् धातूपासून झाला आहे. कारण, प्राशुर्हनने = तो मारण्यांत डाव्या हातापेक्षां ज्यास्त चपल असतो. शिक्षा = देहि देहि स्तोतृभ्यः कामान् = स्तोत्यांना इच्छित वस्तु दे. मा अतिधक् = मा अस्मान् अतिदंहीः = मा अस्मान् अतिहाय दाः = आम्हांला टाकून दुसऱ्याला देऊं नकोस. भगः नः अस्तु = आम्हांला धन मिळो. बृहद् वदेम स्वे वेदने = विदथे म्हणजे स्वे वेदने म्हणजे आम्ही आपल्या यज्ञांत तुझी पुष्कळ स्तुति करूं. भगः भजतेः = ' भग ' शब्द भज् भोगणें, सेवणें या धातूपासून झाला आहे. बृहद् इति महतो नामधेयम् = ' बृहत् ' हें ' महत् ' ( मोठें ) ह्याचें एक नांव आहे. परिवृढं भवति = बृहत् शब्द वृह् धातूपासून झाला आहे. कारण जी वस्तु मोठी असते ती सर्व बाजूंनीं वाढलली असते. सुवीराः = वीरवन्तः = वीर म्हणजे मुलगे त्यांसहित. येथें 'सु' ह्याचा अर्थ जवळ असणें असा आहे. किंवा (वा)सुवीराः = कल्याणवीराः म्हणजे ज्यांचे मुलगे कल्याण करणारे आहेत असे. वीरः वीरयति अमित्रान्. = वीर शब्द वि+ईर् (घालवून देणें) ह्या धातूपासून झाला आहे. कारण वीर पुरुष शत्रूंना हाकलून देतो. वेतेः वा स्यात् गतिकर्मणः = किंवा ज्या धातूचा अर्थ जाणें असा आहे त्या ' वी ' धातूपासून झाला असेल. कारण वीर पुरुष जिकडे तिकडे जातो, तो कधीं स्वस्थ बसत नाहीं. वीरयतेः वा = किंवा तो वीर शब्द शौर्याचीं कामें करणें ह्या धातूपासून झाला असेल.

टीपः—ह्या ऋचेचा अर्थ बराच निराळा आहे. दक्षिणा मघोनी ह्याचा अर्थ उषा असा आहे. उषेचें दक्षिणा असें एक नांव आहे. हे इंद्रा, तुझें जो स्तवन करितो त्याला धनवान् अशी जी उषा ती उत्तम वस्तु देवो. तूं स्तोत्यांना धन दे. भग म्हणजे दाता असा जो तूं तो तूं आम्हांला जाळून टाकूं नकोस (मा अतिधक्). पुत्रांसहित आम्ही यज्ञांमध्यें तुझें पुष्कळ स्तवन करूं. धक् हें दह् धातूचें आज्ञार्थी द्वितीयपुरुषाचें एकवचन आहे. त्याचा 'दा' देणें ह्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. धक् हें रूप ऋग्वेदांत आणखी दोनतीन वेळां "जाळ" ह्या अर्थी आलें आहे. यास्काच्या भाषेतलें 'दंहीः' हें कोणत्या धातूचें रूप आहे तें कळत नाहीं. दुर्ग आपल्या वृत्तींत यास्काच्या भाष्यांतील शब्द देऊन त्यांचें विवरण करितो. पण त्याच्या वृत्तींत 'दंहीः' शब्द आलेला नाहीं. तो म्हणतोः- मा अस्मान् अतिहाय अतीत्य

अनुक्रमणिका

अन्येभ्यो देहि इति । मा दाः इत्यर्थः. यावरून त्याच्यापुढें जो यास्कभाष्याचा पाठ होता त्यांत 'देहि' असें रूप होतें असें वाटतें. 'दंहीः' हें कोणत्या धातूचें रूप असावें ह्याचा मुळींच तर्क करवत नाहीं. जर्मन पंडित रोथ 'दघ्' धातूचें तें रूप असावें असें म्हणतो पण 'दघ्' हा धातु अति अपरिचित आहे. यास्काच्या भाषेंत 'देहि' असें रूप बरेंच वेळां येतें. तेव्हां परिचित रूप टाकून विवरणासाठीं अपरिचित रूप यास्क कां घालील ? दुर्गानंतर निरुक्त पठण करणारांनीं अज्ञानानें 'देहि' ह्याचा 'दंहीः' असा उच्चार केला असावा. 'मा अस्मान् अतिहाय देहि' हे शब्द मूळ भाष्यांत असावेत. 'दंहीः' वगैरे शब्द मागून कसेतरी आले असतील. दुर्गाला त्यांची जाणीव नाहीं हें स्पष्ट आहे. अति धक् येथें अति या उपसर्गानें धक् ह्याला जोर येतो एवढेंच.

**सीम् इति परिग्रहार्थीयो वा पदपूरणो वा**

'सीम्' ह्या निपाताचा अर्थ परिग्रह म्हणजे सर्वांचा संग्रह असा होतो. किंवा तो पदपूरणासाठींही घालतात. जसें

**प्र सीमादित्यो असृजत्। प्रासृजत् इति वा**

ह्यांत 'सीम्' पदपूरण म्हणून गाळलें असतां बाकी (आदित्यः) प्रासृजत् इतकेंच राहील. म्हणजे आदित्य सोडता झाला असा एक अर्थ होईल किंवा

**प्रासृजत् सर्वतः इति वा**

'सीम्' ह्याचा अर्थ सर्वतः असाही करतां येईल. म्हणजे आदित्य जिकडे तिकडे सोडता झाला असा अर्थ होईल. सबंध ऋचा खालीलप्रमाणें आहे

**प्र सीमादित्यो असृजद् विधर्ता॰ ऋतं सिन्धवो वरुणस्य यन्ति ।**
**न श्राम्यन्ति न वि मुञ्चन्त्येते वयो न पप्तू रघुया परिज्मन् । (ऋ० सं० २।२८।४)**

सीम् हा शब्द पूर्वीच्या ऋचेंत किंवा त्याच ऋचेंत आलेल्या शब्दाची पुनरुक्ति होऊं नये म्हणून घालतात. त्याचा अर्थ तो, ती, तें वगैरे होतो. येथें 'सीम्'हा नदी किंवा पाणी ह्याबद्दल घातला आहे. आदित्य म्हणजे वरुण. विधर्ता म्हणजे सर्व जगाला धारण करणारा. वरुण सीम् म्हणजे पाणी (आकाशांतून) सोडतां झाला (प्रासृजत्). तेव्हां नद्या (सिन्धवः) वरुणानें त्यांना नेमून दिलेलें जें काम (वरुणस्य ऋतम्) त्याला म्हणजे वाहण्याच्या कामाला लागतात (यन्ति). नद्यांना वरुणाचा हुकूम पाळावा लागतो. नद्या कधीं थकत नाहींत (न श्राम्यन्ति). पत्करलेलें काम त्या कधींही मध्येंच टाकीत नाहींत (न विमुञ्चन्त्येते). पक्ष्यांप्रमाणें (वयः न) जलदीजलदीनें (रघुया) सर्व पृथ्वीभर (परिज्मन्) त्या धांवतात (पप्तुः). सीम् हा पदपूरण समजल्यास किंवा त्याचा अर्थ सर्वत्र असा केल्यास प्रासृजत् ह्याला कर्म कोणतें ? सीम् हेंच त्याचें कर्म.

**वि सीमतः सुरुचो वेन आवः। (वाजसनेयिसं० १३।३) इति च = व्यवृणोत् आदित्यः सर्वतः**

वेन म्हणजे आदित्य हा आपले किरण जिकडे तिकडे (सर्वतः) उघडिता झाला (वि+आवः). वि+आवः = व्यवृणोत्. वि आणि आ हे दोन उपसर्ग आहेत. आणि वः हें 'वृ' धातूचें रूप आहे.

**सुरुचः आदित्यरश्मयः विरोचनात्**

सुरुचः म्हणजे आदित्याचे किरण. सूर्याच्या किरणांना सुरुचः म्हणण्याचें कारण किरण प्रकाशतात (विरोचनात्).

**अपि वा सीम इति एतद् अनर्थकम् उपबन्धम् आददीत पञ्चमीकर्माणम्**

किंवा सीम (सीमन्) ह्या शब्दानें तस् हा उपबंध म्हणजे प्रत्यय घेतला असेल (आददीत) व तो उपबंध पंचम्यर्थ असतो. येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं जर उपबंध अनर्थक असेल तर तो पंचम्यर्थ कसा होईल? अनर्थकम् हा शब्द कोणींतरी घुसडला असावा, किंवा 'पञ्चमीकर्माणं' हा घुसडला गेला असेल. पहिला घुसडला असण्याचा ज्यास्त संभव आहे.

**सीम्नः सीमतः सीमातः मर्यादातः**

परंतु यास्क सीम ह्याचा अर्थ सीम्नः असा करितो. तत्कालीन संस्कृतांत सीम हा शब्द पंचम्यर्थी वापरीत होते कीं काय? तसें असल्यास त्याचे तीन पर्याय कशाला द्यावयास पाहिजे होते? शिवाय सीमतः ह्याचा सीमातः असा पर्याय देण्याची जरूर नव्हती. कारण सीमन् त्याच्या वेळीं प्रचारांत होता. सीमा म्हणजे मर्यादा असाही पर्याय देण्याचें कांहीं कारण नव्हतें. भाष्याच्या पाठांत कांहींतरी घोटाळा झाला आहे खास. सीमतः ह्याचा मर्यादातः असा अर्थ असल्यानें वि सीमतः सुरुचो वेन आवः ह्याचा अर्थ 'सूर्य आपल्या किरणांना जी मर्यादा किंवा बंधन घातलें होतें त्याच्यांतून त्यांना बाहेर प्रकट करितो' असा होतो.

**टीपः**—सुरुचः ह्याचा अर्थ उषसः असा असावा. सूर्य उषेला ती ज्या मर्यादेंत म्हणजे बंधनांत होती त्यांतून बाहेर प्रकट करिता झाला.

**सीमा मर्यादा**

सीमा म्हणजे मर्यादा. मर्यादेला सीमा हें नांव कां पडलें? त्याचें उत्तर

**विषीव्यति देशौ इति**

मर्यादा दोन देश वेगळे करिते. सीव्यति म्हणजे (शिंपी) शिवतो. विषीव्यति म्हणजे शिवण तोडतो. जणूं काय दोन देश दोऱ्यानें एकत्र शिवलेले असतात ती शिवण त्या देशामधील जी हद्द ती तोडून टाकिते.

**टीप**–'सीम् ह्या निपाताचें उदाहरण दिल्यावर "वि सीमतः सुरुचो वेन आवर्" हें उदाहरण कां दिलें हें समजत नाहीं. सीमतः ह्याच्यामध्यें सीम् कोठें आहे? हें उदाहरण व त्याचें विवरण हें कोणींतरी मागाहून घुसडलें असावें. 'सीमित्येतदनर्थकमुपबन्धमाददीत' येथील सीमित्येतद् ह्या ठिकाणीं सीमित्येतद् असा पाठ होता कीं काय? तसा पाठ असल्यास अतः असा अनर्थक उपबन्ध लावून सीमतः असें रूप होईल आणि मग उदाहरणाचा अर्थ आदित्य (वेनः) हा सर्वत्र (सीम्) स्वतःचे रश्मि (सुरुचः) उघडे करिता झाला (व्यावः)असा होईल. आणि मग आददीत ह्यानंतर आणि पञ्चमीकर्माणम् ह्याच्या आधीं "अथवा सीमित्येतद् उपबन्धमाददीत" असें केल्यानें पुढीलप्रमाणें अर्थ होईलः– सीम (मर्यादा) ह्या शब्दानें पञ्चम्यर्थी तस् प्रत्यय घेतला असेल. म्हणजे सीम्नः ह्याच्याऐवजीं सीमतः असा शब्द घातला असेल. सीमातः असें त्याचें प्रचारांतलें रूप केलें. सीमातः ह्याचा अर्थ काय असें विचारल्यास त्याचें उत्तर मर्यादातः असें होईल. मर्यादेला सीमा कां म्हणतात? त्याचें उत्तर. सीमा ही दोन देशामधील शिवण तोडते म्हणजे

दोन देश वेगळे वेगळे करिते. एकंदरीनें विचार करितां हें सगळें कोणी तरी मागाहून घुसडलें असावें असें वाटतें. कारण यास्क दोन दोन उदाहरणें देण्याच्या भानगडींत पडत नाहीं.

**त्व इति विनिग्रहार्थीयम्**

त्व ह्या निपाताचा विनिग्रह म्हणजे वेगळेपणा किंवा तुटकेपणा असा अर्थ आहे.

**सर्वनाम**

तो सर्वनाम आहे म्हणजे तो पाहिजे त्या वस्तूबद्दल वापरतां येतो.

**अनुदात्तम्**

(सर्वनाम असूनही) तो अनुदात्त आहे.

**अर्धनाम इत्येके**

कित्येक म्हणतात कीं जेथें कोणतीही वस्तु अर्धी असते त्या अर्ध्या वस्तूबद्दल तो शब्द घालतात. म्हणजे ह्या निपाताचा अर्थ अर्ध आहे.

## खंड ८ वा

**ऋचां त्वः पोषमास्ते पुपुष्वान् गायत्रं त्वो गायति शक्करीषु।**
**ब्रह्मा त्वो वदति जातविद्यां यज्ञस्य मात्रां वि मिमीत उ त्वः॥**

(ऋ. सं. १०।७१।११)

**इति ऋत्विक्कर्मणां विनियोगम् आचष्टे**

ह्या ऋचेनें मन्त्रद्रष्टा म्हणजे ज्यानें ही ऋचा पाहिली तो ऋषि ऋत्विजांनीं करावयाचीं कामें सांगतो.

**ऋचाम्** = ऋचांचा. त्वः = एकः = एकजण. पोषं = पुष्टि **आस्ते** = बसतो = असतो. पुपुष्वान् = पोसणारा. होता = होता नांवाचा ऋत्विक्. ऋक् ही **अर्चनी** म्हणजे पूजा करणारी आहे. म्हणजे ऋक् शब्द अर्च् धातूपासून निघाला आहे. **गायत्रम् एकः गायति शक्करीषु** = एकजण (त्वः) गायत्रीछंदांत असलेल्या शक्करी ऋचा गातो. कोण गातो? उद्गाता. हें एका ऋत्विजाचें नांव आहे. **गायत्रं गायतेः स्तुतिकर्मणः** = स्तुति करणें ह्या अर्थाच्या गै धातूपासून गायत्र शब्द झाला आहे. **शक्कर्यः ऋचः** = शक्करी नांवाच्या ऋचा आहेत. **शक्नोतेः** = शक्करी हा शब्द शक् धातूपासून झाला आहे. **तत् यत् आभिः वृत्रम् अशकत् हन्तुम्** = ज्याअर्थी (यत्) ह्या ऋचांनीं (आभिः) वृत्राला (वृत्रम्) मारण्याला (हन्तुम्) इंद्र शकला (अशकत्). ह्या वाक्यांत तत् ह्याला कांहीं अर्थ नाहीं. तो केवळ वाक्यारंभीं घालतात. **तत् शक्करीणां शक्करीत्वम्** = त्याअर्थी (तत्) शक्करी ऋचांना (शक्करीणां) शक्करीत्व (शक्करीत्वं) आलें. म्हणजे त्या ऋचांना शक्करी हें नांव मिळालें. **इति विज्ञायते** = असें (इति) ब्राम्हणग्रंथावरून कळतें (विज्ञायते). शक्करीशब्द शक् धातूपासून झाला ह्याला आधार दाखविण्याकरितां हें ब्राम्हणवचन येथें दिलें आहे. ब्रह्मा त्वो वदति जातविद्याम् = **ब्रह्मा एकः वदति जाते जाते विद्याम्** = ब्रम्हा नांवाचा ऋत्विक् (ब्रह्मा) त्या त्या प्रसंगीं (जाते जाते) आपल्याला माहीत असेल तें (विद्याम्) सांगतो (वदति). यज्ञांत अडचण आल्यास तो

**उपकक्षदघ्नाः अपरे**

उपकक्षासः = उपकक्षदघ्नाः = उपकक्ष म्हणजे खाक ही प्रमाण आहे ज्यांचे असे ह्रद.

**आस्यम् अस्यतेः** = आस्य शब्द अस् फेकणें ह्या धातूपासून झाला आहे. ज्याच्यामध्यें अन्न फेकतात तें आस्य. **आस्यन्दते एनत् अन्नम् इति वा** = किंवा आस्य शब्द आ + स्यन्द् ह्या धातूपासून झाला असेल; कारण ह्याजकडे (एनत्) अन्न जाऊन ओलें होतें (आस्यन्दते). **दघ्नं दध्यतेः स्रवतिकर्मणः** = दघ्न हा दघ् स्रवणें ह्या धातूपासून झाला आहे. **दस्यतेर्वा स्यात्** = किंवा दघ्न हा शब्द दस् धातूपासून झाला असेल. कारण **विदस्ततरं भवति** = अन्न ज्यास्त मऊ होतें. **प्रस्नेया ह्रदा इव एके प्रस्नेया ददृशिरे. स्नात्वाः** = प्रस्नेयाः म्हणजे स्नान करण्यास योग्य म्हणजे उभा राहून मनुष्य बुडेल इतके खोल. आणि जसे उभें राहून स्नान करण्याइतके डोह खोल असतात त्याप्रमाणें कांहींजण बुद्धीनें खोल आढळतात. प्रस्नेयाः = स्नानार्हाः = उभें राहून स्नान करण्याला योग्य म्हणजे खोल. **ह्रदो ह्रादतेः शब्दकर्मणः** = ह्रद हा शब्द ह्राद् आवाज करणें ह्या धातूपासून झाला आहे. **ह्लादतेर्वा स्यात् शीतीभावकर्मणः** = किंवा ह्लाद् थंड असणें ह्या धातूपासून ह्रद शब्द झाला असेल. कारण डोहाचें पाणी थंड असतें.

**टीपः**—आदघ्नासः ह्याचा अर्थ आस्यदघ्नाः असा केला आहे, परंतु तो संशयित आहे. ऋचेंत डोह निरनिराळ्या खोलीचे असतात असें म्हटलें आहे. आदघ्न, उपकक्ष आणि स्नात्व असा क्रम लाविला आहे. स्नात्व म्हणजे डोक्यावर पाणी जाईल असे. उपकक्ष म्हणजे खाकेपर्यंत ज्यांचें पाणी पोचतें ते. तेव्हां आदघ्न ह्यानें ह्यापेक्षांही कमी खोली दर्शविली गेली पाहिजे. नाहींतर तोंड, खाक, डोकें असा भलता क्रम होईल. आदघ्न हा शब्द आद आणि घ्न ह्यांपासून झाला असावा. घ्न हा हन् आपटणें ह्यापासून होतो. आद ह्यावर ज्यांचें पाणी आपटतें ते आदघ्नाः. ऋग्वेदांत घ्न ज्यांच्या अंतीं आहे असे आणखी चार शब्द सांपडतात. ते असेः—हस्तघ्न, वृत्रघ्न, असुरघ्न, अपुरुषघ्न. आद ह्याचा अर्थ गुडघा किंवा कंबर असा कांहींतरी असावा. कंबर असा अर्थ असण्याचा ज्यास्त संभव आहे. गुडघा किंवा कंबर इतक्या खोलीचे, खाकेइतक्या खोलीचे व डोक्याइतक्या खोलीचे असा क्रम बरोबर दिसतो. यास्क दघ्न ह्या शब्दानें फसला गेला पण तसा प्रत्यय ऋग्वेदांत नाहीं. तो पाणिनीच्या 'प्रमाणे द्वयसज्दघ्नञ्मात्रचः' (पा० ५।२।३७) ह्या सूत्रांत आढळतो. हा दघ्नप्रत्यय यास्कानें उपकक्ष ह्यालाही जोडला आहे. पण ती त्याची चूक आहे. उप ह्या उपसर्गानें प्रमाण दर्शविलें जातें. उपकक्ष म्हणजे खाके(कक्ष)जवळ (उप) असणारे.

सगळ्या ऋचेचा अर्थ असा आहे = एकत्र विद्याभ्यासंग करणारे लोक (सखायः) डोळ्यांनीं (अक्षण्वन्तः) व कानांनीं (कर्णवन्तः) सारखे असतात. परंतु बुद्धीच्या प्रगतींत (मनोजवेषु) त्यांच्यामध्यें समभाव रहात नाहीं. त्यांपैकीं कित्येक म्हणजे बहुतेक जण उथळ डबक्यासारखे (आदध्नासः) असतात. कांहींजण मध्यम खोलीच्या डोहासारखे (उपकक्षासः) असतात, आणि कांहीं म्हणजे थोडेजण खोल डोहासारखे (स्नात्वाः) असतात.

**अथापि समुच्चयार्थे भवति**

आणखी त्व हा समुच्चय असाही अर्थ दाखवितो.

**पर्याया इव त्वदाश्विनम् (कौषीतकिब्रा० १७।४) = आश्विनं च पर्यायाश्च इति.**

यास्काच्या मतें इव शब्द निरर्थक असून त्वम् शब्द 'च' ह्या अर्थी योजिला आहे. आश्विन व पर्याय असा तो वरील उदाहरणाचा अर्थ करितो. परंतु ती त्याची चूक आहे. कौषीतकिब्राम्हणामध्यें आश्विन नांवाचा ऋक्समुदाय कोणत्या तऱ्हेनें म्हणावा असा प्रश्न उद्भवतो. त्या प्रश्नाचें उत्तर कित्येकजण असें देतात :-- पर्याय नांवाचे तीन ऋक्समुदाय आहेत. ते म्हणण्याची जी रीत तीच आश्विननामक ऋक्समुदाय म्हणण्याची असें एक ( त्वत् ) मत आहे. इव शब्द निरर्थक नाहीं. पर्यायाप्रमाणें आश्विन असें एक मत असा शब्दांचा अर्थ आहे. त्याच आश्विन ह्या पर्यायांहून वेगळ्या रीतीनें म्हटला पाहिजे असा निकाल दिला आहे.

**अथ ये प्रवृत्ते अर्थे अमिताक्षरेषु ग्रन्थेषु वाक्यपूरणा आगच्छन्ति पदपूरणाः ते मिताक्षरेषु अनर्थकाः**

अमिताक्षर म्हणजे ज्यांतील अक्षरांना पद्यासारखी मर्यादा नसते अशा वाक्यांत ( वाक्येषु ) त्यांचा अर्थ चालू असतांनाच ( प्रवृत्ते अर्थे ) म्हणजे वाक्यें बोलत असतांनाच केवळ त्यांमधील शब्दांची भरती करण्याकरितां जे शब्द घालतात तेच शब्द मिताक्षरांत म्हणजे पद्यांत येतात. दोन्ही ठिकाणीं ते निरर्थक ( अनर्थकाः ) असतात. येथें अनर्थक ह्या शब्दाची कांहीं जरूरी नाहीं. वाक्यपूरणाः व पदपूरणाः ह्यांनीं तो अर्थ दर्शविला जातो.

**कम् ईम् इत् उ इति**

असे पदपूरण निपात म्हणजे कम्, ईम्, इत्, व उ असे चार होत.

## निरुक्त खंड १० वा

**शिशिरं जीवनाय कम्**

एवढाच पाद मूळ निरुक्तांत होता. कारण दुर्गाचार्य आपल्या वृत्तींत बाकीचे पाद दुसऱ्या एखाद्या शाखेंतून शोधून काढावेत, कांहीं टीकाकार खालीलप्रमाणें सर्व ऋचा देतात, असें म्हणतो.

**निष्ठ्वक्त्रासश्चिदिन्नरो भूरितोका वृकादिव ।**
**बिभ्यस्यन्तो ववाशिरे शिशिरं जीवनाय कम्॥**

निष्ठ्वक्त्रास म्हणजे वस्त्ररहित, भूरितोकाः म्हणजे ज्यांस फार मुलें आहेत असे लोक ( नरः ), जणूं काय (इव) लांडग्याला (वृकात्) भिऊन (बिभ्यस्यन्तः), शिशिर ऋतु ( शिशिरं ) जगण्याला ( जीवनाय ) चांगला ( कं ) असें ओरडून म्हणाले. असा दुर्ग अर्थ करतो. परंतु चौथा पाद आधींच्या तीन पादांशीं विसंगत आहे. कपडे नाहींत, पोरें फार, आणि आतां तर थंडी आली म्हणून भीतीनें गरीब लोक ओरडूं लागले. थंडी सुखकर असल्यास ओरडण्याचें काय कारण ? चौथा चरणच काय तो लोकांच्या तोंडीं होता, तोच यास्कानें उदाहरण म्हणून दिला आहे. ' कं ' चीं उदाहरणें ऋग्वेदांत असतांना हा पाद यास्कानें कां घ्यावा हें समजत नाहीं. ' कं ' हा

ऋग्वेदांत चांगल्या अर्थी वापरला आहे. 'शिशिरं जीवनाय कं' ह्याच्याशीं विसंगत नाहींत असे तीन पाद रचावयास पाहिजे होते. मूळांत नसून हल्लींच्या निरुक्तपाठांत सबंध ऋचा दिलेली आहे. अशा रीतीनें प्रक्षिप्तें ठिकठिकाणीं आलीं आहेत.

**शिशिरं शृणातेः शम्नातेः वा**

शिशिर शब्द शृ हिंसा करणें ह्या धातूपासून झाला असावा किंवा शम् हिंसा करणें ह्यापासून.

**एमेनं सृजता सुते (ऋ० सं० १।९।२)= आसृजत एनं सुते**

आ+ई+एनं ह्यांपैकीं आ हा उपसर्ग सृजत ह्याला जोडून आसृजत हें क्रियापद तयार होतें. ई पदपूरण म्हणजे निरर्थक असल्यामुळें गाळलें आहे. सोमरस काढल्यावर (सुते) तो (एनं) इंद्राला पिण्याकरितां द्या (आसृजत).

**तमिद्वर्धन्तु नो गिरः (ऋ० सं० ९।६१।१४)=तं वर्धयन्तु नो गिरः स्तुतयः**

आमच्या स्तुती त्याला म्हणजे सोमाला वाढवोत. 'इत्' निरर्थक म्हणून गाळला आहे.

**गिरो गृणातेः**

'गिरः' हा शब्द 'गृ' स्तुति करणें ह्यापासून झाला आहे.

**अयमु ते समतसि (ऋ० सं० १।३०।४)=अयं ते समतसि**

हे इंद्रा ज्याच्यावर तूं पांखराप्रमाणें झडप घालतोस (समतसि) तो बघ हा सोम. 'उ' पदपूरण म्हणून गाळला आहे. ऋचांचें विवरण करतांना यास्क पदपूरणें गाळतो.

'कं' ह्याच्या आधीं जें नाम असेल तें चतुर्थ्यंत असतें व चांगला अर्थ दर्शवि-ण्यासाठींच त्या निपाताचा उपयोग केला असतो.

'ई' हा एकेकाळीं 'एनं' च्या अर्थी योजीत असत. 'एनं' हा मागून प्रचारांत आला व कांहीं काळानें 'ई' चा अर्थ लोक विसरले व 'ई' व 'एनं' ह्यांचा एकत्र उपयोग होऊं लागला.

'इत्'= एव. असा अर्थ पुष्कळ ठिकाणीं लागतो.

'उ' चाही 'एव' अर्थ एकेकाळीं असावा व तसा अर्थ ऋग्वेदांत कोठें कोठें अवश्य आहे.

मूळचे अर्थ विसरल्यामुळें हे निपात पादपूरण असे मानले गेले.

**इवोऽपि दृश्यते**

'इव' सुद्धां कोठें कोठें पदपूरण म्हणून घातलेला आढळतो.

**सु विदुरिव**

**न वै सु विदुरिव मनुष्या नक्षत्रं मीमांसन्त इव ह्युदितेन वाव पुण्याहम् (काठकसंहिता ८।३)**

अग्निहोत्र स्थापन करण्यास उत्तम नक्षत्राची जरूर असते. परंतु उत्तम नक्षत्र कोणच्या क्षणीं उगवणार हें मनुष्यांना बरोबर (सु) माहीत नसतें (विदुः). ते विचार करतात (मीमांसन्ते) व सूर्योदयावरून पुण्याह निश्चित करतात. 'इव' हा विदुः व मीमांसन्ते ह्यानंतर घातला आहे; तो वाक्यपूरण आहे असें यास्क म्हणतो; पण इव ह्यानें मनु-

ष्यांच्या मनांतला अनिश्चय दाखविला जातो. आपण किती जरी गणिती असलों तरी मुहूर्त निश्चित करण्यांत आपली चूक होत नसेल कशावरून? सूर्योदयानें मुहूर्त ठरविणें धोक्याचें असें त्यांच्या मनांत येतें. कितीही खबरदारी घेतली तरी चूक होण्याचा संभव आहे व चुकीचा परिणाम यजमानास भोगावा लागेल अशी त्यांना भीति वाटते. इव ह्यानें ही भीति दर्शविली जाते.

**सु विज्ञायेते इव**

पुरुषश्चाश्वश्च नक्तं प्रत्यञ्चौ न सु विज्ञायेते इव (काठकसंहिता ६।२)=संध्याकाळच्या वेळीं मनुष्य व घोडा समोरून येत असतांना (प्रत्यञ्चौ) चांगले (सु) ओळखतां येत नाहींत (विज्ञायेते). येथेंही मनुष्य हा घोडा व घोडा हा मनुष्य अशी संध्याकाळीं चूक होण्याचा संभव आहे. हा संभव इव ह्यानें दाखविला जातो.

'इव' ह्याचें आणखीही एक उदाहरण काठकसंहितेंत आहे. तें असें:— न वै सु विदुरिव मनुष्या यज्ञं तस्मान्न सर्वे इव ऋध्नोति (काठकसंहिता ८।१३) = यज्ञासंबंधीं यच्चयावत् ज्ञान मनुष्यांना नसतें; त्यामुळेंच सर्व यजमानांना यज्ञाचें फळ मिळत नाहीं. यज्ञांत आपल्या हातून चूक होत नसेल असें खात्रीनें सांगतां येत नाहीं. ह्या तीनही उदाहरणांत इव ह्यानें शंका, भीति, चूक होण्याचा संभव दर्शविला जातो. इव हा खात्रीनें वाक्यपूरण नाहीं. 'सु विदुरिव' हें दोनदां आलें आहे. यास्काच्या मनांत कोणचें उदाहरण होतें किंवा दोन्हीही होतीं हें सांगतां येत नाहीं.

दुर्गाचार्याला काठकसंहिता चांगली अवगत होती. त्यानें उदाहरणें बरोबर देऊन त्यांचा अर्थ स्पष्टपणें व समग्र द्यावयास पाहिजे होता. तसा त्यानें दिला नाहीं.

**अथापि 'न' इति एषः 'इत्' इति एतेन संप्रयुज्यते परिभये**

शिवाय (अथापि) 'न' ह्या निपाताला 'इत्' जोडून म्हणजे नेत् करून भीति दाखविण्याकरितां (परिभये) तो वाक्यांत घालतात (संप्रयुज्यते).

## खंड ११ वा

**नेज्जिह्मायन्त्यो नरकं पताम**

यास्काच्या भाष्यावरून एवढाच पाद मूळांत होता व दुर्गाचार्यही बाकीचे पाद शोधून काढावेत व कांहीं लोक खालीलप्रमाणें ऋचा पुरी करतात असें म्हणतो; तेव्हां त्याच्यावेळीं निरुक्तांत हा एकच पाद होता हें स्पष्ट आहे. हल्लींच्या निरुक्तपाठांत ही सगळी ऋचा दिलेली आढळते.

**हविर्भिरेके स्वरितः सचन्ते**

कांहीं लोक (एके) देवांना हवि देऊन (हविर्भिः) एथून (इतः) स्वर्गाप्रत (स्वर्) जातात (सचन्ते)

**सुन्वन्त एके सवनेषु सोमान्**

काहींजण (एके) सोमयागाच्या सवनांत (सवनेषु) सोमाचा (सोमान्) रस काढून (सुन्वन्तः) (व देवता अर्पण करून) स्वर्गाला जातात

**शचीमेदन्त उत दक्षिणाभिः**

आणखीं (उत) कांहींजण स्तुतींनीं (शचीः=शचीभिः) व कांहीं जण दक्षिणा देऊन (दक्षिणाभिः) स्वर्गाला जातात.

**नेजिह्मायन्त्यो नरकं पताम इति**

पण आम्हीं जर नवऱ्यांशीं वाकड्या वागलें (जिह्मायन्त्यः) तर आम्ही नरकांत (नरकं) पडूं (पताम).

असुरपत्नींना तुम्ही आपले नवरे टाकून द्या असें लबाडीनें नारद म्हणाला तेव्हां वरीलप्रमाणें त्यांनीं उत्तर दिलें.

मागील खंडांतील ऋचा व ही ऋचा ह्या दोन्हीही अगदीं नव्या भाषेंत आहेत. ऋग्वेदांतली भाषा ह्यांत नाहीं. दोन्ही ऋचांच्या ऐवजीं ऋग्वेदांतील ऋचा यास्कानें द्यावयास पाहिजे होत्या.

**नरकं = नि + अरकं,** नि=**नीचैः** व अरकं=**गमनं**. नरकांत जाणें म्हणजे पृथ्वीच्या खालीं जाणें. अथवा **नरकं = न+र+कं, न=नास्ति. र=रमणं स्थानं. कं= अल्पम् अपि अस्ति इति वा.** अशी नरक शब्दाची दोन तऱ्हेनें व्युत्पत्ति देतां येतें. नरक शब्द ऋग्वेदांत नाहीं.

**अथ अपि च 'न' इति एषः 'इत्' इति एतेन संप्रयुज्यते अनुपृष्टे**

आणखी (अथ अपि च) 'न च' ह्याला इत् लावल्यानें **न** चेत् असा शब्द बनतो. जेव्हां एक प्रश्न झाल्यावर दुसरा प्रश्न विचारला जातो तेव्हां जें उत्तर द्यावयाचें त्याच्या आरंभीं 'न चेत्' असा शब्द घालतात. जसें:— 'वृषल आहेत कां घरीं' असें एक दुसऱ्याला विचारतो. 'आहेत' असें उत्तर ऐकून तो पुन्हां विचारतो, तर मग बोलाविलें असतां कां येत नाहींत ? त्याला उत्तरः—

**न चेत्सुरां पिबन्ति इति**

(आले असते), जर (चेत्) दारू (सुरा) पीत बसले (पिबन्ति) नसते तर.

चेत् (जर) हा शब्द अर्वाचीन संस्कृतांत हवा तितका वापरतात. इति चेत् (असें म्हणत असाल तर) हे शब्द शांकरभाष्यांत वारंवार येतात. नो चेत् (नाहींतर) असा प्रयोग काव्यांत आढळतो. यास्ककालीं संस्कृतभाषा जरा भिन्न होती असें दिसतें.

**सुरा सुनोतेः**

सुरा शब्द सु पिळून काढणें ह्या धातूपासून झाला आहे. 'रा' हा प्रत्यय आहे.

**एवम् उच्चावचेषु अर्थेषु निपतन्ति**

ह्याप्रमाणें निपात हे भिन्नभिन्न किंवा नाना प्रकारच्या (उच्चावचेषु) अर्थांत (अर्थेषु) पडतात (निपतन्ति) म्हणजे निपातांचे अनेक अर्थ होतात म्हणून त्यांस 'निपात' म्हणतात.

**ते उपेक्षितव्याः**

# ऐतिहासिक

## †अलीबहादर यास उत्तर हिंदुस्थानांतील कारस्थानासंबंधीं पाठविलेलीं पत्रें

(स. मा. दिवेकर)

श्री

मि॥ भाद्रपद शु १२ रविवार १७०२

पौ. छ + + तिसा (१०-९-१७८०)

समानीन रुजू सवा

समानीन स्वारी कर्नाटक

राजश्री अलीबहादर गोसावी यांसि

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्नो बालाजी जनार्दन आसीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष तुम्ही पत्रे दोन पाठविलीं ती पावली कुटुंब पाठवावयाचा मजकूर लिहिला तो कळला त्यास कुटंबाची रवानगी तुम्हांकडे करवीत होतो त्यास लस्करांत सड्या फौजा जाल्या आहेत याकरतां तूर्त रवानगी करू नये म्हणौन राजश्री आपाजी बाबाजी यांणी विनंती केली त्यावरून रवानगी जाली नाही तेथील रंग पाहून लिहून पाठवावें म्हणजे रवानगी होईल †रा छ १६ जिलकाद बहूत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंती

---

श्री

मार्गेपीर्ष वा॥ २ बुधवार श. १७०९

(२६-१२-१७८७)

आसीर्वाद विनंती उपरी आपण कूच करून गंगातीरास जावे म्हणून श्रीमंत राजश्री नानानी आपणास सांगितले त्या प्रो आपण कूच केलेच आहे सांप्रत पत्र श्रीमंतांचे मेणोलीहून आले की अद्यापि भीमातिरी आहेत ठीक नाही त्याजवरून पत्र लिहिले असे तर कोणाची वाट न पाहातां दर मजल टोक्यास गंगातीरास जावें आपणाकडील कामें फार करून जाली आहेत ऐवज वगैरे पाठविणे तो रवाना करितां गंगातीरास जातां तो येऊन पोहचेल आपण जावयाची वोढ काढिली म्हणजे तमाम लोक येऊन मिळतील दिवस राहिले नाहीत याजकरितां पत्र लिहिले असे दरकूच जावे †रा छ १५ रावल बहूत काय लिहीणे लोभ असो दीजे हे विनंती[1]

(†खालील पत्रांत ज्या शब्दावर फुली केली आहे तेथून पुढील सर्व मजकूर पत्र लिहिणाराच्या हातचा आहे)

१ पत्र हरीपंत तात्याचें.



अनुक्रमणिका

श्री

पौष व. १२ रविवार.
१७०९. ( ३–२–१७८८ )

पौ. छ १७ जावल स—
मान समानीन मु ॥
निरगुडी प्रा कनड

राजश्री आलीबाहादर बाबा गोसावी यांसि

सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नो हरी बल्लाल आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिले पाहिजे विशेष आपण छ १९ राखरचे पत्र पाठविले ते छ २२ माहे मजकुरी प्रविष्ट जाहाले छ १८ राखरी गंगा उतरून जेऊर गावी मुकाम—— — — पागा व पथके अद्याप अले नाहीत फौज जमा जाली पाहिजे दूर देसी जावयाचे फौज किती नेमिली आहे हें ध्यानात आ + यास्तव व मागाहून काही पुरावा असा + नेमिले आहेत त्यास ताकीद होऊन लोक येऊन पोहचेत ते करावे म्हणोन लिहीले ते कळले ऐशियास पागा व पथके नेमिली आहेत त्यापौ कांहीं सामान सरंजामाकरिता मागे राहिले आहेत त्यास ताकीद केली आहे लौकरच येऊन पावतील सदैव पत्र पाठऊन संतोषवीत जावें रा छ २४ रबिलाखर बहूत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनती

———

श्री

माघ शु॥ १ शुक्रवार १७०९
( ८–२–८८ )

पौ छ २ जावल
सन सामानीन
मु. ॥ प्रा वालुज

राजश्री अलीबाहादूर गोसावी यासि

सकल गुणालंकरण अखंडीत लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नो बालाजी जनार्दन आसिर्वाद विनती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष आपण छ १९ रबिलाखरचें पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहाले आम्ही छ ८ माहे मजकुरी गंगाउतरुन जेऊर गांवी मुकाम केला आहे त्यास भोंसले व निंबाळकर यांचा कही कत्राडाचा उपद्रव रयतेस बहूत होतो वरचेवर ताकीद करितों परंतु राहात नाहीं पागे व सरंजामी पथके व खजीना अद्यापि येऊंन पोंहचत नाहीं दिवाण कोण ठरले ते कांहीं समजले नाहीं दिवाण ठरतील त्यांची रवानगी लौकर करावी राजश्री येशवंतराव नाईक यांस खानदेशांत जावयास सांगितले आहे ते अद्यापि मागेच आहेत पुढे जावयाचे नसल्यास बोलावून आणूं झाडून फौज जमा होय तों या जिल्हेयांत वाट पाहावी किंवा दरमजल बाराणपूरपावेतों जावें ते ल्याहावें म्हणोंन लिहीलें ते कळले ऐशास भोंसले व निबाळकर

यांजकडील उपद्रव प्रांतांत होतों त्याविषीं उभयतांस सरकारचीं पत्रें पाठविलीं आहेत व आपणही वरचेवर ताकीद करून उपसर्ग न लगे तें करावें खजिन्याविषीं लिहिलें तरी खजिना पेशजींच रा। केला आहे पोहचला असेल पागे व सरंजामी यांचीही रवानगी लौकरच होऊन येऊन पोंहचतील दिवाणाचे रवानगीचा मजकूर तरी दिवाणाची योजना होत आहे मुकरर ठरल्यानंतर रवानगी केली जाईल येशवंतराव ना। यांस खानदेशांत पेंढारी याचे पारपत्यास जावयास सांगितले होते त्यास पेंढारी याचा उपद्रव सांप्रत प्रो। मजकुरीं नाहीं बंदोबस्त जाहाला आहे याजकरितां ना। मारनिले यास पत्र पाठऊंन आपले जवळ बोलावून आणावें सारी फौज येकत्र होये तावत् वाट पाहावी किंवा पुढें जावें म्हणोन तरी आपण दर मजल बराणपूर पावेतो जावें मागाहून फौज ही येऊन पोहंचेल रा। छ २९ राखर बहूत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती

---

श्री

माघ शु॥ ७ गुरुवार १७०९
(१४–२–८८)

पौ छ १७ जावल स––
मान समानीन मु॥
निरगुडी प्रा। वानड

राजश्री अलीबाहादूर गोसावी यांसि

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नो। बालाजी जनार्दन आसीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जावे विशेष तुम्ही छ २६ राखरचे पत्र पाठविले ते पावले लिहिला मजकूर सविस्तर कलो आला लोकास रोजमेरयाचा ऐवज आला तो दौलताबादी आहे दर सेकडा येकूणीस रुा बटा पडतो असाच ऐवज लोकास द्यावा तर घेणार नाहीत याजकरिता दराचे कसे करावे आपले लिहीले येईल त्याप्रो। करू म्हणोन लि॥ त्यास ऐवजास बटा फार पडतो हे खरे इतका साधू म्हटल्यास लोकावर जरब होते याजकरिता चौथाई बटा घ्यावयाच्या त्याखेरीज राजश्री हरीपंत याचे स्वारीत सवा सहा रुा। दरसदे बटा घ्यावयाची चाल आहे त्याप्रमाणें चौथाई बट्या खेरीज सवासाहा रुा दरसदे वजा करून बाकी रोजमेरयाचा ऐवज लोकास देत जावा यकूणीस रुा बटा प्रस्तुत लस्करांत आहे त्यापौ सवा साहा रुा। साधतील हे जाऊन बाकी बटा सरकारात पडेल सोसावा असे केल्या वेगळ लोकांचा बच्याव होणार नाही सरंजामी लोक पावयाचे त्यास ताकीद होऊन लवकर आले पाहिजेत म्हणून लिहिलेत त्यास लोकांस जाण्याची निकड लाविली आहे येतील रा। छ ६ जमादिलवल बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती

---

श्री

फाल्गुन शु॥ ९ रविवार १७०९
(१६–३–८८)

पौ छ २३ जााखर सन
समान समानीन मु॥ ब्रहानपूर मास
फाल्गून

राजश्री अलीबाहादूर गोसावी यांसी

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री बाळाजी जनार्दन आसिर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत असिलें पाहिजे विशेष आपण छ २३ जमादिलोवलचें पत्र पाठविले ते पावले राजश्री माहादजी सिंदे यांजकडील पत्रें आलीं त्याच्या नकला करून पाहावयास पाठविल्या आहेत लौकर जावयाची तरतूद जाहाल्यास सत्वर जाऊन पोंहचों दौलतावादी रुपयाचे बव्याविसी राजश्री आपाजीपंत बोलतील तें मान्य केलें पाहिजे तीन महिन्याची बेगमी करून दिल्हा होती तो ऐवज येथेच झडत आला याजकरितां पुढील बेगमीचा बंदोबस्त करून फौज सत्वर येऊन पोहचे असें केलें पाहिजे माहादजी सिंदे यांस उत्तर लिहीलें की लौकरच येऊन पोंहचतों म्हणोन लिहीलें ते कळले ऐशास सिंदे याचे पत्राच्या नकला करून पाहावयास पाठविल्या त्या पाहिल्या पत्राचें उत्तर तुम्हीं लिहीलें ते उत्तमच आहे लौकर जावयाची तरतूद जाहाल्यास सत्वर जाऊन पोंहचों म्हणोंन तरी दर मजल महेश्वरा पावेतों जावें असें तुम्हांस पेशजीं लेहून पाठविलेंच आहे त्याप्रो दर कूच महेश्वरास जाऊंन तेथून लेहून पाठवावें नंतर येथून लिहिलें जाईल त्याप्रो करावें फौजही लौकरच येऊंन पोहचेल दौलतावादी रुपयाचा मजकूर तरी येविसीं लि॥ आहे त्याप्रों करावें तीन महिन्याचा ऐवज येथेच झडत आला पुढील बेगमी व्हावी म्हणोंन तरी पुढील येक महिन्याचे बेगमीचा ऐवज अवरंगाबादेहून देविला येविसां पूर्वी पत्रें पाठविलीं आहेत. त्याप्रो ऐवज ध्यावा वरकड आपाजीपंत लिहितील त्याजवरून कळेल रा॥ छ ७ जमादिलाखर बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती

———

श्री

चैत्र शु॥ ६ शनिवार १७१०
(१२–४–८८)

पौ छ ५ रजब सन
समान समानीन मु॥
सीन प्रा॥ मास चैत्र

राजश्री आलीबाहादर गोसावी यांसि

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्री तुकोजी होलकर रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणौन स्वकीय लिहीत असावे विशेष ++ कडे

आपला मुकाम कोणते ठिकाणी आहे हे लिहावे आमचे कूच होऊन याळनेर परियंते आले येथून पुढे येका दो दिवसा सेदव्यास जाऊन महेश्वरी सत्वरच जातों तुम्हीही याउ-पर दर कूच नर्मदा वहव्याचे घाटाचे सुमारे यावे तोपरियेंत आम्ही येऊन पोहचतो पेशजी कासीद जोडी पाठविली आहे ती पावलीच आसेल बहुत काये लिहिणे हे विनंती

श्री
म्हाळसकांत
चरणी तत्पर मल्हारजीसुत
तुकोजी होळकर

मोर्तब
सु

---

श्री

पौ छ १४ शावान सन— समानीन मास वैशाख
मु॥ महेश्वर

चैत्र व॥ १२ शनिवार १७१०
(३–५–८८)

राजश्री अलीबाहादर गोसावी यांसि

सकल गुणालंकारण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्नो बाळाजी जनार्दन आसीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीयें कुशल लिहीत जावें विशेष तुम्ही छ १७ रजबचें पत्र पाठविले ते पावले छ ९ रजबी महेश्वरास येऊन पोहचलो अहिल्याबाई यांचे भेटीस छ १३ रजबी गेलो भेटी जाल्या राजश्री तुकोजीबावाही त्याच दिवसीं महेश्वरास दाखल जालें दुसरे दिवसी त्यांच्या व अहिल्याबाईच्या भेटी जाल्या आमच्या व तुकोजी बावाच्या भेटी छ १८ रजबी मुहूर्त आहे भेटी जाल्यावर लिहून पाठऊ दिवाणाची नेमणूक करून पाठऊन द्यावें राजश्री आपाजीपंतास लौकर रवाना करावें रजब अखेर वेगमीचा ऐवज आला पुढील बेगमीची तरतूद जाली पाहिजे आमच्या बराबर तोफा नाहींत तोफा असल्याने इभ्रत असत्य याकरतां लिहिलें आहे राजश्री माहादजी सिंदे याचे छ ४ रजबचें पत्र आलें त्यांत राणेखान भाईनीं आगऱ्यास इस्मा-लबेग याचे मोर्चे होते त्याजवर जाऊन लडाई करून मोर्चे उधळून त्यांजकडील सहा हती व घोडी तिनसें व उंट वगैरे व उमरावगीर गोसावी यासी पाडाव आणिले व आम्हांस लौकर येण्याविसीं लिो आहे म्हणौन व तुकोजी होलकर यांसी बोलण्याचे प्रकर्ण कसें घालावे हे लिहीलें पाहिजे म्हणौन लिहिलें ते सविस्तर कळ.लें त्यास तुकोजीबावाची व तुमची भेट जाहालीच असेल सविस्तर लिहून पाठवावें दिवाणाची

योजना होत माहे मागाहून पाठऊन देऊ आपाजीपंतासही लौकर जाण्याविसी ताकीद केली आहे अखेर सालपावेतो ऐवजाची वेगमी करून वरात पेसजीच पाठविली आहे आलीच असेल तोफाविसीचा प्रकार लिहिला त्यास आतां अखेरीचे दिवस वर्सात जवळ आली तेव्हां येथून तोफाची रवानगी होऊन तुम्हांजवळ पोहोचत असा अवकाश राहिला नाहीं याकरतां रवाना केल्या नाहीत होलकरासी कसे बोलावयाचे याविसीचा प्रकार सविस्तर पेसजी लिहून पाठविला आहे व हालींही अलाहिदा लिहिला आहे त्या अन्वये तुकोजीबावांसी बोलावें रा। छ २६ रजब बहुत काय लिहिणे लोभ असों दीजे हे विनंती

---

श्री

वैशाख शु॥ ३ गुरुवार १७१०

पौ छ १४ शावान सन— ( ८–५–८८ )

समान समानीन

मास वैशाख मु॥ महेश्वर

राजश्री अलीबाहादर गोंसावी यांस

आसीर्वाद विनंती उपरी राजश्री तुकोजी होलकर यांसी बोलण्याचे प्रकर्ण कसें घालावें हे लिहिलें पाहिजे म्हणौन लिहिलें त्यास राजश्री पाटीलबावाची पत्रें पेसजी आली होती कीं माळव्याकडे रागड्याचा उपद्रव जाला आहे व आगऱ्याकडे इस्माल बेग व गुलाम कादर वगैरे यांणी दंगा माडला आहे त्यास या तोंडावर आम्ही आहो माळव्याकडील बंदोबस्तास फौज नाही दोनी तोडे आम्हांस संभाल + नाहीत याकरितां तिकडील बंदोबस्त जाला पाहिजे या प्रों पत्रे आली त्यास तुमची रवानगी सरकारातून पाटीलबावाचे मदतीस केली मागाहून तुकोजी होलकर याचीही केली तेसमई तुकोजी बावाकडेही बातम्याची पत्रे आलीं त्यावरून त्याचे बोलणे पडले कीं जोधपूरकर व जैपूरकर याच्या फौजा जावदेकडे आल्या रामपुरा घेतला पुढें चाल करतील या करतां आंम्ही व अलीबाहादर मिळोन या तोंडावर जाऊ येविसी अलीबाहादर यांस सरकारांतून ल्याहावें तेव्हां येथून त्यांस सांगितले कीं तुमची पत्रे पाटीलबावांकडे जावी कीं माळव्याकडे त्याच्या फौजा आल्या आहेत येविसीं सला कसी त्याची उतरें काय येतात जर त्यांणी लिहीले कीं तुंम्ही अलीबाहादरसुधां येऊन सारे येक होऊन आधी आगऱ्यांकडील मसलत करावी तर उभयेतानी पाटीलबावांकडे जावें अथवा जोधपूरकर जयपूरकर याचे फौजाची चाल माळव्याकडेच भारी दिसली तरी तुम्ही अलीबाहादर मिळून याच तोंडावर शह बावा तिकडे पाटीलबावा अहेतच या अन्वयें बोलून निरोप दिल्हा त्यास तुम्ही महेश्वरास पोहोचला तुकोजीबावाही पोहोचले त्यास सांप्रत माळव्याकडील माहालीं विशेष उपद्रव नाही म्हणौन बातम्या आल्या आहेत तेव्हां तिकडे भारी फौजेचे प्रयो-

जन नाहीं असें दिसते त्यापक्षीं आगऱ्याचा उपराहाल होऊन इस्मालबेगाचें पारपत्य व्हावें याकरितां तुम्हीं तुकोजीबावांसी बोलून त्याचे सलाहाने पाटीलबावांकडे जावें तुकोजीबावांकडे पाटीलबावांची पत्रें आलीं असतील त्यांत तुकोजीबावानी पाटीलबावाकडे असे लिहीले असल्यास उतमच जाले कदाचित माळव्याकडून बातम्या रागड्याचा थोडा बहूत उपद्रव असल्यास तुकोजीबावानी या तोंडावर राहावें तुम्हीं पाटीलबावांकडे जाऊन आगऱ्यांचा उपराळा लौकर होय ते करावें ही मसलत बरी दिसत्ये विशेष दंगा माळव्याकडे नसतां येवढ्या फौजेने उगेच कालहरण करीत माळव्यांत बसावें ही गोष्ट मसलतीस उपयोगी नाहीं याकरतां तुम्हीं उभयतां मिळून पाटीलबावांकडे जाऊन त्रिवर्ग येक होऊन थोरलीच मसलत करावी हे चांगले या अन्वये तुकोजीबावासी बोलून लिहिल्या अन्वये करावे म्हणोंन छ २४ रजबचे रवानगीत डाकेबराबर लिहून पा। आहे व हाली लिहिले आहे तर या अन्वये बोलावे आणि लौकर पुढे जावयाचे करावें दर माहा चढतो उगेच बसोन दिवस घालऊ नयेत रा। छ १ साबान बहूत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती

---

श्री

पौ छ १४ शाबान सन समान समानीन मास वैशाख सु॥ महेश्वर

वैशाख शु॥ ६ रविवार १७१०
(११-५-८८)

राजश्री अलीबाहादर गोसावी यांस

आसीर्वाद विनंती उपरी तुम्ही छ २० रजबचें पत्र पा। ते पावले गंगाजल निर्मळ अहिल्याबाई होलकर यांजकडे तुम्हांस व राजश्री तुकोजी होळकर यांस मेजवानी जाल्याचा मजकूर लिहीला तो कळला तुकोजीबावाचे बोलणे निघाले कीं तुम्हांस सरकारांतून पत्र आलें की नाही व दोहो चहू दिवसांत येक दिवस चांगला पाहून बाईच्या घरी यावें बोलणे जाल्यावर आपण पुढें व्हावें मागाहून आम्ही निघो त्यास पत्र लौकर आले पाहिजे पत्राची वाट पाहात आहो म्हणोंन लि॥ ते कळले त्यास तुकोजीबावासी बोलावयाचे व पुढे कर्तव्यतेचे प्रकार विस्तारें लिहून पेशजी छ २४ रजबी पत्रांची रवानगी केली त्यावर दुसरी रवानगी त्याच अन्वयें पत्रे लिहून पाठविली आहेत पावली असतील त्या अन्वयें तुकोजीबावांसी बोलणे जालेच असेल तुकोजी बावाचे बोलण्यांत तुम्ही पुढे जावे आम्ही मागाहून येतो हे सलाह त्यांणी चांगली सांगितली याप्रों तुम्ही पुढें लौकर जावें मागाहून तेही येतील यांउपर विलंब लाऊ नये रा। छ ४ साबान बहूत काय लिहीणे लोभ असों दीजे हे विनती[1]

---

१ पत्र नाना फडणविसाचें

श्री

श्रावण श्रु. ९ रविवार १७१०
(१०-८-८८)

पौ छ २१ जिल्काद

मुा आकोले प्राा उदेपूर सन तिसा समानीन

साहेबाचे शेवेसी विठल खंडेराव विज्ञापना ताा छ ७ जिल्काद पावेतो साहेबांचे कृपेकरून सुखरूप असे विशेष इकडील वर्तमान तर खर्चाविशई दररोज हटकीत असतो परंतु उतर होत नव्हते छ ४ जिल्कादी तिसरे प्रहरा श्रीमंत राजश्री नाना माडीवर बसले हेते तेव्हा काही जरूर विनंति करावयाची आहे म्हणून चिठी पाा त्याजवरून मला माडीवर बलाविले तेथे गेलो पुसले कीं काय विनंती करणे ती करा त्याजवरून विनंती केली कीं यजमानाची पत्रें येतात खर्चाची वोढ फार बसली आहे लोक उठोन जाणार स्थित राहत नाही तेव्हा उतर जाहाले की खर्चाविशई आम्हास हटकू नये सरकारचाकरीवर पाठविले असतां चाकरीस सामील न जाहाले खर्च सरकारांत किती पडला त्याचे रूप कोणते केले असो त्यांचे सरकारचाकरीवर लक्ष नाही मनास येईल ते करितात ऐसे कितेक प्रकारे रागांत बोलले व खर्चास काही द्यावे ऐसा रंग दिसत नाही खासगीची कामेकाजे राा बाबुराव केशव यांजकडे परवानगी होती ती कामेही बंद जाहाली आहेत सारांश आपण राजश्री पाटीलबावांचे लस्करांत रात्रीचा दिवस करून पोहोचावे येथे दरबारांत लोक बोलतात कीं त्यांची स्वारी नवी केलेला पुरूष पाठविला असता तरी इतके दिवस मध्यें कशास घालता जाहाली हकीकत सेवेसी लिहिली आहे मी सेवकाने ऐसे लिहावेसे नाही जरूर जाणोन लिहीले धनी सूज्ञ आहेत श्रीमत मातुश्री बाईसाहेब पावलास आहेत व श्रीमत राजश्री दादासाहेब व प्यारीसाहेब पावलासच आहेत सर्व लाहान थोर खुशाल आहेत वागेचे भिंती घालावयाविशीं आज्ञा जाली होती ती घातली व बाग काही नीट करिविला सेवेसी श्रुत होय बहुत काय लिहू हे विज्ञापना

---

अनुक्रमणिका

श्री

श्रावण वा १ रविवार १७१०
(१७-८-८८)

पौ छ २७ जिलकाद
मुा अकोले प्राा
उदेपूर सन तिसा
समानीन मास श्रावण

राजश्री आलीबहादर बाबा गोसावी यांसि

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य श्रो माहादजी सिंदे रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणौन स्वकीये कुशल लेखन करीत असिले पाहिजे विशेष कृष्णगडवाले याजकडील रूपनगर व सरवाड वगैरे येथे मारवाड्यानीं मोरचे लाविले आहेत त्यास मारवाड्यानीं रूपनगर येथे निकड केली किल्यातील जकीरा झाडून सरला तेव्हा ती जागा याजपासोन सुटली पुढे अणखी त्याणी कृष्णगड व सरवाड येथे निकड मांडली आहे त्यास कृष्णगडवाले आपले लक्षी राहून त्यासी लडले आहेत त्याचा उपर जाला पाहिजे याकरिता राजश्री आंबाजी इगले यासी येथून लिहिले आहे आपणासी बोलतील त्यास रात त्रिरात फौज रवाना होऊन कृष्णगडसमीप आहे तेथील मारवाडयाचे मोरचे कापून काहाडले असता मारवाडयावर सहजात जरब बसोन कृष्णगडवाले याचा बंध तुटेल त्याचा उपर जाल्यास ते बहुत उपयोगी पडतील यास्तव लिहिल्यान्वये फौजेची रवानगी होऊन त्याचे बंध तुटे ते जाहले पाहिजे रा छ १४ जिलकाद बहुत काय लिहिणे लोभ कीजे हे विनती

---

श्री

भाद्रपद श्रु २ मंगळवार १७१०
(२-९-८८)

पौ छ १८ जिल्हेज
सन तिसा समानीन
मुा अकोल प्राा उदे-
पूर मास भाद्रपद

शेवेसी विठल खडेराव विज्ञापना ताा छ १ जिल्हेज पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष साहेबांनी छ १२ जिलकादचे पत्र पो ते छ २९ जिलकादी पावले लिहिले सविस्तर कलेल श्रीमंतास पत्रे होती ते श्रीमंतास पावली आपले जाणे राजश्री पाटील-बावाकडे जाले नाही मेवाडांत स्वारी गेली पाटीलबावाकडे जाऊन भेट घावी ते न केले येविसी पूर्वी आम्हास बलाऊन नेऊन कितेक प्रकारे बोलिले ते सविस्तर पेशजी लिहीलेंच आहे हालीं स्वामींचीं पत्रें चितोडचे नजीक म्हणौन आलीं त्याजवरून

श्रीमंत राजश्री नाना व तात्या श्रीमंताचे वाडयांत दिवाणखान्यांत होते तेव्हा आम्ही आपलेकडील यादी नेल्या होत्या तेसमई मजला जवळ बलाऊन फजीत केले व आपणास बोलले तें पत्रीं कोठवर लिहावे लिहीतां येत नाहीं ते बोलिले परंतु माझ्याने अमर्यादा होती यास्तव लिहीले नाही याउपरी आम्हास पत्र लिहीणे नाही व पत्राचीं उतरेही देत नाहीं आठ पंधरा दिवस वाट पाहू नाही तरी तजवीज करणे प्राप्त कारण सरकारची पत्रे पई दर पई लौकर दाखल होणे याविसी गेली असतां जाऊन दाखल जाहाले नाही पाटीलबावांची पत्रे वारंवार येतात त्यांस लौकरच येऊन दाखल होतील ऐसे याचे लिहिल्यावरून लिहीत गेलों याउपरी तजवीज करणे प्राप्त ऐसें कितेक प्रकारचे बोलणे बोलिले आणि मर्जी बहुत गेली त्यावरून सेवकाने ते वेलेस विनंती केली की आपण उतरे देत नाही त्यास मी स्वामीमर्जी पाहून पत्र लिहून पाठवितो आणि उतर येका महिन्या आलीकडे आणून देतों कीं दर कूच पाटीलबावाकडे जात ऐसे करून उतर आणऊन सेवेसी दाखवीन प्रजन्यामुळे गुंता पडला असेल तरी न कले हालीं पाटीलबावाकडे जवल पास गेलेच असतील कदाचित गेले नसिले तरी हाली लिहिल्यावरून जातील उतर आणून देतो ऐसे बोलोन सेवेसी विनंती लिहीली आहे तरी आपले जाणे पहिल्या लिहिल्यावरून जालेच असेल कदाचित कांही गुंता पाउसाचा पडला असला तरी हाली दर मजल जाऊन पोहोंचावे येथील मर्जी विदीत आहेच यास्तव सेवकाने विनंती लिहिली आहे व पेशजीही लिहिलेच होते असो येथील मर्जी किमपी राहिली नाही यास्तव लाब लाब कूच करून लौकर त्यांजकडे जाऊन पोहोचावे वरकड लस्करचे खर्चाची वोढ आहे आज चार महिने खर्चास आले नाही तरी विनंती करून दर माहाचा दर माहा येऊन पावे ऐसी विनंती करावी ऐवजाविसी श्रीमंतास लिहिले आहे व तुम्हीहि विनंती करून ऐवज येई ऐसे करणे म्हणून सेवकाचे पत्री लिहिले होते त्यास खर्चाचे ऐवजाविसीं आम्ही विनती न करितां श्रीमंतांनीच विवेक्षा(?) केली की सरकार आज्ञेप्रो वर्तणूक केली पाटीलबावाकडे पोहचले आजपावेतों बारा लक्ष रुो खर्च जाहाले त्याचे सार्थक जाहाले आतां त्याणी आपला व खर्चाचा विचार केलाच असेल ऐसेंही बोलण्यात आले तेव्हा विनंती प्रत्यक्ष करणे राहिली जाला मजकूर सेवेसी लिहिला आहे याउपरी जे करावयाचे तें करावे हे बोलणे श्रीमत मातुश्री माहाराजानी आईकोन बहूत श्रमी आहेत आपले जाणे न जाहाले यामुले खासगत लाहान मोठी कामें राहिली श्रीमंत मातुश्री महाराज पावलास होती ते श्रीमंत मातुश्री गोपकाबाईंचे वर्तमान ऐकोन पुणेयास आली सुखरूप आहेत श्रीमंत सौ दुलान बेगम व दादासाहेब व प्यारी साहेब पुणेयांत सुखरुप आहेत श्रीमंत सौ रहिमतबिबी पावली आहेत पत्राचे उतर लौकर जलद पो राजश्री आपाजीपंत दामले यांचे घरची मुले माणसे सर्व सुखरूप आहेत जलदीमुले त्याचे घरचे पत्र आले नाहीं म्हणून त्यांस सांगावे सेवेसी श्रुत होय बहुत काय लिहू हे विज्ञापना

---

श्री

कार्तिक वा ३० गुरुवार १७१०

(पौ २७-११-८८)

पौ छ २८ सफर सन

तिसा समानीन कार्तिक

मास मुा होरट

विज्ञापना ऐसीजे जोतपुराकहून राजश्री फते++व्यास व राजारामजी आले आहेत हे उभयता आपणापासी आले आहेत तर यासी पहिले बोलणे जाले आहे त्याप्रो बोलून याची रवानगी करावी रवाणगी जालीयावर जोतपुरास जाऊन तेथून निश्चये करोन मागती सत्वरच येतील कळावे हे विज्ञापना

---

श्री

मार्गशीर्ष वा ८ शनिवार १७१०

(२०-१२-८८)

श्री वेंकटेश प्रसंन्न

पौ छ २६ राखरसन

तिसा पौष मु।। +

श्रीमंत अलीबाहदर वात्रा यासि आश्रित मुकुंद जोसी आशीर्वाद।। वि।। अपण लिहिले ते पत्र पाहुन बहुत संतोष झाला।। इकडील वर्तमांन तार।। चौघडे।। व निशानिचे वर्तमांन श्रीमंत नानाचे कानि टाकिले ।। त्यानही वुत्तर केलेत की वायिट केला ।। न द्यायाची होता वर ।। त्यास अह्मी उत्त[र] केले की सर्व भर्वसा अपुले आहेत ।। त्यानिही पाटीलबाबचे मर्जीस्तव केलेत ।। मर्जी रक्षला ।। सर्वस्व अपण आहास भार्वसा ।। त्यास हासुन बोललेत की ।। चिंता काय आहेत् ।। अभय देला ।। क्षणक्षणास मर्जी रक्षुन आहो तुह्मांस दिवस चांगला सा आहे काहि चिंता न करणे ।। बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद ।। मिती मार्गेश्वर वद्य ८ शनिवार[१] ।।

श्री

राजेश्री आपाजिपंत यासि मुकुंद जोसी आशीर्वाद

---

१ संबंध पत्र बालबोधींत.

श्री

पौ छ २६ राखरसन
तिसा पोष मास मु॥
गोसगड

मार्गशीर्ष व॥ ८ शनिवार १७१०
(२०-१२-८८)

सहस्रायु चिरंजीव राजमान्य राजश्री अलीबाहादूर यांसी आसीर्वाद उपरी येथील कुशल ता॥ छ २१ रावल पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष तुम्ही छ १७ व छ २१ सफरची पत्रें दोन पाठविली तीं पावलीं राजश्री पाटीलबाबा याणी चौघडा व जरीपटका दिल्हा म्हणौन लि॥ +++ श्रवण करून बहुत आनंद जाहाला ऐसेच निरंतर पत्र पाठऊन सविस्तर वर्तमान लिहीत जावे कार्तिक वद्य चतुर्थीस दिलीस रवाना जाहालों म्हणौन लिहीले त्यास ईश्वर तुमचा रक्षिता आहे तो शत्रूचा पराजय करून तुमचा जय करील चौघडा व जरीपटका याचा मजकूर राजश्री नानाचे कानावर वेदमूर्ती राजश्री जोसीबावाकडून घालविला घ्यावयाचा नवता ऐसे उतर केलें तेव्हां जोसीबावानी सांगितलें घेत नवते आग्रह बहूत माडिला न घेत म्हणौन मर्जी पाटीलबावांची कर्डी होऊ लागली म्हणौन घेतला सर्व भरवसा आपलाच आहे तेव्हां बोलिले कीं बरें चिंता काय आहे याप्रो जाहाले पुढें जाणार म्हणौन लिहीले त्यास मुख्य येथील मर्जी मग तेथील असी संभाळून बहूत युक्तीने जे करणें ते करावे वरात पंन्नास हजाराची पाठविली ती पावली दोन लक्ष तेथें कर्ज जाहालें आहे परंतु बहुत ऐवजाची वरा[त] करू नये असा तेथील मानस आहे त्यावरून पनास हजारांचीच तूर्त केली हा मजकूर कानावर घातला उतरे होतील ती मागाहून लिहून पाठऊ कलावे बहुत काय लिहिणे हे आसीर्वाद[1]

---

श्री

पौ छ २६ सवाल ति—
सैन मुा श्री मथुरा
आशाढ

आषाढ शु॥१२ शनिवार १७११
(४-७-८९)

राजश्री अलीबाहादर गोसावी यासी

आसीर्वाद विनती उपरी जुवाबख्त शाहाजादे याचे चिरंजीव वाराणसीस होते तेथून निघोन हैदराबादेस नवाबांकडे गेले हीं बातमी नवाबास कललयावर त्याणी कुहीर म्हणून गांव आहे भागानगरानजीक पंधरा कोश तेथे राहावयास सांगितले व वस्त्रें जवाहीर खर्चास देऊन पाठविलें त्याणी जाऊन शाहाजादे यांस गुजरले नवाबानी भेट घेतली नाही म्हणून तेथून निघोन व समत नादेडाकडे गंगा उतरून गेले असी बातनी आली इकडे येतात असे पत्रही आले नाही अकस्मात गारदवडेजवल येऊन सिवलाल मिश्र यांजबरोबर पत्रे पुढे पाठविली लागलेच मागाहून नदी उतरून उरलीस आले असी बातनी आली त्यावरून राजश्री माधवराव रामचंद्र व तिमाराव पारसनीस

---

१ पत्र बहादुरांच्या मातोश्रींचें

यांस तिकडे रवाना केले आहेत भेटीनंतर बोलणे जाल्यावर अर्थ समजेल शाहाजादे यांचे पत्रांत आपले तीर्थरूपास श्रीमंत कैलसवासी भाऊसाहेब याणी वलीअहद केले होते त्यावर अलीगोहोर प्रयागाहून दिलीस आले तेव्हांही सरकारातून बंदोबस्त जाला अलीकडे गुलाम कादरानें हरामखोरी केली त्याचे पारपत्य या सरकारांतून जाहाले असे भाव आहेत तेव्हां पुढे भेटीनंतर वलीअहदीचे बोलणेही बोलतील असे भाव आहेत येविसी राजश्री पाटीलबाबास विस्तरे लिहीले आहे यांचे वडील बंधु लखनऊस वजिराजवल आहेत ते वलीहद करावया योग्य नाहीत असे ऐकण्यांत आहे व गुलाम कादर याणे अकबरशाहास तख्ती बसविले होते त्यास आतां बसवावे असे अलीगोहोर पातशाहा यांचे मानस आहे म्हणून ऐकिले त्यास गुलाम कादराने ज्यास बसविले त्यासच आपण बसवावे हे ठीक नाही येथे आले आहेत यांचे तीर्थरूपास श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेबानी बसविले होते हे त्यांचे चिरंजीव चांगले आहेत यास बसविले असतां कसे म्हणून पाटीलबाबांस लिहिले आहे वलीअहद यांस न करावे असे असले तेथे योजना जाली असली तर यांस च्यार पांच लक्षांचा सरंजाम लाऊन द्यावा म्हणू[न] लिहीले आहे तुम्ही बोलून उतर होईल ते लिहून पाठवावे त्यास बसविले असता श्रीमंताचा लौकीक वाढवणे थोर सरदारास योग्य आहे रा छ १० सवाल बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती[२]

---

श्री

आषाढ वा॥ ४ शनिवार १७११
(११-७-८९)

छ १० जिलकाद सन
तिसैन श्रावण मास
मुा मथुरा.

राजश्री अलीबाहादर गोसावी यांसी

आशीर्वाद विनंती उपरी नवी फौज ठेविली होती ती दूर करण्याविसी पत्र आले त्यावरून दूर केली आम्हांकडील खर्चाचे ऐवजाच्या वराता साहुकारास बुंदले यांवर देणार म्हणौन कलले त्यास बुंदले यांविसी सावकार बेदील आहेत म्हणौन लिहिले त्यास नवी फौज दूर केली उतम केले तुम्ही सावकारांच्या वराता केल्या त्यापैकी बहूतकरून ऐवज पावला बाकी थोडाबहुत राहिला तोही पावेल व बुंदेल्यांवर तुमचे खर्चाची लाख रुपयांची दिल्ही आहे तोही ऐवज पावेल वरात पोहोचलीच असेल पातशाहांचे चिरंजीव अकबरशाहा यांचा निरोप तुम्हांकडे खर्चाचे गल्हांटयांचा आला त्याचा तपसील व तुम्ही उतर केले त्याचा तपसील लिहिला तो कलला त्यास तुम्ही उतर ठीक केले अकबरशाहास वलीअहद करावे असे ठरले परंतु अद्याप कांही जाहाले नाही पातशाहांचे मानस अकबर शाहास तख्ती बसविले तर उतम असे आहे

---

२ पत्र नाना फडणविसांचें.

म्हणौन लिहीले त्यास अकब्बरशाहास गुलाम कादराने तख्तनिसीन केले त्यासच आपण करावे हे लौकिकात ठीक दिसणार नाही होईल ते लिहून पा। जबाबात असेल तसे त्याहावे त्या प्रो करण्यांत येईल म्हणौन लिहीले त्यास येथे शाहाजादे आले आहेत यांचे तीर्थरूपांस वलीअहद श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेबानी केले होते त्यांचे चिरंजीव हे सरकारांत आले श्रीमंतांच्या भेटी जाल्या लौकिक जाला त्याअर्थी यांस वलीअहद केले असतां सर्वोपरी चांगले पडेल येविसीचे अर्थ तपसीलवार शाहाजादे येथे आल्यावर पूर्वी राजश्री पाटील बावांस व तुम्हास लिहीले आहेत त्या अन्वये व्हावे व हाली भेटी जालीयावर पाटीलबावांस व तुम्हास लिहीले आहे सारांश येथे आहेत यांस वलीअहद करावे हे उतम ठरेल ते लौकर लिहून पाठवावे रा। १७ सवाल हे विनती

———

श्री

पौ छ ७ जिलकाद
तिसैन श्रावण मु॥
श्री मथुरा

आषाढ व॥ ७ मंगळवार १७११
( १४–७–८९ )

राजश्री पाटीलबावा गोसावी यांस—

आसीर्वाद विनती उपरी लखनऊस येथे शाहाजादे आले आहेत त्याचे जेष्ट बंधु आहेत परंतु ते वलीअहद करावया योग्य नाहीत ऐसे ऐकण्यांत आहे व दुसरे ऐकिले की अलीगव्हर पातशाहा याचे मानस आहे की अकबर शाहाजादे यास तख्तनसीन करावे हे नाही तर वलीअहद करावे त्यास अकब्बरशाहास गुलामकादर याणें तख्तनिसीन केले होते तेव्हां त्यांसच आपण करावें हे लौकिकांत चांगले दिसणार नाही सर्व आपले ध्यानात आहेच ऐकिले प्रकार लिहिले आहेत आपण मनन करून उतर लौकर पाठवावे जवाबख्त ऊर्फ जाहदारशाहा याचे पुत्र हाली येथे आले याचे नाव मिर्जा मुजफर बख्त शहाजादे आपणासहि तेथे ऐकण्यांत आलेच असतील रा। छ २० सवाल हे विनंती

———

श्री

आषाढ व॥ ७ मंगळवार १७११
(१४–७–८९)

छ १० जिलकाद सन
तिसैन श्रावण मास
मु॥ मथुरा

राजश्री अलीबाहादर गोसावी यांसी

आसीर्वाद विनती उपरी राजश्री पाटीलबावांची प्रकृत बहुत बिघडली आहे व अशक्तही जाले आहेत यांचे राहाणे इकडे होता दिसत नाही पिरांचे दर्शनास

यावयाचे व देवदेवही देसी जाऊन करावयाचे आहेत याकरतां अगत्य येतील असे दिसते त्यांचे फौजेचा गवगवा फार आहे मर्यादा काही राहिली नाही दरवाज्यावर लोकांनी येऊन दगड देखील मारले सारांश देसी येतील असे वाटते म्हणौन लिहिले ते कळले त्यास पाटीलबावा देसी आले असतां तिकडील बंदोबस्त राहाणे कठिण याचे पर्याय तपसीलवार लिहीण्यात पूर्वी आलेच आहेत तुम्ही बोलावे व येथूनहि सलाह चांगली राहावयाची हेच राजश्री सदासिव दिन(कर) यांजकडून लिहिविले आहे अद्याप पाटीलबावाची पत्रे येतो म्हणून आली नाहीत आल्यावर उतेरेहि येथून राहावयाविसी जातील तुम्ही बोलावे आणि जेणेकडू राहावयांचे घडे ते करावे कदाचित इतके लिहिणे व बोलणे येकीकडे ठेऊन येऊच लागले तर यास ईश्वरी इछा म्हणावी आम्हास तुम्ही राहू नये वराव (?) चिमेल उतरोन नंतर बुदेल्यांचे बंदोबस्तास जावे रा छ २० सवाल हे विनंती[1]

---

श्री

नकल

आषाढ वा ७ मंगळवार १७११

(१४–७–८९)

पौ छ ७ जिलकाद
तिसैन श्रावण मु।।
श्रीमथुरा

राजश्री पाटीलबावा गोसावी यांस

आसीर्वाद विनती उपरी

शाहाजादे यांणी फर्मीविले कीं इंग्रज मिर्जा अमांनी कडून दरमहा खर्चास देवीत असतां आंम्ही निघालो ते प्रयागपर्यंत इंग्रजाची बहुत रदबदली व अर्जू कीं जाऊ नये अधीकही देऊ परंतु कबूल न करतां व पुढे कधींतरी राहून इंग्रजाच्या उपराल्याने तख्तावर जाणे दुरंदेसीस ठीक नाही श्रीमंतानी पूर्वी स्थापना केली त्यांकडून घडावे हे चांगले जाणून आलो

वलीअहद खरसी होत नसली तर पुण्यास येऊन श्रीमंतांनी दर्शन घेतले असतां गोष्ट न घडली तर याहून विशेष कांही राहिले नाहीं तेंव्हा मकेस जाऊ असाही भाव अढळला त्यास श्रीमंता पावेतो आले असतां मकेस जावयाजोगे जाल्यावर लौकीक येक प्रकारचा होईल

वलीअहद खुरसीनिसी न करावें बंदोबस्त आपला आहे तसा असावा चालते तसे चालवावे येक लौकीक मात्र

रा छ २० सवाल बहूत काय लिहीणे लोभ असो दीजे हे विनंती

---

[1] पत्र नानांचें.

श्री

आषाढ वा। ७ मंगळ १७११
(१४-७-८९)

पौ छ ७ जिलकाद
तिसैन श्रावण मु॥
मथुरा षाहजादे प्रकर्णी

राजश्री अलीबहादर गोसावी यासी .

आसीर्वाद विनंती उपरी शाहाजादे उरलींस आले म्हणून व पूर्वी कर्तव्याचे प्रकार पूर्वी तुम्हांस लिहीलेच आहेत नंतर त्यांचे बोलणे राजश्री माधवराव रामचंद्र यासी जाले त्यात श्रीमंताची भेट व्हावी हा आग्रह द्रिष्टीस पडला त्यावरून भेटीचा निश्चय ठराविला छ १५ सवाली श्रीमंतांची स्वारी शाहाजाद्यांचा मुकाम हडपसरास होता तेथे डेऱ्यास जाऊन सिरस्ते प्रो भेटी जाल्या नंतर माधवराव (या)सी बोलणे केले त्यात भाव की आपले...हाबख्त यास श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेब याणी वलीअहद केले नंतर प्रयागाहून अलीगौर पातशाहा दिलीस आले ते समई तुम्हांकडूनच बं(दो)बस्त जाला आलींकडे गुलाम कादराने हरामखोरी केलीं त्याचे पारपत्य यथायोग्य करून बंदोबस्त तुम्हीच केला हे जाणून सातसे कोसावरून आपले घर जाणून तुम्हांजवळ आलो याउपर तुम्हास उचीत व नेकनामी ते करावे असे भाव आहेत त्यास श्रीमंत कैलासवासी यांणी यांचे तीर्थरूपास वलीअहद केले होते त्यापक्षीं हे सरकारांत आले यांस वलीअहद करावे म्हणजे लौकिकात चांगले दिसेल सरकारांत आले भेटी जाल्या आणि उगेच बंदोबस्त जाल्याशिवाय गेले असे जाले असतां चांगले दिसणार नाहीं यास्तव यांस वलीअहद करावे व करावया योग्यही आहेत लखनऊस यांचे जेष्ट बंधू आहेत ते वलीअहद करावया योग्य नाहीत असे ऐकण्यात आहे व दुसरे ऐकिण्यात आले की अलीगौर पातशाहा यांचे मानस आहे की अकबरशाहास वलीअहद करावे त्यास अकबरशाहास गुलाम कादराने तख्तनिसीं न केले त्यास आपण करावे हे ठीक यास्तव येथे सरकारात शाहाजादे आले आहेत यांस वलीहद करावे हा उतम पक्ष व पूर्वीचा सिल सिलाही आहे व सरकारात आले यावलीअहद (के)ले हाही लौकीक मोठाच होईल येविसीचे प्रकार सविस्तर राजश्री पाटीलबावांस लिहीले आहेत तुम्हीही बोलून उतरे पाठवावी शाहाजाद्यांचे बोलणे जाले त्याची विनंती श्रीमंतांस केली आज्ञा जाली की ही गोष्ट सिंदांस लिहून जरूर घडावी त्यावरून पाटीलबावास व तुम्हास लिहीले आहे उतरे लौकर पाठवावी राजश्री पाटीलबावास पत्रें लिहीलीं आहेत त्याच्या नकला तुम्हास मजकूर कळावया करतां पाठविल्या आहेत त्यावरून कलेल येथे शाहाजादे आलें यांस वलीहद करावें हे जरूर घडवें यांत फल काही नाही परंतु श्रीमंतापाशी आलें याचा लौकीक मात्र हे यश सरदारास सहजात येते असे आहे रा। छ २० सवाल बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती[1]

---

१ पत्र नाना फडणविसांचें.

# सनाढ्य ब्राह्मणांतील विवाहपद्धति

(लेखकः– माधवराव विनायक किबे)

( खालीं दिलेली एका लग्नाची हकीकत लग्नास हजर असलेल्या एका सनाढ्य ब्राह्मणानेंच कळविली आहे.)

आमच्यांत लग्नाला वरपक्षाकडून फक्त पुरुषच वधूपक्षाच्या घरीं जातात. त्याप्रमाणें आमच्याकडील मंडळी तीन पृथक् कंपू करून चन्दोसी गांवाला जाण्याला रवाना झाली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सर्व तेथें पोहोंचल्यावर आम्हीं एकत्र झालों. रेलवेरस्त्यानें चन्दोसीहून सम्भल २७ मैल आहे. सम्भल येथेंच विवाहसमारंभ व्हावयाचा होता. आमच्या स्वागतार्थ चन्दोसी स्टेशनवर वधूपक्षाकडील कांहीं मंडळी आली होती. तेथें फराळाची व्यवस्था केली होती; फराळ आटोपल्यावर आम्हीं सर्वजण आगगाडीनें सम्भलला जाण्यास निघालों. स्टेशनवर उतरतांच ब्यॉंड वाजूं लागला आणि आम्ही मंडळी टांगे बग्यांतून बसून उतरावयाच्या मुक्कामावर गेलों.

विवाहाची वातमी सर्व गांवाला सूचित करण्याकरितां गांवांतील प्रमुख पेठांतून पहिल्या दिवशीं वरात निघत असते. सायंकाळीं आमच्या वरातीची मिरवणूक नगर प्रदक्षिणेला निघाली. या वरातींत तीन हत्ती, बरेचसे टांगे, बग्या इत्यादि वाहनें होतीं. पुढें ब्यॉंड वाजत चालला होता.

लग्नाचें मुख्य कार्य आमचेकडेस प्रथमच दिवशीं समाप्त होतें. निश्चित मुहूर्तावर नवरा मुलगा व दोन तीन मुख्य नातेवाईक कन्येच्या घरीं जातात. प्रथम वराकडून हवन करवून घेतात; त्या विधीला दोन अडीच तास लागतात. नंतर वधूवर्गाकडून येणेंप्रमाणें वदवून घेतलें जातें:—'मी तुला आपली धर्मपत्नी करीत आहें. तुझ्या संमतीशिवाय मी कोणतेंहि कृत्य करणार नाहीं. तुझ्या पालनपोषणाकडेस सदैव लक्ष ठेवीन' इ. इ. वधू म्हणते, 'मी तुम्हांला पती करीत आहें. एकनिष्ठेनें मी तुमची सेवा करीन आणि अखंड तुमची आज्ञा पालन करीन. सुखदुःखांत मी तुमची वांटेकरीण राहीन.' नंतर भांवर होतें; म्हणजे वर व वधू सप्तपदी करितात. यानंतर मुलीला मुलाच्या डाव्या बाजूस बसविण्यांत येतें. या वेळेस वधूपक्षाकडील लग्न-कार्यार्थ जमलेला स्त्रीवर्ग मंगल गायन करीत असतो. या विधीच्या पूर्वी वराच्या उपरण्याचें एक टोंक वधूच्या अंगावर असलेल्या वस्त्राला (चादर) बांधून ठेवितात. अग्नि, सूर्य, चंद्र यांना साक्षी ठेऊन प्रतिज्ञा करविल्या जातात. नंतर कांहीं आशीर्वाद, दान, दक्षिणा दिलीं जाऊन हा विधि समाप्त होतो.

दुसऱ्या दिवशीं आमचे कडेस 'कुंवर-कलेवा'ची चाल आहे. याचा अर्थ असा कीं या दिवशीं प्रातःकाळीं नवरामुलगा व त्याचे धाकटे बंधू कन्येकडेस फराळाला जातात. बाकीचे मंडळीस त्यांचे बिऱ्हाडींच खाद्यवस्तू पाठविल्या जातात. वर ज्या भांड्यांत फराळ करितो तीं सर्व त्यासच दिलीं जातात. आमच्या या विवाहप्रसंगीं वराला चांदीचें एक ताट व एक फुलपात्र दिलें गेलें.

दुपारीं आणि रात्रीं सोयीप्रमाणें भोजनाची व्यवस्था वधूगृहींच केली असते. तेथेंच वरपक्ष जेवण उरकून घेतो; किंवा भोजनाचे पदार्थ वरपक्षाच्या मुक्कामींच पाठवून देतात. या दिवशीं सम्भल गांवीं थंडी पडली होती व पाऊसहि पडत होता. यामुळें भोजनाच्या वस्तू आमच्या बिऱ्हाडींच धाडून दिल्या गेल्या. आमचेकडेस जेवणाचे दोन प्रकार आहेत. पोळ्या, डाळ, भात, खिचडी यांना 'कच्चाखाना' म्हणतात. या वस्तू आम्ही लोक फक्त "चौक्यांत" बसूनच खाऊं शकतों. आणि तेंहि जर आमच्याच नातलग किंवा जातीच्या माणसांकडून तयार झालें असेल तरच चालतें. पुऱ्या, कचोऱ्या भाज्या, गोड वस्तू (अर्थात् तुपाच्या तेलाच्या नव्हत) इ. वस्तूंचा अंतर्भाव 'पक्का भोजन" यांत होतो. याला आम्ही अधिक पवित्र मानितों. या वस्तू एका गांवाहून दुसरे गांवीं प्रवासांत उपयोगी येऊं शकतात आणि चौक्याच्या बाहेरहि खाण्यास हरकत नसते. अस्तु.

तिसऱ्या दिवसाचा कार्यक्रमहि विवाहाच्या प्रमुख अंगांपैकीं एक मानिला जातो. या दिवशीं वधूपक्षाकडील कांहीं निवडक प्रमुख मंडळी वरपक्षाकडेस निमंत्रण देण्याला येते व दोनहि पक्षांकडून श्लोक म्हटले जातात. यांत परस्पर स्तुतीचा वर्षाव केलेला असतो, मुलांकडून असे श्लोक बरेचसे म्हणविले जातात. कोणी कुशल वक्ता असल्यास तो सुंदरसें व्याख्यानहि देतो. अर्थात् त्याचा विषय 'विवाह'. या सर्व गोष्टी विवाह-विधींत पडतात.

यानंतर एक मनोरंजक कार्यक्रम 'पलंग' या नांवानें संबोधिला जातो. वधूपक्षा-कडून वराला पोषाख करतात. आणि वधूवरांस पलंगावर बसवितात. यावेळीं दोनहि पक्षाची मंडळी एकत्र होतात. गायन, वादन, अत्तरपान इ. गोष्टी होतात. नंतर वर-पक्षाकडील सर्व मंडळी वधूपक्षाच्या मंडळीस 'भेट' देतात. आमचेकडेस याला 'वेदी' आणि 'अंकमाला' असें म्हणतात. कन्यापक्षाकडील प्रत्येक मनुष्य वरपक्षाकडील प्रत्येक मनुष्यास 'भेट' करितो व श्रद्धेनुसार वरपक्षाकडील मंडळीस दक्षिणा देतो. प्रमुख व्यक्तींस अर्थातच दक्षिणा अधिक मिळते.

वधूपक्षाकडून आलेलें आंदण पलंगाखालीं ठेवून देतात. सामान्यतः गृहस्थाश्रमाला लागणाऱ्या आवश्यक वस्तू, स्वयंपाकाचीं भांडीं, घडे, ताटें, इ. सर्व वस्तू दिल्या जातात. हें आंदण आपापल्या स्थित्यनुसार दिलें जातें. आमच्या या कार्यांत वधूपक्ष श्रीमान होता. घरांत जमीनदारी चालत आली आहे. साडू धनवान असल्यानें त्यानें पायगाडी, मनगटाचें, आणि खिशातलें घड्याळ, आंगठ्या, अंगांतील कपडे इ. पुष्कळ वस्तू दिल्या.

यानंतर वरातींतील लोक परत विन्हाडीं येतात. वर आणि वधू पलंगावरच बसलेले असतात. मंडळी गेल्यावर कन्यापक्षाकडील स्त्रिया पलंगाजवळ येतात व आपल्या संबंधाप्रमाणें व शक्तीप्रमाणें 'नजर निछावर' करितात. नंतर स्त्रियांसमक्ष वधूवरांस विड्यांची परस्पर देवाणघेवाण होते. वर आपण एक विडा घेऊन पत्नीच्या मुखांत घालतो व त्याचप्रमाणें पत्नी करते. याचप्रमाणें परस्पर 'कांकणा'च्या गांठी सोडतात. यानंतर वर आपल्या घरीं परत येतो व वरातींतील मंडळी आपापल्या घरीं जातात. ही आमच्या लोकांतील विवाहपद्धति संक्षेपानें वर्णिली आहे.

---

# मामा

(लेखकः– **नारायण गोविंद चापेकर**)

आईच्या भावाला मामा म्हणतात तसेंच वायकोच्या बापालाहि मामा म्हणण्याची चाल आहे. मामा शब्द संस्कृत मामक शब्दापासून व्युत्पादितात. मामक शब्दाचा अर्थ मामा असून याच किंवा तत्सदृश अर्थानें पंचतन्त्रांत माम शब्द वापरलेला आहे. उ. 'माम किमेवं रुचते भवताद्य' तंत्र १, कथा २०. पण मामक हा संस्कृत शब्दच मामा शब्दावरून बनविलेला असल्याचा संभव आहे. मामा याचें स्त्रीलिङ्गी नाम मामी. मामा आणि मामी हे दोनहि शब्द तामीळ भाषेंत आढळतात. आईच्या भावाला मामाशिवाय तामीळ भाषेंत दुसरा शब्दच नाहीं. यावरून मामा हाच मूळ शब्द असावा असें अनुमान करण्यास जागा आहे. मामी हा देशी भाषेंतील शब्द म्हणून प्राकृत व्याकरणकार सांगतातच. मातुल शब्दापासून मामा शब्द निघाला नाहीं.

आपल्या सर्व रूढाचारांत मामाचें प्रस्थ फार मोठें आहे. विशेष हें कीं तें प्रायः सर्व जातींत आहे. ब्राम्हणांत समावर्तनाच्या प्रसंगीं मधुपर्क मामानें करण्याचा रिवाज कित्येक ठिकाणीं आहे. काशीस जाणाऱ्या बटूला आपली मुलगी देऊं करून परतविण्याचें काम मामाच करतो. ब्राम्हणेतर पुष्कळ जातींत मामा भाचीचें कन्यादान करतो आणि तें आईबाप असूनहि करतो. लग्नाच्या वेळीं मुलीला कडेवर घेऊन मामाच पाटावर नेऊन ठेवतो. दैवज्ञ समाजांत आणखी अशी रीत आहे कीं विवाहाच्या वेळीं सासरीं कसें वागावें याविषयीं मामा मुलीला उपदेश करतो. हा अधिकार बापाचा नसून मामाचा आहे. पुष्कळ जातींत बाशिंग बांधण्याचा हक्क मामाचा असतो. हें बाशिंग मामा आपल्या खर्चानें विकत घेतो. कांहीं मराठा जातींत लग्नाच्या वेळीं नवऱ्यामुलाचा मोह

करतात तेव्हां त्याला मामाच्या मांडीवर बसवतात. दैवज्ञ जातींत मुंजीच्या वेळीं आधीं मामाच्या मांडीवर मुलगा बसतो व मग मामाला मुलाचा बाप आहेर करतो. शिंप्यांत व दुसऱ्या पुष्कळ जातींत कांकण व बाशिंग मामाकडून यावयाचें असतें.

मूल जन्मल्यावर पहिला पाळणा मामाकडून मिळण्याची चाल कांहीं जातींत आहे. एवढेंच नव्हे तर मुलाला पाळण्यांत मामाच्या हातून घालतात. मुंजींत भिक्षावळीचा खर्च मामाचा असतो. सर्व कुणबी समाजांत मामेबहिणीशीं लग्न लावण्याचा सांप्रदाय आहेच; पण कित्येक ब्राम्हणांत मामाभाचीचा विवाह निषिद्ध मानला जात नाहीं. ठाकरांत मुलाचें जावळ करावयाचें असलें तर मामाकडून त्याच्या केंसाच्या दोन बटी तरी काढतात. आग्र्यांत जावळ करतांना मुलाला आत्या मांडीवर घेते. पण मामाइतकें आतेचें महत्त्व दिसत नाहीं. लहान मुलाचें उष्टावण मामाकडून करवतात. लिंब-न्हाणांत मामा आपल्या बहिणीच्या मस्तकावर लुगडें ठेवतो आणि बहीण लहान असली तरी तिच्या पायां पडतो. (भावानें बहिणीला लाथ मारली तर त्याच्या पायांत किडे पडतात असा समज आहे.) परदेशी तेल्यांत अंतरपाटाचा शेला मामानें द्यावयाचा असतो. कायस्थांत लग्नांत मुलीचें सोवळें मामानेंच घ्यावें लागतें. कित्येक देशस्थ ब्राम्हणांत मामाकडून कन्यादान करविण्याचा प्रघात असल्याचें समजतें. लग्नाच्या वेळचा मधुपर्क मामानें करण्याची वहिवाट कित्येक ब्राम्हणांत आहे. वाणी, शिंपी इत्यादि कांहीं जातींतील मामसाळें तर प्रसिद्धच आहे. लग्नापूर्वी मामानें भाचीची मिरवणूक काढावयाची असते. मामसाळ्याचें वर्णन 'आमचा गांव' यांत दिलेंच आहे. मांदळमामा म्हणून दुसरा एक समारंभ असतो. लग्न अथवा मुंज लागण्यापूर्वीं हा करण्यांत येतो. एका ढोलावर भाच्याला किंवा भाचीला--असेल त्याप्रमाणें--बसवून तें ढोल मामा वाजवतो. मामाच्या व भाच्याच्या किंवा भाचीच्या मस्तकावर एक उपरणें घालतात. हें उपरणें मुलाच्या अगर मुलीच्या बापाकडलें असतें. या उपरण्याचाच शेवटीं मामाला आहेर करतात. इकडे चार सुवासिनी हातांत गाडगीं घेऊन आंत एक तागाचें कांडें घालून त्यानें प्रत्येकजण मडकें वाजवीत मामाभाच्याच्या भोंवतीं गाणें गात चार फेऱ्या घालतात. गाणें म्हणतात तें. नाचेग नाचणी, पाया लागे मुरमुर माती । मामा लागे शेले पयरावती ॥ गाणें म्हणून झाल्यावर आरती करतात. नंतर एक सवाशीण मामाची ओटी भरते म्हणजे त्याच्या उपरण्यांत एक नारळ, पांच बदाम, पांच आक्रोड, पांच खारका व गहूं घालतात. हें झाल्यावर मामा मुलास अगर मुलीस उचलून घेऊन देवाजवळ नेऊन बसवतो. या कृत्याला मांदळमामा म्हणतात. मांदळ म्हणजे मृदंग--ढोलकें. मृदंग आणि मामा यांच्या संबंधामुळें याला मांदळमामा नांव पडलें असावें.

कुणबी जातींत कन्यादान करतांना मामा वराचे पाय धुतो. त्याला समय, ताट, गाय, पागोटें, धोतर वगैरेंचा आहेर करतो.

कांहीं सोनकातोड्यांत मुलांमुलींचें जावळ मामा करतो. म्हणजे मामा वस्तऱ्यानें त्यांची श्मश्रू करतो. या जातींत कातोडीच एकमेकांची हजामत करतात. न्हावी यांच्या

हजामती करीत नाहींत. अथवा न्हाव्याकडून ते करून घेत नाहींत. आपली शेंडी न्हाव्याच्या हातांत देऊं नये असें ते म्हणतात. मामानें जावळ केल्यावर मुलामुलींच्या डोक्यावर शिजवलेले हरभरे ओततात. मामाला मानाबद्दल एक कोंबडी, अर्धी बाटली दारू असें मिळतें.

मामाचा विचार करतांना मुलीच्या मुलाचें पावित्र्य श्राद्धांत विशेष मानलें जातें त्याचें कारणहि शोधण्यासारखें आहे. मनु, वसिष्ठ व शातातप या स्मृतींत श्राद्धप्रसंगीं नातू, लोकर व तीळ हीं फार पवित्र म्हणून म्हटलें आहे. "त्रीणि श्राद्धे पवित्राणि दौहित्रः कुतपस्तिलाः".

## सवाशीण

गेल्या अंकांत विधवा सवाशणी सांगण्याच्या चालीचा उल्लेख केलाच आहे. हा कुलाचार पुष्कळ ब्राह्मणकुटुंबांत आहे. राजरा किंवा राजेश्वरी देवीच्या निमित्तानें विधवा-पूजन करतात. एकाच टांकांत राजरा देवीच्या सात प्रतिमा असतात. पुष्कळांच्या घरच्या देवांपैकीं ही देवी असते. कुलधर्माच्या दिवशीं एक घरचें मेहूण, एक बाहेरचें मेहूण, एक ब्राह्मण, एक सुवासिनी, एक ब्रह्मचारी, आणि एक विधवा अशीं माणसें भोजनास बोलावतात. या विधवेला मायगोसावीण म्हणतात. तसेंच हा साडेसात माणसांचा कुलधर्म म्हणतात. अर्थात् ब्रह्मचारी अर्धा माणूस समजण्यांत येतो.

विधवापूजनाला स्वाम्या करणेंहि म्हणतात. हा नैमित्तिक कुलाचार असतो. लग्न वगैरे कुटुंबांत कार्य झालें म्हणजे स्वाम्या कराव्या लागतात. कुटुंबांतीलच विधवा-पुजण्याची चाल आहे. या कृत्याला बाहेरची विधवा मिळत नसावी. कारण विधवेच्या स्नानाचे कांहीं चमत्कारिक प्रकार आहेत असें समजतें. विधवासवाशणींना दक्षिणाहि देतात.

एक कुलाचार असा आहे कीं घरांतील वडील सुवासिनी स्त्रीनें कुलधर्म म्हणून त्या दिवशीं नेसूचें वस्त्र सोडून कडूनिंबाचीं पानें "नेसावयाचीं" आणि देवीसमोर जावयाचें. तेथें तिला नवें वस्त्र मिळतें तें ती नंतर नेसते. याला म्हणजे परिधान केलेल्या निंबाच्या पाल्याला निंबसाडी म्हणतात.

## एक पिंड

नाशकाहून रा. चंद्रात्रे लिहितातः—

चंद्रात्र गोत्र ज्यांचें आहे अशांपैकीं कांहीं कुलांत उ. चंद्रात्रे, दीक्षित, आणि अंधृटकर—अशी रूढि आहे कीं प्रात्यब्दिक श्राद्धांत त्रयीचा उच्चार करून तीन पिंड न देतां एकच पिंड द्यावयाचा. वरील कुटुंबें शुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन शाखेचीं आहेत. हा प्रकार शास्त्राच्या विरुद्ध उघडउघड दिसतो; पण ही रूढि पडण्याचें कारण काय असावें बरें ?

अनुक्रमणिका

# कोरकु लोकांची राहणी व त्यांची लग्नपद्धती.

( लेखकः- हरि रामचंद्र पिटके )

कोरकु, गोंड, कोलाम, परधान वगैरे लोक वऱ्हाडापैकीं मेळघाट तालुक्यांत व यवतमाळ जिल्ह्यांत आहेत, त्याचप्रमाणें नागपूर प्रांतांतील बैतुल, भांडारा, चांदा वगैरे जिल्ह्यांत आहेत. ते लोक नेहमी गवताची झोपडी बांधून राहतात. दगड, माती, विटा, चुना वगैरेंच्या भिंती बांधून राहतात. खपरेल किंवा माडीचीं घरें बांधून राहणें त्यांना आवडत नाहीं. त्यांची रहाणी फारच साधी आहे.

## पोषाख.

पुरुषांचे कपडे म्हणजे एक लंगोटी, डोकीस रुमाल किंवा पटका, अंगावर दुहेरी धोतर, कधीं असला तर क्वचित् जोडा, नाहींतर अनवाणी. स्त्रियांचा पोषाख म्हणजे फक्त एक सुतीकाठी लुगडें अगर पातळाप्रमाणें पांढरें १५ हाती धोतर. चोळी मुळींच घालीत नाहींत.

## भूषणें.

गळ्यांत पोंवळ्यांच्या व कवड्यांच्या व इतर काळ्या, हिरव्या वगैरे रंगीबेरंगी मण्याच्या माळा काशाच्या, क्वचित् रुप्याच्या सऱ्या. केसांत जंगली फुलें घालतात. हातांत पितळी, किंवा काशाचीं कडीं, काचेच्या बांगड्या क्वचित्; बोटांत तांब्या-पितळेच्या आंगठ्या; कानांत पितळी बाळ्या वगैरे; पायांत पितळी अगर काशाचीं कडीं, पितळी घुंगूर, व पायाच्या बोटांत काशाचीं जोडवीं.

## खाणेंपिणें

जोंधळ्या(ज्वारी)च्या कण्या (घाटा); भाकरी करून खाणें फारच क्वचित्. ते म्हणतात कीं भाकरीपेक्षां कण्या खाणें सोइस्कर आहे. भाजी, डाळीचें वरण असलें तरी ठीक, नसलें तरी ठीक. कण्यांतच डाळ मिसळून खाणें बरें वाटतें. निरनिराळे पदार्थ करून खाण्याची संवय त्यांना नाहीं. कण्यांत दूध, गूळ, साखर, घालून खातात. गव्हाच्या सुद्धां कण्या करून खातात. पोळ्या व इतर पदार्थ त्यांना करतां येत नाहीं. हळूहळू आतां शिकूं लागले आहेत. कण्याप्रमाणेंच ते तांदूळ खातात. मद्य मांस त्यांना फार प्रिय असतें.

हे लोक शेती करून जें पीक येईल त्याजवर निर्वाह करतात. मात्र फाल्गून व चैत्र मासीं मोहाचीं फुलें जमिनीवर पडतात तीं ते गोळा करून वाळवितात आणि पावसाळ्यांत त्या फुलांचा कण्याबरोबर घाटा करून खातात, म्हणजे पावसांत शेतीचें

अनुक्रमणिका

काम करीत असतांना घाटा खाल्यानें शीण वाटत नाहीं व थंडीची बाधा होत नाहीं. जर जोंधळ्याचें पीक बुडालें तर त्यावेळीं मोहाचीं फुलें जंगलांतून आणून वाळवून कण्यांप्रमाणें फुलांचा घाटा करून निर्वाह करतात.

उत्पन्न— शेतींत कपाशी, जोंधळा (ज्वारी), बाजरी, राळा, मका, कुटकी, कोदो, सावा, मूग, उडीद, मठ (मटकी), तीळ, कराळे (जगदन), हरभरे (चणे), गहू, जवस आंबाडी, करडई, भुईमुग वगैरे पेरतात.

## लग्नपद्धती

कोरकु लोकांत लग्नपद्धतीचे दोन प्रकार आहेत. पहिला प्रकार—वराकडील माणसें मुलीची मागणी घालतात. मुलीकडील माणसांना तें स्थळ बरें वाटलें तर होकार देतात. मग वधूकडील माणसें वराकडे जाऊन चार मंडळी बरोबर भोजन व दारू पिऊन वरास कपडा वगैरे देतात. गंध लावण्याला "शालमुदी" असें म्हणतात. नंतर वराकडील माणसें वधूकडे जाऊन कपड्याचा आहेर करतात. त्यालाच "साखरपुडा" म्हणतात म्हणजे लग्न ठरलें. मग तिथि पाहून लग्न करतात. लग्न उघड्या हवेंत दिवसा सरासरी दोन प्रहरीं लावतात. वराकडील व वधूकडील माणसें जमून वधू व वर या दोघांना उभे करून ज्वारी पिवळी करून त्यांच्यावर उधळतात व त्यांच्या भाषेंत गाणीं म्हणतात. खाण्याचा प्रकार वर दर्शविल्याप्रमाणेंच. मात्र दारूचा खप जास्त. मांसाचा खपहि बराच. तीनचार दिवस राहून वरपक्ष वधूसह घरीं परत येतो. मुलगी शहाणी झाल्यावर आईबाप मुलास व त्याच्या बायकोस वेगळें घर करून जवळच ठेवतात.

दुसरा प्रकार—मुलाकडील माणसें वरीलप्रमाणें मुलीस मागणी करण्यास जातात. मुलगी व मुलगा परस्परांना पसंत पडल्यावर वराकडील माणसें गरीब असल्यास मुलगा तीन, चार, पांच, सात वर्षें मुलीच्या बापाचे घरीं ठरेल त्या मुदतीपर्यंत काम करून राहतो. त्याच्या कामधंद्याची कमाई होईल ती सर्व मुलीच्या बापाकडेच रहावयाची. ही मुदत ठरवितेवेळीं मात्र वधू व वर या दोहोंकडील चार मंडळी एकत्र बसून लग्नाचा चांगला दिवस पाहून थोडीतरी दारु पिऊन ती मुदत ठरवितात. म्हणजे गरीबीचा लग्नविधि उरकला. याला "लमजाना" पद्धत म्हणतात. "लग्न" याचा अपभ्रंश "लम" व जाना हा उर्दु शब्द आहे. "जाना" म्हणजे जाणें. दुसऱ्या पद्धतीनें वर हा वधूघरीं मुदत संपेपर्यंत राहण्यास जातो त्यावेळपासूनच तो नवरा व ती बायको म्हणून वागतात. या मुदतींत मूलबाळ झालें तरी हरकत नाहीं. ही गरीबीची फारच थोड्या खर्चांत लग्नविधी उरकून घेण्याची पद्धत. ही "लमजाना" पद्धत या लोकांत फारच आहे.

कोरकु लोक अलीकडे धान्य व पैसे बाळगूं लागले आहेत. त्यांनीं आपल्या गरजा वाढविल्या नाहींत. ते देवीचे उपासक आहेत. कुणबी लोक या कोरकु लोकांशीं

रोटी बेटी व्यवहार करूं शकत नाहींत. याचें मुख्य कारण कोरकु लोक रानटी डुकराचें मांस खातात. ते लोक फार गरीब, भित्रे, उपासास काटक, विश्वासु, आहेत. त्यांना कोणी त्रास दिला अगर भीति घातली तर ते गांव सोडून मुलाबाळांसुद्धां एका रात्रींत दुसरीकडे निघून जातात. मग जमिनीवर पीक असलें तरी ते परवा करीत नाहींत. आतां ते लोक सुधारत चालले आहेत. ते लोक पाण्यापासून दूर डोंगराळ प्रदेशांत राहतात. डोंगरांत राहणें त्यांना फार आवडतें. जंगलांतील शिकारीवर भर विशेष.

वरील लोकांपैकीं कांहीं लोक फारच स्वच्छ रीतीनें राहतात. त्यांपैकीं परधान हे फार स्वच्छ राहतात. ते लोक दिसण्यांतहि सुरेख. कपडा गरीबीचा पण स्वच्छ. एक दोन भांडीं पण स्वच्छ. घर व भोंवतालची जागा स्वच्छ ठेवितात. त्यांच्या खालो-खाल गोंड व कोरकु. कोलामांचा सर्वांत नंबर खालीं.

गोंड, परधान, कोलाम या लोकांचीं लग्नें पहिल्या पद्धतीनें होतात. दुसऱ्या पद्धतीनें त्यांचीं लग्नें थोडीं होतात. गोंडांत दोन जाती आहेत. एक राजगोंड व दुसरी साधे गोंड.

वऱ्हाडांत गाविलगड किल्ला आहे. तो किल्ला मेळघाट तालु-क्यांत आहे. हा तालुका उमरावती जिल्ह्यांत आहे. हा गाविलगड किल्ला पूर्वी गोंड राजाची राजधानी होती. सन १८०४ सालीं ह्या किल्यांत मोठी लढाई होऊन गोंड राजाचा पराभव झाला ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. गोंड राजाची एक आख्यायिका आहे ती अशीः—

गोंड राजानें आपल्या मुलीचें लग्न ठरविलें. तिथी कायम केली आणि त्यानें लग्नासाठीं सामग्री जमविण्याचें काम चालविलें. राजकन्या आपल्या दासीसह किल्यां-तच फिरावयास निघाली असतां मेंढ्या, बकरीं, कोंबडीं वगैरेंचा जमाव तिनें पाहिला. त्या मेंढ्या, बकऱ्या ओरडत होत्या. त्यावेळीं त्या राजकन्येनें आपल्या दासींना विचा-रिलें कीं ह्या इतक्या कशासाठीं जमविल्या आहेत? त्यावर दासींनीं उत्तर दिलें कीं, आपल्या लग्नसमारंभांत वरपक्षाला मेजवान्या देण्यासाठीं ही सामग्री आहे. त्या राज-कन्येला फार वाईट वाटलें कीं इतक्या प्राण्यांचा नाश आपल्या लग्नाप्रीत्यर्थ होणार ना? असें आहे तर लग्नच नको असें म्हणून ती राजकन्या अरण्यांत निघून गेली. तीच पुढें शबरी या नांवानें प्रसिद्धीस आली.

## मध्यप्रांतांतील पोळ्याचा सण

हा सण मध्यप्रांत व वऱ्हाड यांमध्यें फार मोठा गणला आहे. गाईमध्यें उत्पत्ती-साठीं बैल सोडतात त्या बैलास पोळ म्हणतात. कोणी आक्या म्हणतात. ह्यावरून पोळा हा शब्द झाला आहे. नागपूरवऱ्हाड हा प्रांत शेतीविषयीं जगप्रसिद्ध आहे.

त्यामुळें शेतकऱ्यांचा भरणा मोठा आहे म्हणजे सरासरी शेतीवर निर्वाह करणारे शेंकडा ८० लोक आहेत. तें लोक शेतीसाठीं गाई फार बाळगीत असत. तसेंच फिरते लोक बंजारी, लभानी यांच्यापाशीं गाई फार असत. कारण चरण्यास जंगल मोठें असे. तो शेतकरी वर्ग हा सण फार आनंदानें करतो. हा सण दर श्रावण वद्य अमावास्येस होत असतो. मुंबई इलाख्यांत दर आषाढ वद्य अमावास्येस "बेंदुर" म्हणून सण पाळतात.

अमावास्येच्या अदल्या दिवशीं सायंकाळपासून बैलाची सुश्रूषा शेतकरी लोक करतात म्हणजे सायंकाळीं बैलाचे खांदे तेल लावून रगडतात व तेलबुगऱ्या त्यांस खाऊं घालतात. पोळ्याच्या दिवशीं बैलांना नदींतून पोहवून धुऊन घरीं आणतात व कांहीं लोक घरींच त्यांना धुतात. नंतर ते त्यांची पूजा करतात. लोक आपल्या ऐपतीप्रमाणें बैलास दागिने घालतात.

पुढें तिसरे प्रहरानंतर गांवांतील बैल एकत्र जमण्यास सुरवात होते. प्रत्येक गांवांत पोळ्याची जागा म्हणून ठरविलेली असते. ती पूर्वी चांगलें मखर करून सुशोभीत करीत असत. हल्लीं पूर्वीप्रमाणें प्रकार होत नाहीं. तथापि तोरण उभारतात. प्रत्येक गांवांत कोणातरी–देशमुख, देशपांडे, पाटील, पटवारी (कुळकर्णी) वगैरे गृहस्थांचा पूर्वीपासून चालत आलेला मान असतो. तो मान म्हणजे तोरणाखालून प्रथम त्या ठरलेल्या गृहस्थाचा बैल निघून गेला म्हणजे नंतर दुसऱ्या कोणा गृहस्थाचा ठरलेला मान असल्यास त्याचे बैल त्या तोरणाखालून जातात. मग सर्वच बैल एकामागून एक असे जातात. त्यास पोळा फुटला असें म्हणतात.

या मानासाठीं भाऊबंद, मुंड (तट) यांच्यामध्यें मारामाऱ्या होऊन खुनापर्यंत मजल येऊन पोंचे व हल्लींहि कमी प्रमाणावर कां होईना पण तंटे होतात. याच मानाच्या हक्कासाठीं दिवाणी कोर्टांत मुकदमे झाले आहेत व हल्लींहि होतात.

जेव्हां पोळा फुटतो त्यावेळीं कोणी बैलावर रेवड्या, कवड्या, पै, पैसे उधळतात. मात्र सर्वच ठिकाणीं हा प्रघात नाहीं. कांहीं थोड्या ठिकाणीं हा रिवाज आहे.

दुसरे दिवशीं "मारबद" म्हणून पाळतात. शेतकरी लोक व इतर लोक अष्टीच्या झाडाचा पाला अगर पडाळाचें फूल परस्परांच्या घराच्या पाबळीस अगर दरवाजाजवळ कोठेंतरी बांधून ठेवितात. त्या पाल्याला एक प्रकारचा वास येतो. त्या पाल्यावर घरांतील ढेकूण, डास, चिलटें, घुंगुरुटे, पिसा वगैरे येऊन बसतात. त्यामुळें लोकांना यांचा त्रास कमी होतो असा लोकांचा अनुभव व भाव आहे. यास "मारबद" म्हणतात. यावरून असें अनुमान निघतें कीं त्रास बंद करणारी ही वनस्पति असावी.



अनुक्रमणिका

नंतर तिसरे दिवशीं " बडगा " म्हणून दिवस पाळला जातो. त्या दिवशीं प्रत्येक घरच्या मुख्य माणसानें अगर दुसऱ्या एखाद्यानें हा " बडगा " करावा. बडगा म्हणजे एका कोऱ्या ( नवीन ) मडक्यांत कवडया, बिब्बे, केस, फुलें, हळदकुंकू, घालून प्रात:काळीं म्हणजे कोणास न दिसेल इतक्या सकाळीं ४—५ वाजतां मुकाट्यानें घरांतून जाऊन तें मडकें दूर अंतरावर गांवाबाहेर फोडून पूजा करावी लागते; मडक्यांतील पदार्थ जाळून टाकतात. म्हणजे कोणत्याहि प्रकारची पीडा, रोगराई येत नाहीं असा लोकांचा समज म्हणा किंवा भाव म्हणा आहे. ही एक प्रकारची देवीची पूजा आहे. क्षुद्र देवता शांत करण्याचा हा प्रकार असावा असा तर्क आहे.

त्याचप्रमाणें आषाढ महिन्यांत " घोळाणा " म्हणून एक प्रकारचें चूर्ण तयार करतात. या महिन्यांत केव्हांहि तें तयार करून घरांतील माणसें खातात. तें चूर्ण खाण्यास चांगलें लागतें; व त्यामुळें शरीरप्रकृति बिघडत नाहीं.

यामध्यें जे पदार्थ घालतात ते:—

| | | |
|---|---|---|
| बाळंतनिंबाचीं कोवळीं पानें. | बिब्बे. | चिंच. |
| मिरीं. | काळें मीठ ( पादेलोण ) | सैंधव |

हे सर्व एकत्र कुटून तुपांत तळतात. नंतर तें चूर्ण करून थोडें थोडें घरांतील मंडळीस खाण्यास देतात.

---

# साष्टींतील कोळ्यांचीं गाणीं

(लेखक:- ग. त्र्यं. देसाई-कोल्हटकर)

खालीं दिलेलें गाणें साष्टी प्रांतांतील कोळी लोकांच्या स्त्रियांच्या तोंडचें आहे. साधारणत: चैत्र महिन्यांत स्त्रिया हें गाणें म्हणतात. म्हणतांना दोघी दोघी अथवा चाघी चाघी फेर धरून म्हणतात. वस्तुत: शंकर-भिल्लीणआख्यान, दक्षयज्ञ व पार्वतीचें शंकराशीं लग्न हीं आख्यानें भिन्न आहेत, परंतु खालीं दिलेल्या गाण्यांत तीं सर्व एके ठिकाणीं घातलीं आहेत. तथापि साक्षर नसलेल्या, केवळ व्यवसायोपजीवी जातीच्या स्त्रियांना आपल्या पुराणांची इतपत मांहिती आहे ही आनंदाचीच गोष्ट आहे.

## गाणें गौरीचें

शंकर पार्वती सोंगट्या खेळत होतीं ।
डाव जो केला पार्वती बाईनें ।
शंकर हारोनि हारोनि जो गेला ।
शंकर नागवा[१] नागवा काय केला ।
शंकर पळाला कांवी वनाला ।
त्या पार्वतीला विचारु पडला ।
आतां शंकर कोणाशीं[२] येईल ।
मग तिनें घेतलें भिल्लिणींचें रूप ।
तिनें बांधील्या पायाला घागुऱ्या ।
कमरे बांधिली मोराचीं काय पिसें ।
नाचत गेली ओ[३] कांवी वनाला ।
त्या शंकरानें नेत्र उघडुनी ।
नेत्र उघडुनी तिला बोलला ।
तूं कोणाची कोण ग हास[४]।
मी हाव[५] कारे रानाची भिल्लीण ।
शंकर भुलोनि काय गेला ।
मग तिचे पाठीन् पाठीन् काय लागला ।
तिनें भुलवीत भुलवीत घराला आणिला ।
तिनें सोडीलें सोडीलें भिल्लीणीचें रूप ।
मग घेतलें घेतलें पार्वतीचें रूप ॥१॥
दक्ष[६] राजाचे घरीं ।
उत्सव होमाचा होमाचा चालला ।
खबर कांहीं नाहीं पार्वती बाईला ।
सांगत गेले हो नारद काय मुनी ।
अगो पार्वती पार्वती गो बाई ।
तुझ्या बापाचे बापाचे गो घरीं ।
उत्सव होमाचा होमाचा चालला ।
देवा, जातें मी बापाचे काय घरीं ।
बोलूं लागला पार्वती बाईला ।
भार्ये बोलवण्या बोलावण्या वांचूनी ।

---

१ द्युतांत हरतां हरतां शेवटीं शंकराच्या अंगावरील वस्त्रेंहि पार्वतीनें जिंकलीं. २ कोणाबरोबर. ३ ती हा शब्द आर्ष्टीतील पांचकळशी जातींतहि आइळतो. ४ आहेस. ५ आहे. ६ ही कथा वास्तविक आर्धीची आहे.

कधीं जाऊं नये आपले माहेरीं
नाय ऐकिलें पार्वती बाईनें ।
निघून् गेली ती बापाचे काय घरीं ।
उत्सव होमाचा होमाचा काय चालला ।
कोणी विचारिना पार्वती बाईला ।
सगळे देवांना बोलावणूक[७] काय केली ।
नाहीं विचारिलें शंकर देवाला ।
मग त्या पार्वतीचा अपमान काय झाला ।
तिचे आईनें आईनें बोलाविलें ।
आपले हाताचें कंकण[८] काढिलें ।
तें घातलें पार्वतीचे हातीं ।
त्या पार्वतीला रागू[९] रागू आला ।
तिनें टाकिली होमामधें उडी ।
खबर कळली शंकर देवाला ।
जटा आपटिली, आपटिली धरणीला ।
त्यांशीं[१०] युगभद्र[११] भद्र काय निघाला ।
तो आलाय ग दक्षाचे काय घरीं ।
त्याचे मागुनी शंकर काय आला ।
शंकर रागानीं, रागानीं जो आला ।
त्यानें मारीलें, मारीलें दक्षाला ॥२॥

मग पार्वती गेली हिमाल्याचें पोटीं ।
शंकर गेला हिमाल्या पर्वतावर ।
शंकर तपाला तपाला बसला ।
ती पार्वती, पार्वती गो बाई ।
ती निघाली हिमाल्याचे पोटीं ।
हातीं घेतला फुलांचा करंडा ।
फुलें वेंचीत वेंचीत चालली ।
वेंचीत गेलीन् शंकराजवळी ।
शंकरानें नेत्र उघडिले ।
नजर लागली शंकर देवाची ।
शंकर तिचे पाठीं काय लागला ॥३॥

---

७ बोलावणें. ८ यज्ञकंकण. ९ राग. अकारान्त नामें उकारान्त करून वापरण्याचा प्रघात जुन्या काव्यांत आढळतो, १० त्यांतून ११ वीरभद्र असावा.

वरील गाण्यासारखेंच एक गाणें महाराष्ट्रांतील वृद्ध स्त्रियांच्या पाठांत आहे तें अप्रकाशित असल्यामुळें व मौजेचें वाटल्यावरून खालीं देत आहें.

## भिल्लीण

सारीपाट शिव खेळतीं पार्वती । डाव हारी जिंकी मांडियेला । डाव हारी जिंकी ।
प्रथम जिंकीला त्रिशूळ डमरू । शुभ्रसर्प हारू रुंडमाळा । शुभ्र सर्प हारू ।
गजचर्मावर विभूतीचा गोळा । जिंकीयला भोळा महादेव । जिंकीयला भोळा ।
नारद येऊनी गंगे करी श्रूत । नेलें सर्व वित्त पार्वतीनें । नेलें सर्व वित्त ।
गंगा ती येवोनी[१] शंभू तो न्याहाळी । कौपीन घेतली फेडूनीया । कौपीन घेतली ।
महादेव म्हणे कदा मी राहीना । जाईन मी वना तपालागी । जाईन मी वना ।

चाल:—शंभू केव्हां मज भेटेल, श्रम राहील, जिवा लागला घ्यास ।
संचीत हें कैसें घडविलें, शिव दवडिलें, झालें जनांत हांसं ।
आतां कैसा करूं विचार, कैसें घरदार, घ्यावा आतां वनवास ।
शिवासाठीं झाली भिल्लीण, जगमोहिनी, गिरिजा झाली उदास ॥१॥ध्रु०॥

वस्त्र नेसलीसे धोंगडा[२], माथा बुचडा, चोळी ल्याली उफराटी ।
सोगीयाचें[३] ल्याली अंजन, दिव्य भूषण, भांग टिळा ल्लाटीं ।
मार्गीं चालतांना चमकली, शिवें देखिली, कोण नार गोमटी ।
ती काय आम्हाशींहो बोलेल, भाग्य फळेल, वेडे झाले जगजेठी ॥शिवासाठीं०॥२॥

आम्हीं एकलें हो हे वनीं, होई कामीनी, तुझा छंद लागला ।
रिद्धी सिद्धी दासी करीन, सेवे आणीन, मान देई गे बोला ।
मी तरि परवधू आहे पतिव्रता, भिल्लाची कांता, माझा पती दारुण ।
तुम्ही तर तापसी दिसतां, साधू भासतां, कांहो विषयीं भुलला ।
माझा पती आहे रागीट, मोठा जुनाट, काय भय सांगावें त्याचें ॥शिवासाठीं०॥३॥

तुम्हीं एकीचा हो शेवट लावीला नीट, नका बोलूं वचन ।
तुम्हां जरी स्त्रिया पाहिजे, घरा जाईजे, गिरिजा करी रुदन ।
गिरिजीच्या मी घरा न जाईन, तोंड न पाहीन, आम्हीं तरि वाहिलिसे आण ॥
शिवासाठीं० ॥ ४ ॥

रामव्यानीं मनीं निजमग्न, झाले उद्विग्न, राम चित्तींचा गेला ।
पार्वतीनें सरळा आपुला, करीं धरीला, घरा आणीला प्रेमलोचना आलीं ॥शिवासाठीं॥

---

१ पार्वतीनें त्रिशूळ, डमरू वगैरे सर्व जिंकून घेतल्यानंतर गंगेनें ( जटेंतून ) खालीं येऊन शंकरास न्याहाळलें. २ सुती लुगडें. ३ भुवईच्या बाहेरच्या टोंकापासून कानशिलावरून सुरम्याची रेषा नेऊन त्या रेषेला शेवटीं तीन फांटे फोडण्याची पूर्वी वहिवाट असे. या शृंगाराचें हें नांव आहे.

# कथा.



( लेखक. ना. गो. चापेकर )

एक कोरडा देश होता. तेथें एक भट व भटीण होती. त्यांस दोन मुलें होतीं. नवराबायकोनीं विचार केला कीं आपण काशीयात्रेस जावें. भटीण म्हणाली आपण म्हातारीं झालों. आपणांस चालवणार नाहीं. मुलें घरीं ठेवूं. भट म्हणाला एक तूं कडेवर घे, एक मी घेईन. त्याप्रमाणें मुलें कडेवर घेऊन दोघें यात्रेस चाललीं. तेव्हां तो भट एक वण सांडतो( मागें टाकतो ), दुसरा मांडतो ( पुढें येतें ), तिसऱ्या वणाचे घेग घेतो ( भयंकर रान लागतें ). असल्या रानांत जाऊन भटीण भटाला विचारते आपण तीन रानें टाकलीं त्यांचीं नांवें काय ?

भट म्हणतो पहिल्या रानाचें नांव ऐराण, दुसरें पैराण, तिसरें कौकष्टीराण आणि चौथें भयंसूरराण. करंदीच्या जाळी किरकिरा वाजती, हाडळी वया ( गाणीं ) गाती, धुंधुंस्वर नाचती; राकस ( राक्षस ) पिठा कांडती; ढवळे कावळे, फुलें पंगारे, कासवाएवढा ढेकूण, लिल्याएवढें मीरकूट, गाढवाएवढा ससा, मोराला हात हात दांत, असल्या रानांतून आपण चाललों आहों. पुढें जातां जातां अर्ध्या रानांत भटणीला तहान लागली. तेथें कास्तुर नांवाच्या गोसाव्याचा मठ असे. तेथें तीं गेलीं. बुवा बुवा म्हणून हाका मारूं लागलीं. तो बुवा तपाला बसला होता म्हणून त्यानें हाक दिली नाहीं. तप पुरें होऊन तो त्यांच्याजवळ बोलूं लागला, तुम्हांला काय पाहिजे ? भट म्हणतो आम्हांला आधीं पाणी पाजा. पाणी पिऊन शांत झाल्यावर गोसाव्याला भट-भटीण बोलूं लागलीं कीं आमचीं दोन मुलें तुझ्या घरीं राहूं दे. आम्हीं परत आलों म्हणजे झालेला खर्च देऊन मुलें घेऊन जाऊं. गोसावी म्हणतो, अर्धेल देशील तर मुलगे ठेवतों. भटीण कबूल झाली. मग गोसाव्यानें मुलांचीं नांवें विचारलीं. एकाचें नांव लालमणी, दुसऱ्याचें भौरमणी. मुलें ठेवून दोघं काशीस गेलीं. गोसावी मुलांस विद्या शिकवूं लागला. मोठा मुलगा कमी शिकला. धाकटा जास्ती शिकला. गोसाव्यानें मुलांस आवड देशचें व गावड देशचें पाणी आणण्यास सांगितलें. उपर दोघे मुलगे ऐराणांत गेले. तेथें एका मोठ्या डोंगरावर लाल सर्प तोंडानें लाळ टाकीत होता. ती मोठ्या भावानें मडक्यांत भरली. धाकट्यानें अंगावरचा फडका काढून दहिंवर पडलें होतें त्यावर घालून तो पिळला आणि मडकें भरलें. धाकटा भाऊ प्रथम मठांत आला. गोसाव्यानें त्यास शाबासकी दिली. मोठा भाऊ अर्ध्या वाटेस आला, गोसाव्याचा एक बहिरा ससा पाळलेला होता त्यानें त्याच्यावर झडप टाकून मडकें फोडलें. मुलगा घरीं रिकामा आला. गोसाव्यानें विचारलें पाणी कां नाहीं आणलें. मुलगा

अनुक्रमणिका

म्हणाला पाखरानें मडकें पाडून पाणी सांडलें. गोसावी मनांत ध्यानला. पुढें आईबाप मागाहून आलीं. गोसाव्यानें मोठ्या मुलाच्या अंगावर पुष्कळ दागिने घातले. धाकट्या-च्या अंगावर थोडे घातले. दोनहि मुलगे आईबापांच्या पुढें उभे केल्यावर भटणीनें मोठा मुलगा घेतला. धाकटा नाकारला. तिघं घराकडे चाललीं. धाकटा मठांतून पळून आईबापांच्या मागोमाग आला. मग चौघे एका तळ्यावर विसांवा घेण्यास बसले. गोसावी ध्यानस्थ होऊन पहातो तों धाकटा मुलगा गेल्याचें त्यास समजलें. गोसावी तेव्हां त्याच्या मागोमाग गेला. गोसाव्याला चौघांनीं पाहिला. तेव्हां तळ्यांत म्हैस बसली होती तिच्या शिंगांत घुंग होऊन धाकटा मुलगा जाऊन बसला. गोसाव्यानें ध्यानस्थ होऊन तें ओळखिलें. मग म्हैस कोणाची म्हणून त्यानें चौकशी केली. माग-शील ती किंमत देईन पण ही म्हैस मला दे असें गोसावी म्हशीच्या धन्यास म्हणाला व ती किंमत देऊन त्यानें म्हैस घेतली व शिंग फोडून पाहिलें तों तो घुंग तेथून उडाला. नंतर गोसावी बहिरा ससाणा झाला आणि घुंग पकडण्याचा त्यानें प्रयत्न केला. पण तो सांपडेना. तो घुंग एका मारुतीच्या देवळांत गेला व मारुतीच्या पाठीला जाऊन बिलगला. मागोमाग गोसावी गेला. घुंग तेथून निघाला तो इन्द्रसभेंत गेला. गोसावी पण तेथें त्याच्या मागोमाग गेला. इन्द्राची कन्या तपाला बसली होती. तिनें असा पण केला होता कीं मृत्युलोकचा जो कोणी येईल त्याला मी भ्रतार करीन. त्या मुलीच्या गळ्यांत नवरत्नांचा हार होता त्यांत तो मुलगा शिरून बसला. त्यानें इन्द्राच्या मुलीला सांगितलें तूं हार गोसाव्यास दिलास तर सबंध तरी देऊं नको. तोड आणि भुईवर हापट. पुढें हाराची किंमत ठरून तो तिनें गोसाव्यास दिला; पण तोडून हाप-टून दिला. तेव्हां गोसावी कोंबडा होऊन हारांतलीं रत्नें वेचून तीं खाऊं लागला. तेव्हां तो मुलगा पुनः घुंग होऊन मृत्युलोकीं आला व एका विहिरींत गेला. तेथें तो बेडूक झाला. इतक्यांत तेथें गोसावी आला व सर्प झाला आणि बेडकाच्या मागें लागला. तेव्हां तेथून तो मुलगा निघाला. एका सावकाराचा घोडा होता त्याच्या लगामांत जाऊन शिरला. घोड्याच्या धन्याला त्यानें सांगितलें कीं तूं घोडा विकलास तरी लगाम देऊं नको. इतक्यांत गोसावी तेथें आला. त्यानें घोड्याची किंमत केली व तो घेतला. पण सावकारानें लगाम काढून घेतली. गोसावी तक्रार करूं लागला. मी लगामीसकट घोडा घेतला आहे. तूं लगाम ठेवूं नकोस. मुलानें धन्याला सांगून ठेविलें होतें कीं लगाम कदाचित् दिलीस तरी जीन देऊं नको. गोसाव्याला लगाम मिळाली. नंतर गोसावी जीन मागूं लागला. सावकार म्हणतो जिनासकट तुला घोडा दिला नाहीं. मुलानें सांगून ठेविलें होतें कीं जीन दिलास तरी पायाची काढणी देऊं नको. त्याच गांवांत गोसावी गारुड्याचें सोंग घेऊन आला व आपले खेळ करूं लागला. खेळ पहाण्यास सावकार आला होता. इतक्यांत सावकाराचा घोडा पोपट होऊन सावकाराच्या कन्ये-च्या खोलींत गेला. तिनें त्या पोपटाला धरून उत्तम तऱ्हेचा पिंजरा करून त्यांत ठेविला. इकडे गारुड्यानें "विद्या जपून" पाहिलें तों त्यास घोडा पोपट झाल्याचें कळलें. नंतर

खेळ झाल्यावर उत्तम खेळ झालेला पाहून तुला काय देऊं असें गारुड्यास सावकारानें विचारलें. गारुडी म्हणाला मला तुझा पैसा नको. तुझ्या मुलीजवळ एक पोपट आहे तो पाहिजे. सावकारानें पोपट देण्याचें कबूल केलें. तो घरीं गेला व आपल्या मुलीजवळ पोपट मागूं लागला. तिनें सांगितलें, सर्व देईन पण हा पोपट मागूं नको. बाप म्हणाला, पोपट बाजारांत कितीतरी येतील ते मी तुला घेऊन देईन. असें म्हणून तो पोपट बापानें घेतला आणि त्या गारुड्याकडे आणला. गारुड्याच्या हातांत सावकारानें पोपट देतांच तो पोपट डाळींब झाला. तें डाळींब ताबडतोब फुटून त्याचे दाणे भुई-वर पडले. तो गोसावी ताबडतोब कोंबडा होऊन दाणे खाऊं लागला. कैक त्यानें खाल्ले. कैक शिल्लक राहिले. राहिलेल्या दाण्यांचा कोल्हा झाला. कोल्हा होतांच कोल्ह्यानें कोंबडा मारून खाल्ला. मग तो कोल्हा परत मुलगा होऊन सावकाराच्या घरीं आला. तेथें त्याचें सावकाराच्या मुलीशीं लग्न लागलें. नंतर तो बायकोला घेऊन आपल्या घरीं आला. तेथें तीं आनंदानें खाऊन पिऊन राज्य करूं लागलीं.

( ही गोष्ट एका ठाकराकडून घेतली आहे. )

---

# परीक्षण

## डॉ. भांडारकर यांचें चरित्र

(परीक्षक-ना. गो. चापेकर)

**वृत्तेन हि भवत्यार्यो न धनेन न विद्यया**

विद्वत्ता, समाजसुधारणेची कळकळ, निष्कलंक वर्तन, अनुकरणीय शिस्त, उद्योगशीलता, दीर्घायुष्य इत्यादि कारणसमुच्चयामुळें डॉ. भांडारकरांचें भावी पिढीला आदर्शभूत असलेलें चरित्र शब्दग्रथित होऊन प्रसिद्ध होणें अगत्याचें होतें यांत संशय नाहीं. चरित्रलेखनाकडे अलीकडेच लोकांचें लक्ष्य लागत चाललें आहे. तथापि गोपाळराव गोखले, काशिनाथपंत तेलंग इत्यादि पुष्कळ मोठ्या माणसांचीं विस्तृत चरित्रें अद्यापि लिहिलीं गेलीं नाहींत. टिळक आणि मंडलीक यांचींच विस्तृत चरित्रें मराठींत लिहिलेलीं दिसतात. त्यांतहि मंडलिकांच्या चरित्राचा मंडलिकी व्यवस्थितपणा टिळकचरितांत अगोचर असल्यामुळें त्याच्या सुधारलेल्या आवृत्तीची मार्गप्रतीक्षा करीत बसणें भाग झालें आहे. रानड्यांचें चरित्र मोठें आहे हें खरें पण तें याहूनहि विस्तृत लिहितां येणें अशक्य नव्हतें. रानड्यांच्या चरित्राचीं हल्लींच्या इतकीं दोन पुस्तकें तरी निदान पाहिजेत. असो. अशा स्थितींत डॉ. भांडारकरांचें चरित्र त्यांच्या निधनानंतर लवकर प्रसिद्ध झालेलें ऐकून कोणासहि आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. पण प्रस्तुत चरित्र वाचल्यावर हा आनंद विरघळून जातो. रा. कर्नाटकी यांच्या हातून भांडारकरांचें चरित्र चांगलें वठलें नाहीं असें आम्हांस वाटतें. वाटेल त्याला चरित्र लिहितां येईल असें नाहीं. रा. कर्नाटकी हे चांगले लेखक आहेत. पण त्यांनीं लिहिलेलें चरित्र एखाद्या अनभ्यस्त माणसानें ल्याहावें अशासारखें झालें आहे. विषयाची मांडणी साधली नाहीं. प्रमाणांच्या आवश्यकतेकडे दुर्लक्ष्य झालें आहे. समतोलपणा ठेवण्याचा प्रयत्न सुद्धां करण्यांत आला नाहीं. अशिक्षितांच्याकडून घडणारा पुनरुक्तीचा दोष टाळतां आला नाहीं. तारतम्याच्या अभावीं अतिशयोक्तीनें सर्व चरित्र डागळलेलें आहे. स्वमतनिवेदनाच्या हौसेमुळें भाकड मजकुरानें चरित्र भरलें आहे. सारांश भांडारकरांच्या चरित्राला भाटकथेचें स्वरूप प्राप्त झालें आहे. चरित्रनायक एकच पण श्री. द्वा गो. वैद्य यांनीं लिहिलेलें चरित्र व रा. कर्नाटकी यांचें चरित्र हीं दोन वाचलीं तर एकाच वाचकावर निरनिराळे परिणाम होतात. अगदीं विरुद्ध पक्षांतील माणसाला सुद्धां आपल्याबरोबर घेऊन जाण्याचें कसब रा. वैद्यांना साधलेलें दिसतें. पण रा. कर्नाटकी यांचें चरित्र वाचीत असतांना वाचक त्यांच्याबरोबर भांडण्याला क्षणोक्षणीं उत्सुक होतो. असा विपरीत परिणाम होणें चांगलें नाहीं. प्रस्तावना लिहिण्यापूर्वीं रँ. परांजप्यांच्या व समर्पण करण्याची परवानगी देण्यापूर्वीं न्या. माडगांवकर यांच्या नजरेखालून हें चरित्र गेलें होतें काय ? असल्यास या दोघा विद्वद्वर्यांस त्यांत कांहींच वावगें दिसलें नाहीं काय ? आहे याच स्थितींत डॉ. भांडारकरांचें चरित्र जगापुढें यावें असेंच का त्यांना वाटलें ? चरित्र कसें असावें, कसें ल्याहावें, याची कल्पना वरील विद्वानांना नाहीं असेंच का म्हणावयाचें ? परांजपे व माडगांवकर यांनीं आपली जबाबदारी ओळखली असती तर कदाचित् याहून चांगल्या स्थितींत चरित्र प्रकट झालें असतें.

चरित्रलेखकानें आपणच पदोपदीं चरित्रनायकाला मोठेपणाचीं व चांगलेपणाचीं विशेषणें देणें शक्य तों टाळावें. अशा रीतीनें गोष्टी वाचकांपुढें मांडाव्या कीं त्याच्या मनांत चरित्रपुरुषाविषयीं न

सांगतांहि पूज्यबुद्धि उत्पन्न व्हावी. श्री. कर्नाटकी यांना हा नियम मान्य नाहीं असें दिसतें. भांडारकरांच्या भाषणांचा व लेखांचा उल्लेख करतांना अत्यंत महत्त्वाचें, सुविचारपरिप्लुत, अतिसुंदर, अत्यंत समंजस, अत्यंत हृदयंगम, अश्रुतपूर्व, विद्वत्त्वपूर्ण, अप्रतिम इत्यादि विशेषणांचा उपयोग केला नाहीं असें एकहि स्थळ आढणार नाहीं. अतिशयोक्ति हा या पुस्तकाचा आत्माच आहे. पुस्तकाला प्रारंभ अतिशयोक्तीनेंच झाला आहे. "डॉक्टर सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें नांव माहीत नाहीं असा अशेष हिंदुस्थान देशांत एकही साक्षर मनुष्य नसेल." हिंदुस्थानांतील सर्व मोठ्या माणसांचीं नांवें श्री. कर्नाटकी यांस तरी माहीत आहेत काय? यानंतर– एकंदरींत रामकृष्णपंतांची योग्यता ओळखून त्यांच्या विद्वत्तेचें जेथें तेज पडेल असें **खातें** हॉवर्ड साहेबांनीं **शोधून काढलें** (पृ. ५६); त्यांचें शिकवणें गुरू झालें कीं **ज्ञानगंगेचा प्रवाह समोरून चालला आहे,** असें विद्यार्थ्यांस वाटे (पृ. ६९); त्यामुळें कित्येक युरोपीयन प्रोफेसरांना देखील त्यांच्याबद्दल आदर – किंबहुना एक प्रकारचा **वचक** वाटे (पृ. ७४); त्यांची दुसऱ्या ठिकाणीं बदली झाली तरी पहिल्या ठिकाणची शिस्त **कैक वर्षेंपर्यंत** बदलूं नये (पृ. ७६). (याचें श्रेय मागाहून आलेल्या हेडमास्तरांना कांहींच नाहीं काय?) जुन्या विद्यार्थ्यांची पुढें गांठ पडल्यास ते आपली गंभीर वृत्ति **क्षणभर बाजूस ठेवून** त्यांच्याशीं **सलगीनें बोलत देखील**! (पृ. ७७); वरील शार्मण्यदेशीय पंडितानें आपल्याजवळ (?) अत्यंत लीनता घेऊन डॉ. भांडारकरांना संस्कृतमध्यें लिहिलेलें पत्र वाचून आमच्या मनांत **नानाप्रकारचे विचारतरंग** उठूं लागले? (कोणते ते?) (पृ. १६६)– संस्कृत वाङ्मय मग धर्मशास्त्र असो अगर इतर प्रकार असो–हा डॉ. भांडारकरांचा नित्याचाच विषय. तेव्हां अमुक विषयावरील अमुक ग्रंथ, **किंबहुना अमुक श्लोक किंवा अमुक पृष्ठ** देखील **सहज** सांगतां येईल इतका त्यांचा ग्रंथपरिचय असावा यांत आश्चर्य नाहीं (पृ. २५२); त्या वादविवादांत दिसून येणारें डॉक्टरसाहेबांचें **अगाध** ज्ञान, त्यांचें विस्तृत वाचन व मुद्देसूद रीतीनें वादविवाद करण्याची त्यांची हातोटी ही केवळ अप्रतिम असून ते त्या गुणांच्या योगानें सगळ्या सभेस **थक्क करून सोडीत असत** (पृ. ३०९).

अतिशयोक्तीच्या जोडीला भाषादोष येऊन मिळाला म्हणजे पुस्तकाच्या योग्यतेंत कमीपणा येणें स्वाभाविक आहे. म्हणून कांहीं भाषेचे मासले देऊं. " रामकृष्णपंतांच्या जन्मपत्रिकेवरून पुढील प्रमाणें स्थिति त्यांच्या जन्मकालीं होती असें स्पष्ट दिसतें" (पृ. २) स्थिति कशाची? व ती पुढें कोठें सांगितली आहे? तसेंच "स्पष्ट" शब्दाची येथें आवश्यकता काय? तृतीयायुक्त चतुर्थी, गुरुवार इत्यादि जन्मकालविषयक कांहीं गोष्टी कुंडलीवरून समजण्यासारख्या नसतात. आणखी उदाहरणें देऊं. गोपाळरावांनीं आपल्या मुलास इंग्रजी शाळेंत घातलें याबद्दल त्यांच्या **धैर्याची** स्तुतीच केली पाहिजे (पृ. ५). आम्हांला वाटतें श्री. कर्नाटकी यांच्या मनांत "दूरदर्शित्वाची" म्हणावयाचें होतें. इंग्रजी शाळेंत मुलाला घातल्यास तेव्हां जात त्या कुटुंबास वाळीत टाकीत असे असें श्री. कर्नाटकी म्हणत नाहींत. मग धैर्याचा प्रश्न कोठें येतो? पृष्ठ २२ व २३ मध्यें मेकॉलेसाहेबाचा निर्देश करतांना कुठें एकवचनी तर कुठें अनेकवचनी प्रयोग केला आहे. मेलेल्या साहेबांच्या नांवांचा एकवचनी प्रयोग करण्याचा प्रघात मराठींत पडला आहे तोच कायम ठेवणें बरें. यानंतर पृष्ठ ५४ पहा. "पुढें रामकृष्णपंत चार वर्षांनीं वडिलांस नेहमींप्रमाणें भेटण्याकरतां गेले." या वाक्यांत "नेहमींप्रमाणें" " या शब्दांचें स्वारस्य काय तें समजणें कठीण आहे. " हाताखालचे मास्तर असोत किंवा शाळेंतले विद्यार्थी असेत, सर्वांस समत्वबुद्धीनें वागविण्याविषयींची काळजी"... (पृष्ठ ५७) विद्यार्थी आणि शिक्षक यांच्यांशीं वागणुकीचें रामकृष्णपंतांचें माप एकच होतें असें का ग्रंथकर्त्यांचें म्हणणें आहे! असें असल्यास रामकृष्णपंतांमध्यें हा मोठा दोष होता असेंच कोणी मानील. पण आम्हांस रामकृष्णपंतांची वागणूक तशा प्रकारची असेल असें वाटत नाहीं. आणखी पुढें- "संस्कृत शिक्षणाच्या बाबतींतील कीर्ति इतकी दृढमूल झाली होती कीं ते तिकडून

मुंबईस गेल्यावर देखील कैक वर्षेपर्यंत रत्नागिरी हायस्कुलास जगन्नाथ शंकरशेटच्या दोनपैकीं एकतरी स्कॉलरशिप मिळतच होती." स्कॉलरशिप मिळण्यास विद्यार्थ्यांची हुशारी व मेहनत आणि शिक्षकांचें शिकवण हीं कारणीभूत होतात. नुसत्या शाळेच्या लौकिकानें शिष्यवृत्ति मिळत नसते. या दोहोंमध्यें कार्यकारणभाव मुळींच नाहीं.

एकत्र बसविलेल्या विद्यार्थ्यांत गलबला सुरू झाला होता तो रामकृष्णपंत येतांच बंद झाला या गोष्टीला उद्देशून चरित्रकार लिहितातः "तें पाहातांच तपासणीचे कामगार आश्चर्यचकित झाले." (पृ.६०) आश्चर्यचकित होण्याचें कारण काय? हेडमास्तरांचा मुलांवर दाब असणें शक्य नाहीं असें का तपासणीकामगाराला वाटत होतें? दाब असला पाहिजे आणि तो रामकृष्णपंतांचा मुलांवर आहे हें पाहून तपासणी अधिकाऱ्याला बरें वाटेल इतकेंच. आश्चर्यचकित होण्याचें कारण नाहीं. पण श्री. कर्नाटकी यांस सर्वच गोष्टींचें आश्चर्य वाटतें. त्यांच्या वडिलांची व रामकृष्णपंतांची ओळख होती हें ऐकून सुद्धां श्री. कर्नाटकी यांस आश्चर्य वाटलें (पृ. ८५). रामकृष्णपंत हे जुन्या पिढीचे गृहस्थ होते. त्या पिढीच्या लोकांत विद्यमान पिढीची बेपरवाई नव्हती. त्यामुळें डॉ. भांडारकरांचें वर्तन जुन्या पिढींतील लोकांप्रमाणें असे. हा दोन पिढ्यांतील स्वभावाचा फरक आहे. एकंदरींत डॉ. भांडारकरांच्या संबंधानें श्री. कर्नाटकी यांची अवस्था "आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः" अशासारखी झाली आहे. असो पृ. ८३ मध्यें फायलॉलॉजिकल याचें भाषांतर प्राचीनवाङ्मयसंशोधनात्मक असें केलें आहे. तें आमच्या मतें बरोबर नाहीं. तसेंच पृ. ११९मध्यें पुनर्घटना व Regeneration हे समानार्थी म्हणून शब्द दिले आहेत तेंहि बरोबर नाहीं. नंतर पृ. १२२ पहाः हिंदुस्थानच्या लोकांनीं सदैव **साभिमान कृतज्ञ** राहिलें पाहिजे. साभिमान कृतज्ञ म्हणजे काय? तसेंच Eminent orientalists याचा अर्थ मराठींत प्रसिद्ध आधुनिक संस्कृतज्ञ पंडित या शब्दांनीं उतरतो असें श्री. कर्नाटकी यांस वाटतें काय? प्रसिद्ध हा कशाचा अर्थ? Orienlalists म्हणजे संस्कृतज्ञच फक्त काय? (पृ. १३१). हुशार हा शब्द प्रत्येक ठिकाणीं हुषार असा लिहिला आहे.

ज्याचें चरित्र आपण लिहितों तो मनुष्य मोठा कोणत्या कारणांनीं म्हणावयाचा याची योग्य कल्पना चरित्रलेखकाला असली पाहिजे. ती नसल्यास चरित्रकाराच्या हातून चरित्रनायक विकृतस्वरूपांत जगापुढें येतो. श्री कर्नाटकी यांच्या हातून डॉ. भांडारकरांची कांहींशी अशीच अवस्था झाली आहे असें आम्हांस वाटतें. डॉ. भांडारकरांचें मोठेपण कशांत होतें हें न समजल्यामुळें अलवल्या गलवल्या प्रमाणांनीं तें सिद्ध करण्याचा प्रयत्न हास्यास्पद झाला तर त्यांत आश्चर्य नाहीं. उ.पृ.७४ वर श्री. कर्नाटकी लिहितात, "एकंदरींत डॉ. भांडारकरांनीं आपली सत्यनिष्ठा व स्वतंत्र वहाणा(बाणा?) संबंध नोकरींत कायम ठेविला होता. हाच नमुना त्यांचा विद्यार्थ्यांशीं वागतांना देखील असे"; विद्याखात्याच्या ऐवजीं मुलकी खात्यांत डॉ. भांडारकर असते आणि मग त्यांच्या स्वतंत्र बाण्याची तारीफ केलेली असती तर ती अनाठायीं झाली नसती. पण तेंहि असो. पुढील वाक्य याच्याहिपेक्षां अर्थशून्य आहे. विद्यार्थ्यांशीं स्वतंत्र बाण्यानें गुरुवर्य वागत असत याचा अर्थच आम्हांला समजत नाहीं. विद्यार्थ्यांशीं बाणेदारपणानें वागण्याचे प्रसंग गुरूला कधीं येतात? आणि अल्पवयस्क, परावलंबी, स्वतःच्या मुलांप्रमाणें असणाऱ्या विद्यार्थ्यांना आपला बाणेदारपणा दाखविण्यांत भूषण तें काय? पण यांतच कांहीं विशेष आहे अशी श्री. कर्नाटकी यांची समजूत झालेली दिसते. नाहींतर त्यांनीं "देखील" शब्द वापरला नसता.

निष्काळजीपणानें अगर बोलण्याच्या भरांत भांडारकरांसंबंधानें कोणीं कांहीं प्रशंसापर म्हटलें असलें तर त्याची छाननी न करतां तसेंच्या तसेंच तें देण्यानें डॉक्टर साहेबांच्या लौकिकांत भर न पडतां उणेपणा येतो ही गोष्ट श्री. कर्नाटकी यांच्या ध्यानांत आलेली दिसत नाहीं. कारण पुस्तककर्त्यांच्या चार

शब्दांत पृष्ठ १० वर डॉ. वेलवलकरांचें म्हणून त्यांनीं खालील वाक्य उध्दृत केलें आहे. "जें वाङ्मय-क्षेत्रांत एकट्या डॉ. भांडारकरांनीं काम केलें तें काम करण्यास भांडारकर इन्स्टिटयूटमध्यें वीस माणसें खपत असतांहि कामाचा उठाव होत नाहीं." आतां या वाक्याचा नीट बोध हेत नाहीं. अर्थदृष्ट्या वाक्य-रचना चुकीची दिसते. डॉ. वेलवलकरांचा आशय हा दिसतो कीं भांडारकरांनीं ग्रंथरचना केली तितकी भांडारकर इन्स्टिटयूटमधील २० माणसांच्यानें होत नाहीं. आधीं ही तुलना सदोष पण आणखी काल-मर्यादा नसल्यामुळें अगदींच अर्थहीन. भांडारकरांनीं ८० वर्षांत जें काम केलें तितकें २० माणसांनीं किती वर्षांत करावयास पाहिजे होतें हें गणीत बेळवलकरांनीं कोठेंच केलेलें दिसत नाहीं. तसेंच डॉ. भांडार-करांची विद्वत्ता प्रस्थापित करण्यास डॉ. गुणे युरोपमधून आल्यावर काय म्हणाले अथवा प्रि. कानिटकर तें ऐकून काय उद्गारले हें देण्याची (पृ. १२४) आवश्यकता नव्हती. पण श्री. कर्नाटकी यांना विद्वत्ता व योग्यता दोन्ही सारखींच वाटावीं याचें आश्चर्य वाटतें. तसेंच प्रो. सिल्हैं लेव्ही डॉ. भांडारकरांना त्यांच्या घरीं भेटावयाला गेले या गोष्टीनें श्री. कर्नाटकी अगदीं भांबावून जाऊन प्रश्न करतात कीं "यावरून काय सिद्ध होतें बरें ?" डॉ. भांडारकर संस्कृतज्ञ होते हें सर्वांसच मान्य आहे. एवढ्याकरतां तें सिद्ध कर-ण्याचा सारखा प्रयत्न करणें अनावश्यकच होय. डॉ. भांडारकरांना पेट्रोग्रॅड येथें भरलेल्या प्राच्यभाषा-विशारदपरिषदेकडून आमंत्रण येणें अगदीं स्वाभाविक होतें व त्या आमंत्रणाचा उल्लेख चरित्रामध्यें करणें हेंहि आवश्यकच होय. या आमंत्रणावरून डॉ. भांडारकर संस्कृत पंडित होते हें वाचकास पटतें. त्याला चरित्रकाराच्या पुष्टीची गरज नव्हती (पृ. १२५ पहा).

प्रस्तुत चरित्रानें डॉ. भांडारकरांची योग्यता कमी होण्याचा संभव आहे अशी आम्हांस मनापासून भीति वाटते. याचें प्रत्यंतर पृ. १३७ वरील मजकूर वाचून पहातां येईल. "महाभारताचा काल" या भांडारकरांच्या निबंधासंबंधानें वरील मजकूर आहे. कर्नल एलिसला उत्तरादाखल हा निबंध डॉ. भांडा-रकरांनीं लिहिला होता. श्री. कर्नाटकी यांची लिहिण्याची तऱ्हा पहा. "असल्या निरुत्तर कोटिक्रमाला कर्नल एलिस साहेब झाले तरी समर्पक असें उत्तर काय देणार ? बरें ते आपली चूक तरी उघडपणें कशी कबूल करणार ? तथापि डॉ. भांडारकरांच्या कोटिक्रमानें आपली खात्री झाली नाहीं असें त्यांनीं प्रत्युत्तर दिलें असावें. कारण त्यावर डॉ. भांडारकरांनीं आपण पूर्वी दिलेल्या सर्व सबळ कारणांचा पुनः उल्लेख करून सणसणीत उत्तर दिलें." श्री. कर्नाटकी यांनीं एलिस साहेबांचा लेख मुळींच वाचला नाहीं तरी सुद्धां "गुरुवर्यांनीं आपल्या सदरील लेखांत असें **सप्रमाण सिद्ध** केलें आहे कीं" वगैरे तऱ्हेची भाषा वाप-रण्यास त्यांच्या मनांत किंतु येत नाहीं. इ. सनाच्या १६ व्या शतकांत महाभारत लिहिलें गेलें असें एलि-सचें म्हणणें. हें खोडून काढण्यास विशेष विद्वत्तेची गरज नाहीं. या निबंधाच्या पायीं ३१ ओळी लिहि-ण्याचेंहि प्रयोजन नव्हतें. आणि दणदणीत भाषा वापरण्याचें तर मुळींच नव्हतें. हाच नमुना पुढेंहि दिसून येतो (पृ. १४८). डॉ. भांडारकर व मॅक्स मुल्लर यांचा शांकरमतविषयक झालेला संवाद कशाकरतां दिला आहे हेंच समजत नाहीं. डॉ. भांडारकरांनीं शांकरमत सांगितलें अथवा त्या मताचें खंडण केलें ? कांहीं असलें तरी हें संभाषण कांहीं इतकें महत्त्वाचें नव्हतें.

डॉ. भांडारकर राजकीय बाबींत लक्ष घालीत नसत असें म्हटल्यानें त्यांच्या मोठेपणाला न्यूनत्व येतें अशी श्री. कर्नाटकी यांची विलक्षण समजूत झालेली दिसते. कारण डॉक्टरसाहेब राजकारणी पुरुष होते असें दाखविण्याचा त्यांनीं अटोकाट प्रयत्न केला आहे. आणि ते राजकारणांत लक्ष घालीत असत हें कशावरून तर दोनदा ते राष्ट्रीय सभेच्या बैठकींस हजर होते ! (पृ. १८६) प्रत्येक मनुष्यानें प्रत्येक गोष्टींत लक्ष घातलेंच पाहिजे असें थोडेंच आहे. गोखले किंवा टिळक सामाजिक सुधारणेच्या कामीं प्रत्यक्ष भाग घेत नसत. धोंडोपंत कर्वे राजकीय बाबींत पडत नाहींत. तरीपण हीं सर्व मोठीं माणसें नाहींत काय ? त्याचप्रमाणें डॉ. भांडारकर सरकारवर कडक टीका करीत. कशावरून तर कर्झन साहे-

बांच्या मुलाखतींत तुम्हीं सत्तेच्या जोरावर वऱ्हाड घेतला असें भांडारकर म्हणाले. बरें हें कशावरून तर भांडारकरच मेजर बसूंजवळ बोलले म्हणून. आणि याच्या जोरावर श्री. कर्नाटकी उद्गारतात "डॉ. भांडारकर यांनीं निर्भीडपणानें निषेध प्रदर्शित केला असेल अशी मात्र आजकाल कोणाची कल्पना देखील होणार नाहीं." **आजकाल** कल्पना न होण्याला कारण काय तें आम्हांला समजत नाहीं. खासगी संभाषणाऐवजीं उघड वर्तमानपत्रांतून भांडारकरांनीं निषेध प्रदर्शित केला असता तर श्री. कर्नाटकी यांनीं कोणतीं विशेषणें योजिलीं असतीं कोणास ठाऊक !

ग्रंथकारांनीं चिकित्सकबुद्धीचा उपयोग उभ्या ग्रंथांत केला नाहीं हें पाहून वाईट वाटतें. पृ. ४१७ वर डॉ. भांडारकरांच्या भोळ्या कारकुनाचे मात्रडे शब्द जशाचे तसे देण्यापूर्वी श्री. कर्नाटकी यांनीं थोडा तरी विचार करावयास पाहिजे होता. "दादासाहेब हे एक साधु पुरुष होते. ते स्वतः दयाशील वृत्तीनें तर वागतच. पण त्यांचा संसर्ग देखील ज्याला ज्याला झाला असेल त्यालाहि पापबुद्धि व्हावयाची नाहीं ! असें त्यांच्या वर्तनाचें तेज असे !" पण याच पानावर डॉ. साहेबांच्या कुळांनीं—ज्यांना डॉक्टरसाहेबांचा संसर्ग झाला त्यांनीं—त्यांना साफ फसविलें असें हेच कारकून आम्हांस सांगतात. आणखी मजा पहा. ज्या शेतकऱ्यांनीं बुडविलें त्यांच्या संबंधानें चरित्रकार सांगतात "फिर्यादी झाल्या, **दरखास्त काढलें, सर्व कांहीं प्रकार झाले**. पण डॉ. भांडारकरांचे पैसे गेले ते गेलेच ! " ( पृ. ४१६ ). पण लगेच पुढें आपण काय वाचतों तें पहा. " लुडबुड करणारे लोक असतातच; त्यांनीं येऊन दादासाहेबांना मारे सांगावें कीं, तो अमा आहे; तो दुसरा तसा आहे; तुम्ही **दरखास्त काढा**; त्याचें घर, त्याचीं भांडींकुंडीं जप्त करा; तुमचे पैसे लागलीच वसूल होतील, वगैरे वगैरे. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं डॉ. भांडारकरांनीं वरीलपैकीं त्या गरीब शेतकरी लोकांना त्रासदायक अशी एकही गोष्ट केली नाहीं इतकेंच नव्हे तर...... यांनीं त्यांना सांगावें कीं, आमचे पैसे बुडूं द्यात ! " अशा भरमसाट लिहिण्यानें सर्व चरित्र येथूनतेथून दूषित झालें आहे.

डॉ. भांडारकर ऋषिपंचमीच्या दिवशीं वारले. "अर्थात् एका आधुनिक महर्षीनीं सप्तर्षींना पवित्र मानलेल्या दिवशींच परलोकगमन करावें हा योगायोग अगदीं अन्वर्थक होता, असें कोणास वाटणार नाहीं बरें ?" (पृ. ४३३) पण मग कोणीहि असें विचारणार कीं भांडारकरांचें श्राद्ध ऋषिपंचमीसच करण्यांत येतें काय ? रा. वैद्यांनीं भांडारकरांच्या मृत्युतिथीवर भाष्य केलें नाहीं तसेंच श्री. कर्नाटकी यांनीं केलें नसतें तर कांहीं बिघडलें नसतें.

श्री. कर्नाटकी यांनीं कार्यकारणभावासंबंधानेंहि बेफिकीरी दाखविली आहे. राज्यक्रांति व गुणिजनांचा लौकिक यांत काय संबंध आहे हें समजणें कठीण आहे. हिंदुस्थानांत पुष्कळ राज्यक्रांत्या झाल्या पण बुद्ध, शंकराचार्य, कालिदास, पाणिनि वगैरेंच्या नांवांचा लोप झाला काय ? मग "या देशांत कितीहि राज्यक्रांत्या झाल्या तरी गुरुवर्यांनीं आपल्या गुणांनीं व कामगिरीनें सरस्वतीमंदिरांत जें उच्चस्थान मिळविलें तें अढळच राहाणार आहे यांत शंका नाहीं " ( पृ. २ ) ह्या म्हणण्यांत स्वारस्य तें काय ?

रामकृष्णपंतांचे वडील मालवण, राजापूर व रत्नागिरी या ठिकाणीं नोकरीच्या निमित्तानें होते त्यांनाहि त्यांची " वरीचशी नोकरी मालवणास झाली होती." असें असल्यामुळें " या प्रमाणें नोकरीवर असतांना त्यांची **ठिकठिकाणीं** बदली झाली" ( पृ. ४ ) हें म्हणणें अतिशयोक्त नव्हे काय ! चरित्रनायकाविषयीं चरित्रकाराच्या ठिकाणीं सहृदयता पाहिजे यांत संशय नाहीं. पण दुसऱ्यांना निष्कारण कमीपणा आणून चरित्रनायकाला मोठा ठरविणें हें गैरशिस्तच म्हटलें पाहिजे. प्रस्तुत चरित्रांत हा प्रकार आधिक्य झालेला दिसतो. पुराणवस्तुसंशोधनाच्या कामीं अग्रमान भाऊदाजींचा आहे. होमर-रामायण वादांत तेलंगांच्या निबंधाचीच आठवण प्रथम झाली पाहिजे. पण श्री. कर्नाटकी यांनीं या उभयतांना

दुय्यमस्थानच दिलें आहे. पण जेथें रामकृष्णपंतांच्या वडिलांचीहि किंमत नाहीं तेथें या दोघांना कोण पुसतो. ! "त्यांचे वडील मामलतदारीच्या हुद्यापर्यंत सरकारी नोकरींत **वाढले होते, इतकेंच काय तें.** अर्थात् रामकृष्णपंतांना ज्ञानलालसा केवळ अंतःस्फूर्तीनें उत्पन्न झालेली होती असें स्पष्ट दिसतें" (पृ. १०). पण याच्या अगोदर चरित्रकारांनीं गोपाळपंतांची त्यांनीं रामकृष्णपंतांना इंग्रजी शाळेंत पाठविल्याबद्दल मोठी तारीफ केली आहे ! (पा. १०). गोपाळपंतांना इंग्रेजी येत नसेल पण त्यांच्या ठिकाणीं ज्ञानलालसा नव्हती हें कशावरून ? का इंग्रजी शिकणें म्हणजेच ज्ञानलालसा ? रामकृष्ण-पंतांच्या अगोदर रत्नागिरी जिल्ह्यांतून जी मंडळी मुंबईस येऊन नवीन शिक्षण घेती झाली त्यांच्यांत ज्ञानलालसा अंतःस्फूर्तीनें उत्पन्न झाली होती कीं नव्हती ? नसल्यास त्यांच्या पूर्वजांत ज्ञानलालसा अस-ल्याचें कोणाला माहीत आहे काय ? लिहिण्यांत कांहींतरी अर्थ असावा लागतो.

पृ. ४५ वर, रत्नागिरीहून मुंबईस येणाऱ्या विद्यार्थ्यांची तुलना सोळाव्या शतकांतील युरोपखंडभर हिंडणाऱ्या ग्रीक व लॅटिन पंडितांबरोबर केली आहे ! एकाचें हिंडणें विद्यार्जनार्थ अथवा पोटाकरतां आणि दुसऱ्याचें ज्ञानप्रसारार्थ. एकाचा प्रवास रत्नागिरी जिल्ह्यांतून मुंबईपर्यंत आणि दुसऱ्याचा सर्व युरोप-खंडभर. म्हणून या दोहोंमध्यें कोणत्याहि तऱ्हेचें साम्य आहे असें आम्हांस वाटत नाहीं. उगीच भलतीच उपमा भलत्याला देण्यानें उद्दिष्टाची हानि मात्र होते. हा द्विरुक्तीचाहि मासला आहे. पृ. १५ व १६ पहा. यानंतर पृ. ६७ पहा. डॉ. भांडारकरांनीं स्पेशल पेनशनासाठीं अर्ज केला. भारतमंत्र्याच्या कचेरींत तेव्हां मुंबईस पूर्वी कार्यकारी कौन्सिलर असलेले एलिससाहेब एक सभासद होते. एलिससाहेब भांडारकरांना ओळखीत होते. अर्थात् त्यांच्या प्रयत्नानें स्पेशल पेनशन मंजूर झालें. यावर श्री. कर्नाटकी यांची मल्लीनाथी : " इतकें गुरुवर्यांचें युरोपीयन लोकांत वजन होतें " ! हें अनुमान तर्कशुद्ध आहे असें कोण म्हणेल ? युरोपियनांत जर भांडारकरांचें वजन होतें तर इंडिया आफिसांत एलिसवाचून बाकीची मंडळी युरोपियन नव्हती काय ? कदाचित् कर्नाटकी यांच्या मनांत मुंबईच्या युरोपियनांत असें म्हणा-वयाचें असेल. बरें डॉ. भांडारकरांनीं आपल्या वजनानें स्पेशल पेनशन मिळविलें अगर आपल्या गुणांच्या योगानें मिळविलें ? शिवाय त्यांचा अर्ज पुढें पाठवतांना मुंबई सरकारनें स्पे. पेनशन देऊं नये असें कां म्हटलें होतें ? तसें असल्यास डॉक्टरसाहेबांचें वजन कोठें गेलें ? मुंबई सरकारची अनुकूल शिफारस असल्यास एलिससाहेबाच्या कामगिरीचें महत्व तें काय व त्यावरून अनुमान तें काय निघणार ? अशा मासल्याचें लिहिणें प्रस्तुत चरित्रांत फारच आहे. एकदां डॉ. भांडारकर युनिव्हर्सिटींतील एका दालनांत आपल्या जुन्या विद्यार्थ्याबरोबर दोन घटका बोलत होते ( पृ. ७७ ). ही मोठी अजब गोष्ट आहे असें श्री. कर्नाटकी आपल्या वाचकांस सांगतात ! बरें हे विद्यार्थी कोण होते याची चौकशी प्रि. पाध्यांजवळ न करतां चरित्रकार अनुमान करतात कीं ते यशवंत वासुदेव आठल्ये असावेत. ( याच्यापुढें उद्गार चिन्हें दोन आहेत. ) या तर्काला कांहीं आधार ? पण तर्कशास्त्राचा पूर्ण अनादर केलेलाच या पुस्तकांत ठिकठिकाणीं दिसतो. याचें प्रत्यंतर म्हणून वाचकांनीं पृष्ठ १८२ वाचावें. डॉ. भांडारकरांच्या ग्रंथाला त्यांच्यापेक्षां कमी योग्यतेच्या साहेबाची प्रस्तावना जोडलेली पाहून केसरीकारांस वाईट वाटून त्यांनीं डॉ. भांडारकरांच्या स्वभावांतली गोम उघडकीस आणली. त्याला प्रत्युत्तर म्हणून एक पान चरित्रकारांनीं खर्ची घातलें आहे. पण त्यानें भांडारकरांच्या कृतीचें समर्थन कसें होतें तें समजणें कठीण आहे. पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्याची एक प्रत कंपनीकडून डॉक्टरसाहेबांस मिळाली असलीच पाहिजे. प्रत मिळाल्यावर ती त्यांनीं नजरेखालून घातली असलीच पाहिजे. तेव्हां त्यांनीं रॉलिन्सन साहेबांची प्रस्तावना न पहाणें शक्य नाहीं. म्हणून त्याच वेळीं त्यांनीं कंपनीस विचारावयास पाहिजे होतें. तें त्यांनीं केलें नाहीं. उलट रा. कोल्हटकरांनीं गोष्ट काढीपर्यंत या प्रस्तावनेची हकीकत रामकृष्णपंतांस माहीतच नव्हती असें श्री. कर्नाटकी भासवितात. पण हा सर्व भोळसरपणा दिसतो.

श्री. कर्नाटकी यांच्या भोळसरपणाचा आणखी एक मजेदार मासला पृ. ७९ वर पहावयास सांपडतो. भांडारकर–पाध्ये भेटीचें वर्णन. प्रि. पाध्ये मोटारीनें लोणावळ्याहून पुण्यास येतांना वाटेंत ब्रंडगार्डनवर मुलें घेऊन उतरले. तेथें डॉ. भांडारकर हवा खाण्यास बसले होते. " इतक्यांत पाध्ये यांना जरा लांब पलीकडच्या बांकावर बसलेली डॉ. भांडारकरांची–ऋषितुल्यमूर्ति–स्वारी दिसली! त्याबरोबर पाध्ये **झटपट** गुरुवर्यांच्या जवळ गेले व त्यांनीं त्यांना **वांकून** नमस्कार केला. नेहमींप्रमाणें आशीर्वाद दिल्यावर गुरुवर्यांनीं " का पाध्ये, ती तुमची मंडळी ( मंडळी शब्द वापरला आहे त्या अर्थी त्यांत पत्नीचा समावेश करण्याचा उद्देश दिसतोच ) का ?" असा प्रश्न केला. त्याबरोबर पाध्ये यांनीं " होय " असें म्हणून आपल्या **मंडळीस** खुणेनें बोलाविलें. लागलीच मुलांनीं **लगबगीनें धांवत धांवत** येऊन पाध्ये यांनीं **सूचना करण्यापूर्वीच** गुरुवर्यांना **साष्टांग** नमस्कार केलें! डॉक्टर साहेबांना अर्थात्‌च सर्व मंडळींना पाहून आनंद झाला व त्यांनीं सर्व मुलांना **प्रत्येकी निरनिराळ्या रीतींनें,** आशीर्वाद दिले. इतकेंच नव्हे तर, सर्वांत लहान मुलें होतीं त्यांना जवळ बोलावून गुरुवर्यांनीं त्यांस **आलिंगन**देखील दिलें!" यांतील स्थूलाक्षरसूचित प्रत्येक शब्द नाटकी थाटाचा दिसतो. वस्तुस्थितीचा दर्शक दिसत नाहीं. याच्यावर अधिक लिहिण्याचें प्रयोजनच नाहीं. पण निरनिराळ्या रीतींनें दिलेले आशीर्वाद श्री. कर्नाटकी यांनीं नमूद केले असते तर इतरांना त्यांचा उपयोग करतां आला असता.

कोणत्या गोष्टीला किती महत्त्व द्यावयाचें या विषयींचें प्रमाण श्री. कर्नाटकी यांनीं मुळींच पाळलें नाहीं. जातां जातां ज्या गोष्टी सांगावयाच्या त्या प्रामुख्यानें सांगितल्या गेल्या आहेत. पृ. ४१८।१९ पहा. डॉ. भांडारकरांनीं खोटें बोलून शेतकऱ्यांच्या जमिनी लुबाडल्या नाहींत ही गोष्ट त्यांच्या वर्तनाला अनुरूप झाली यांत शंका नाहीं. आणि म्हणून त्यांत कांहीं विशेष नाहीं. भांडारकर जर असत्य भाषण करते तर त्यांचें चरित्र लिहिण्यास पुढें कोण आला असता? डॉ. भांडारकरांनीं खोटें न बोलणें हें असामान्य आहे असें का श्री. कर्नाटकी यांस वाटतें? मोठा मनुष्य यःकश्चित् माणसाप्रमाणें खोटें बोलेल तर त्याला मोठा कोण म्हणेल? तात्पर्य, आमच्या समजुतीप्रमाणें प्रस्तुत पुस्तक डॉ. भांडारकरांचें वास्तविक चरित्र प्रकट करीत नाहीं.

या पुस्तकांत द्विरुक्ति कंटाळवाणी वाटते इतकी आहे. द्विरुक्त वाक्यें काढलीं तर एक चतुर्थांश ग्रंथ कमी होईल. उद्गारचिन्हांची तर रेलचेलच आहे. वाटेल तेथें उद्गारचिन्हें वापरल्यानें विपरीत अर्थ होऊं पहातो. चरित्रकारांनीं आपली स्वतःचीं मतेंच निबंधवजा प्रकट केलीं आहेत तीं करावयास नको होतीं. जेथें डॉ. भांडारकरांसंबंधानें अधिक माहिती देतां आली असती तेथें ती न देतां संदिग्धता स्वीकारण्यांत आली आहे. उ. रत्नागिरी शाळेंतील इंग्रजी शिक्षण मंडलिकांचें दोन वर्षांतच पुरें झालें (मं. च. पृ. १९). मग रामकृष्णपंतांना पांच वर्षे कां लागावीं? अभ्यासक्रमांत फेरबदल झाला होता काय? मंडलिकांनीं ही शाळा १८४७ सालीं सोडली आणि भांडारकर त्याच वर्षी या शाळेंत गेले.

श्री. कर्नाटकी यांस मराठी राज्याचा इतिहास किती अवगत आहे हें आम्हांस माहीत नाहीं. पण "नाना फडणवीस यांस आपल्या महत्त्वापुढें दुसऱ्या कशाचें महत्त्वच वाटत नसे!!" अशा प्रकारचें विधान करण्याच्या भानगडींत चरित्रकार न पडते तर बरें होतें. पण श्री. कर्नाटकी यांची रीतच अशी दिसते कीं आपणांस पाहिजे असेल तें कोठूनतरी कसेंतरी उचलून पुस्तकांत घालावयाचें आणि त्याच्यावर आपल्या तर्कांचा डोल्हारा उभारावयाचा.

पीटर्सनसाहेबाची नेमणूक भांडारकरांच्या हक्कांकडे दुर्लक्ष्य करून सरकारनें केली याबद्दल कोणीहि सरकारास दोष देईल. तसेंच डॉ. भांडारकरांनीं या अपमानामुळें क्रुद्ध होऊन राजीनामा दिला नाहीं याकडेहि लोक कानाडोळा करतील. पण ती गोष्ट प्रामुख्यानें सांगून तिचें समर्थन करणें (पृ. ६२)

अनावश्यक होतें. "समंजसपणानें ते (असे प्रकार) सहन केलेच पाहिजेत याशिवाय गत्यंतरच नाहीं" असें समर्थन कोणास पटेल तें पटो. आम्हांला तर तें खास पटत नाहीं. बाबू केशवचंद्र सेन यांनीं नोकरीवर लाथ मारली नाहीं काय? पण डॉ. भांडारकर करतील ती प्रत्येक गोष्ट चांगली हीच जेथें समजूत तेथें भारदस्त चरित्र निपजणें शक्यच नाहीं. रानडे, गोखले, मेथा यांच्याशीं कित्येक बाबतींत भांडारकरांचें जमलें नाहीं हें सुप्रसिद्धच आहे. पण त्याची मीमांसा चरित्रकारांनीं करण्याचेंच टाळलें आहे. आमच्या मतें भांडारकरांच्या अंगचे खरे गुण पुढें ठेवून चरित्र लिहावयास पाहिजे होतें. नसते गुण त्यांना डकविण्याचा प्रयत्न करण्यांत आल्यानें या पुस्तकानें भांडारकरांविषयीं भलताच ग्रह मात्र निर्माण होण्याचा संभव दिसतो. भांडारकर गणिती होते, संगीतज्ञ होते, संस्कृतज्ञ बनले, आकस्मिक रीतीनें पुराणवस्तुसंशोधक झाले, मुलकी अधिकारी व्हावयाचे तें उत्कृष्ट अध्यापक झाले इत्यादि गोष्टींवरून त्यांची चतुरस्रता दिसून येते. डॉ. भांडारकर आदरणीय पुरुष होऊन गेले याविषयीं कोणी शंका घेणार नाहीं. पण त्यांचें चरित्र त्यांचे विद्वान पुत्र, पौत्र तसेच बंधू असून त्यांनीं कां लिहूं नये हें आम्हांस समजत नाहीं. त्यांना हें चरित्र पसंत पडेल असें आम्हांस वाटत नाहीं. कोणत्याहि विचारी माणसाला असेंच वाटेल असा आमचा भरंवसा आहे. म्हणून रँ. परांजपे यांची इच्छा कीं "रा. कर्नाटकींनीं जे परिश्रम घेतले आहेत त्यांचें महाराष्ट्रीय वाचक वर्ण (वर्ग ?) पूर्ण चीज करो" ती सफल होणार नाहीं अशी भीति वाटते.

---

## अभिप्राय

**माझीं फुलें** (गुच्छ पहिला):– (कवि **श्री. वा. गाडगीळ**, मुद्रक–आर्यभूषण छापखाना पुणें, प्रकाशक–महाराष्ट्रवाङ्मयमंडळ, हैद्राबाद दक्षिण, किंमत दहा आणे)

दक्षिण–हैद्राबादसारख्या तेलगु भाषा बोलली जाणाऱ्या आणि मुसलमानी अंमलाखालील शहरांत मराठी भाषेच्या अभिमान्यांनीं महाराष्ट्रवाङ्मयमंडळ स्थापन करून प्रस्तुत पुस्तक प्रकाशित केलें आहे हें त्यांस भूषणावह आहे. कवि या नात्यानें श्री. गाडगीळ वाचकांस परिचित आहेतच. प्रस्तुत पुस्तकांत विविध विषयांवरील ५१ कविता असून त्यांची रचना जुन्या वृत्तांत व नवीन चालींत केलेली आढळते. प्रेमापासून परमार्थापर्यंत सर्व विषयांवर कवीनें आपले विचार प्रगट केले आहेत. कवीची भाषा सरळ व रसाळ आहे परंतु कवीच्या अंगीं कल्पनाशक्तीचा अभाव दिसून येतो. 'निराशेंतील आशा' या कवितेंत 'ते भले भले वायूचे। गड सारे वितळुनि गेले' हें ध्रुवपद आढळतें. यांतील शब्दरचना क्लिष्ट असून कल्पनाहि 'हटातटादाकृष्ट' वाटते. 'प्रभुपदीं' सारख्या कविता वाचून कवीनें इतर कवींचें अनुकरण करण्याचा प्रयत्न केला आहेसें वाटतें. कांहीं ठिकाणीं त्रिकालाबाधित सत्यें आढळतात व तीं साध्या भाषेंत असल्यामुळें चटकन् ध्यानांत येतात. श्री. गाडगीळ यांच्या हातून चांगली वाङ्मयसेवा घडेल अशी हें पुस्तक वाचून आशा वाटते. पुस्तकाची छपाई व बाह्यांग उत्कृष्ट आहे.

ग. त्र्यं. देसाई-कोल्हटकर.

# प्रार्थनासमाजाचा इतिहास.

## (अभिप्राय)

(लेखकः—**ना. गो. चापेकर.**)

प्रार्थनासमाजाचा इतिहास रा. द्वा. गो. वैद्य यांनीं लिहिला आहे. रा. वैद्य हे समाजाचे उत्साही सभासद असून सुबोधपत्रिकेचे संपादक आहेत. सुबोधपत्रिका हें प्रार्थनासमाजाचेंच वर्तमानपत्र आहे. या ३६२ पृष्ठांच्या पुस्तकाची किंमत अवघी अडीच रुपये आहे. मतप्रसाराच्या कामीं हें युक्तच आहे.

प्रार्थनासमाजाच्या स्थापनेची आवश्यकता कोणास पटणार नाही. तथापि सन १८६७ सालीं स्थापन झालेला व आज साठ वर्षे अस्तित्वांत असलेला तसेंच इंग्रजी शिक्षणाच्या सुरवातीनंतर त्या शिक्षणाचा आस्वाद ज्यांना प्रथम मिळाला अशा विद्वान व देशहितेच्छु मंडळींपैकीं बहुतेकांचें अंग ज्यांत प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष रीतीनें तसेंच प्रामुख्यानें किंवा गौणत्वानें होतें अशा या समाजाचा इतिहास कोणींतरी लिहिणें अवश्य होतें. "समाजा" बाहेरील समाजाला या "समाजाची" उपेक्षा करणें शक्यच नव्हतें. म्हणून रा. वैद्य यांचें हा इतिहास लिहिल्याबद्दल आम्हीं मनःपूर्वक अभिनंदन करतों. रा. वैद्य यांची भाषा शुद्ध व स्वच्छ आहे. त्यांच्या ठिकाणीं समतोलपणा आहे. बिनचूक माहिती जमविण्याची त्यांची कळकळ प्रशंसनीय आहे. प्रार्थनासमाजाविषयीं त्यांच्या अंतःकरणांत अभिमान वसत आहे. यामुळें त्यांच्याहातून हा इतिहास निर्दोष वठला आहे. पुस्तकाची छपाई व बांधणीहि आंतील मजकुराला शोभेल अशीच आहे. हा इतिहास लिहिण्यांत रा. वैद्य यांनीं फार परिश्रम केले आहेत याचा प्रत्यय वाचणाराला पानोपानीं येतो. हें वेठीचें तट्टू नाहीं अशी त्याची तेव्हांच खात्री होते.

चालू पिढीला ऐकूनहि माहीत नसतील अशा पुष्कळ स्मरणीय माणसांचा परिचय रा. वैद्यांनीं या पुस्तकाच्या द्वारें करून दिला आहे. या पुस्तकाच्या अभावीं कित्येक थोर, धर्मनिष्ठ गृहस्थांचें नांव त्यांच्या शरीराबरोबरच कायमचें नष्ट झालें असतें. आमच्या मतें रा. वैद्यांनीं ही फारच मोठी कामगिरी केली आहे. आमच्याकडे प्रथम धार्मिक सुधारणा, नंतर सामाजिक सुधारणा आणि अखेरीस राजकीय सुधारणा अशा सुधारणेच्या लाटा उसळल्या. धार्मिक सुधारणेचें क्षेत्र मुंबई तर सामाजिक सुधारणेचा रोप पुण्यांतच फोफावला. सुधारणांचा वर सांगितलेला क्रम अगदीं स्वाभाविक होता. इंग्रजी शिक्षण व मिशनऱ्यांचीं खिस्ती धर्मावरील व्याख्यानें यांच्या जोडगोळीनें नवीन सुशिक्षितांचीं मनें डळमळूं लागलीं. त्यांच्या चिकित्सक बुद्धीचें समाधान करण्याचें सामर्थ्य त्यांच्या श्रद्धाळू वडिलांत नव्हतें. इकडे खिस्ती धर्मोपदेशक हिंदुधर्माची निंदा करीत तिनें तर त्यांचे कान किटले असले पाहिजेत. हिंदुधर्माचें वास्तविक स्वरूप आजहि शिक्षिताशिक्षितांना अज्ञातच आहे. मग त्या वेळीं त्या नवशिक्षितांमध्यें तत्संबंधीं अज्ञान वसत असणें स्वाभाविकच होतें. अर्थात् ही मंडळी गांगरून गेली असल्यास आश्चर्य नाहीं. त्यांचीं अंतःकरणें निःसंशय धर्मोत्कट होतीं. ही सर्व मंडळी खिस्ती झाली नाहीं हाच चमत्कार. त्या बाबतींत त्यांच्या धर्मपत्नीनींच त्यांना बचावलें असावें. अशा स्थितींत प्रार्थनासमाजासारख्या संस्थेची कल्पना निघणें अपरिहार्य होतें. हिंदुधर्माचें गौडबंगाल त्यांना उफलेना. मूर्तिपूजेवर पाद्र्यांचे हल्ले. मूर्तिपूजेचें तेव्हांचें विकृत स्वरूप. पाद्र्यांनीं आम्हांला Idol-worshippers म्हणावें आणि आम्हांला तेंच खरें वाटावें. आयडलचें भाषांतर मराठींत मूर्ति केलें गेलें. आणि तें बरोबरच होतें. पण मूर्तिपूजा हा शब्द आमच्यांत कधीं रूढ होता काय याचा विचार कोणी केला नाहीं. मूर्ति हा शब्द असून मूर्तिपूजा मात्र शब्द नव्हता

हें विचार करण्यासारखें होतें. आम्ही मूर्तिपूजा करीत नाहीं. देवपूजा करतों. देवपूजेवर काय आक्षेप घ्यावयाचे असतील ते घ्या पण जी मूर्तिपूजा आम्ही करीत नाहीं तिच्या संबंधानें टीका करणें अप्रस्तुत होय. असो. अशा या संमूढ बनलेल्या विद्वानांनीं विश्वोत्पत्तिरूपी क्रिया करणाऱ्या देवाला निरवयव व निराकार ठरवून प्रार्थनेच्या योगानें त्याला आपलासा करून घेण्याचें निश्चित केलें. मूर्ति नको म्हणून देव निरवयव व निराकार. बरें निरवयवाच्या हातून कर्म कसें झालें इत्यादि बिकट प्रश्न कोणीं केल्यास हें गूढ मनुष्याच्या कक्षेंत येण्यासारखें नाहीं असें म्हणून या मंडळींनें आपलें समाधान करून घेतलें. हिंदुधर्माचें ज्ञान नसल्यामुळें ब्राह्म, प्रार्थना, एकेश्वरी इत्यादि समाज या देशांत इंग्रजी शिक्षणानें उद्भूत होणें साहजीक होतें. प्रार्थनासमाजाच्या मंडळीनें सामाजिक सुधारणेकडे दुर्लक्ष केलें असें नाहीं. पण ती धार्मिक सुधारणेच्या आनुषंगिक होती. नवीन पंथ काढणारांमध्यें जे नैतिक गुण लागतात ते बऱ्याच अंशानें समाजीयांमध्यें होते. त्यांची धर्मनिष्ठा जशी तशींच नीतिमत्ता थोर होती हें रा. नवरंगे वगैरेंच्या उदाहरणांवरून स्पष्ट होतें. इंग्रजी शिक्षण प्रथम मुंबईस सुरू झालें म्हणून मुंबईसच धर्मसुधारणेची चळवळ प्रथम सुरू झाली. मुंबईच्यापूर्वीं बंगालमध्यें इंग्रजी शिक्षणाचा लाभ लोकांना मिळाला. म्हणून तिकडे ब्राह्मसमाज अस्तित्वांत आला. या समाजाचें स्वरूप उग्र होतें. त्यांनीं हिंदुत्व झुगारलें. ही चूक येथील समाजियांनीं केली नाहीं. अशा रीतीनें ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाच्या व उपयुक्त संस्थेचा इतिहास आजपर्यंत कोणीं लिहिला नाहीं हेंच आश्चर्य होय. रा. वैद्य यांनीं " समाजानें " चालविलेल्या दुसऱ्या उपयुक्त संस्थांचाहि साग्र इतिहास दिला आहे तो सर्व वाचनीय आहे यांत शंका नाहीं. सर्व दिवंगत समाजियांचीं चरित्रें दिल्यामुळें तर हा ग्रंथ बहुमोल झाला आहे. समाजानें आजपर्यंत जें जें केलें त्यांची इत्थंभूत हकीकत देऊन ग्रंथाला पूर्णत्व आणलें आहे. तात्पर्य जें जें कांहीं करावयास पाहिजे होतें तें सर्व रा. वैद्य ह्यांनीं आस्थापूर्वक केलें आहे. ग्रंथांत अशुद्धें फारच थोडीं आहेत यावरून या ग्रंथसंपादनाच्या कामीं ग्रंथकर्त्यांनीं किती झटून काम केलें आहे तें दिसून येतें. मराठींत अशा प्रकारचे ग्रंथ निपजूं लागले ही फार आनंदाची गोष्ट आहे. पण अशा कृतींचें चीज करण्याइतकी सद्वासना मराठी बोलणारांमध्यें उत्पन्न होईल तो सुदीन खरा.

---

# नियतकालिक वाङ्मय

(ले. माधव दामोदर अळतेकर)

मराठींत अगदीं सुरवातीला मासिक पुस्तकें सुरू झालीं व वर्तमानपत्रें त्यानंतर सुरू झालीं ही गोष्ट प्रसिद्ध आहे. वर्तमानपत्रांना देखील म्हणण्यासारखें स्वरूप १८८१ सालीं केसरी वर्तमानपत्र सुरू झाल्यानंतर आलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. नियतकालिकांत येणारा पुष्कळसा मजकूर क्षणिक स्वरूपाचा असतो. ही गोष्ट विशेषेंकरून वर्तमानपत्रांना लागू आहे. मासिक किंवा त्रैमासिक पुस्तकांत त्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें कमीजास्ती टिकाऊपणा असलेला मजकूर येतो व कधीं कधीं त्यांत येणारे लेख वाङ्मय या सदरांत जाण्यास योग्य असतात. वर्तमानपत्रांतहि अशा तऱ्हेचे लेख कधीं कधीं येत नाहींत असें नाहीं. लेखाची किंमत प्रतिपादनाचा विषय आणि लेखक यांवर अवलंबून असते. केसरी व सुधारक या पत्रांतून अनुक्रमें चिपळूणकर, आगरकर, टिळक, गोखले आणि केळकर यांच्या लेखणींतून उतरलेले उत्कृष्ट लेख आलेले आहेत त्यांतील विषयप्रतिपादन तात्कालिक स्वरूपाचें नसल्यामुळें व त्यांच्या भाषाशैलीमुळेंहि त्यांची गणना टिकाऊ वाङ्मयांत झाली पाहिजे. तेव्हां नियतकालिक वाङ्मयांतील कांहीं भाग टिकाऊ स्वरूपाचा असतो. वर लिहिल्याप्रमाणें मासिकें, त्रैमासिकें यांतील बरेच लेख टिकाऊ स्वरूपाचे असावयास पाहिजेत. मराठींतील मासिक पुस्तकांतून असे लेख युरोपीयन मासिकांप्रमाणें असतात का नाहीं हा प्रश्न जरी वादग्रस्त असला व फ्रेंच व इंग्रजी मासिकांच्या तोडीचीं मासिकें आपल्याकडे जरी नसलीं तरी जीं कांहीं मासिकें आपल्या मराठी भाषेंत होऊन गेलीं व जीं थोडीं अस्तित्वांत आहेत त्यांतील लेख चाळल्यास त्यांपैकीं कांहीं थोडे मुद्दां टिकाऊ स्वरूपाचे सांपडणार नाहींत असें म्हणण्याचें धारिष्ट कोणी करील असें वाटत नाहीं. तर नियतकालिकांतील सर्व लेखांची माहिती देणारें साधन असल्यास तें फार उपयुक्त होणारें आहे. असें साधन निदान मराठींतील मासिकें व त्रैमासिकें यांच्या बाबतींत तयार करून या कार्यास सुरवात झाल्यास फार उत्तम होईल. मराठींत प्रसिद्ध झालेल्या मासिकांतील लेखांची जंत्री ( म्हणजे विषय व लेखक यांचीं नांवें व लेखांतील प्रमेयांची अतिसंक्षिप्त माहिती ) तयार झाली तर आधुनिक काळांत मराठींतील कोणकोणत्या लेखकांनीं कोणकोणत्या विषयांवर लेख लिहिले आहेत हें कळण्याला मार्ग होईल. त्यामुळें मराठी भाषेंतील लेखकांची माहितीहि अधिक होईल व उपर्युक्त लेखांतील विशेष चांगले लेख असतील ते अधिक टिकाऊ स्वरूपांत ठेवतां येणें शक्य होईल असें वाटतें.

कधीं कधीं अशी माहिती मराठी ग्रंथासंबंधींहि असावी अशी आवश्यकता भासते. उदाहरणार्थ, परभाषेंतील कित्येक ग्रंथांचीं भाषांतरें मराठींत झालेलीं आहेत. त्यांतील कांहीं सर्व प्रकारें फार उत्कृष्ट साधलीं आहेत. तीं मागें पडून त्यांच्या जागीं त्याहून कनिष्ठ प्रतींचीं पुस्तकें यावींत ही गोष्ट इष्ट नाहीं. Sandford and Merton या पुस्तकाचें "हरि आणि त्रिंबक" हें उत्कृष्ट भाषांतर पुष्कळांनीं वाचलें असेल. हें आतां विकत मिळत नाहीं. पण याच मूळ ग्रंथाचें अलीकडे झालेलें एक भाषांतर शाळाखात्यानें मंजूर केलेलें असून तें मिळतें. हें नवीन भाषांतर किंवा रूपांतर "हरि आणि त्रिंबक" पेक्षां सरस उतरलें असतें तर त्याचा प्रचार व्हावा हें रास्त होतें. वास्तविक त्यांत जुन्या भाषांतरांतील रस एक दशांशानेंहि उतरलेला नाहीं. पण जुना ग्रंथ कोणी छापून काढीत नसल्यामुळें व नव्या ग्रंथावर शाळाखात्याची कृपादृष्टि असल्यामुळें आज लहान मुलांच्या हातीं सुंदर मराठींत लिहिलेल्या " हरि आणि त्रिंबक " या

अनुक्रमणिका

पुस्तकाचे ऐवजीं कसल्यातरी अर्धवट भाषेंत लिहिलेलें चोपडें पडतें ही गोष्ट मराठी भाषेच्या उन्नतीच्या दृष्टीनें फार अनिष्ट होय. हा प्रकार जर ग्रंथांविषयीं तर मासिकांतील लेखांसंबंधीं केवढी काळजी घेणें आवश्यक आहे हें लक्ष्यांत येईल. आज निरनिराळ्या नवीन विषयांवर लेख लिहितांना परिभाषेची अडचण पडते. ही अडचण एका गलेलठ्ठ इंग्रजी-मराठी कोशानें मिटत नाहीं. या कोशाचा उपयोग करण्याचा ज्यांनीं प्रयत्न केला आहे त्यांना त्यांतील काम कसें वेठीनें झालें आहे हें माहीत आहे. पण अशा कांहीं विषयावर मराठींतील मासिकांत गेल्या पन्नास पाऊणशें वर्षांत लेख आलेले आहेत. विविधज्ञानविस्तारांत रावबहादूर विष्णु मोरेश्वर महाजनी यांचा एक अर्थशास्त्रात्मक निबंध पुष्कळ वर्षांपूर्वी येऊन गेला त्यांत कांहीं महत्त्वाच्या शास्त्रीय शब्दांना मराठींत प्रतिशब्द देण्याचा प्रयत्न केला होता. तेव्हां अशा तऱ्हेचे लेख वाचून मराठींत नवीन शब्द कोणते आले आहेत यांचा अभ्यास करणें हें महत्त्वाचें काम आहे व तें केल्यानें मराठी भाषेच्या विस्ताराला फार साहाय्य होणारें आहे. परंतु हें काम हातीं घेण्याची बुद्धि होण्याला तरी या लेखांसंबंधीं कांहीं माहिती उपलब्ध झाली पाहिजे व त्यासाठीं मासिकांतील लेखांची जंत्री तयार करण्याचें काम कोणींतरी हातीं घेतलें पाहिजे. इंग्रजी भाषेंत प्रसिद्ध झालेल्या मासिकांतील लेखांची अशी जंत्री करण्याचें काम अव्याहत चाललेलें आहे व ती जंत्री मला बडोद्याच्या सेंट्रल लायब्ररींत पाहण्याचा योग आला होता.

जीं मासिकें पूर्वी अस्तित्वांत होतीं व पुढें बंद झालीं त्यांच्यासंबंधीं वरील प्रकारची व्यवस्था करण्याचें कार्य महाराष्ट्र-साहित्य-परिषदेसारख्या जबाबदार संस्थेनें हातीं घेतलें पाहिजे. अलीकडे पंधरावीस वर्षांत मासिक पुस्तकांचा मराठी प्रदेशांत एकंदरींत ऱ्हास होत चालला आहे ही मोठ्या दुःखाची गोष्ट आहे. पुष्कळ दिवसपर्यंत नेट धरून चाललेलें व महत्वाच्या विषयांवर लेख प्रसिद्ध करणारें मासिक विविधज्ञानविस्तार हें होय. सुदैवानें या मासिकाचें चालकत्व तरुण व उत्साही मंडळीकडे आहे. त्यांनीं विविधज्ञानविस्तारांत सुरवातीपासून प्रसिद्ध झालेल्या लेखांची विषयवार जंत्री प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घ्यावें. त्यांना तें दुसऱ्या कोणाहि पेक्षां अधिक चांगल्या प्रकारें करतां येईल. ऐतिहासिक, वाङ्मयात्मक, शास्त्रीय वगैरे विषयांचे भाग करून विषयांच्या किंवा लेखकांच्या वर्णानुक्रमानुसार जंत्री करण्याचें काम जसें विविधज्ञानविस्ताराच्या चालकांनीं हातीं घ्यावें त्याचप्रमाणें नवीन निघालेल्या रत्नाकरासारख्या मासिकांनीं त्याची एव्हांपासून सुरवात करावी. दरवर्षी प्रसिद्ध करावयाच्या विषयानुक्रमणीचें स्वरूप थोडेसें विस्तृत करण्याची तसदी घेतल्यास हें काम सहज होण्यासारखें आहे. जितकीं म्हणून मासिक पुस्तकें निघतात त्यांतील निव्वळ लघु किंवा विस्तृत गोष्टी सोडून व कविता सोडून इतर विषयांची जंत्री याप्रमाणें करावी. हें सर्व काम होण्याला बराच काळ लागेल व त्याला पुष्कळ जाणत्या माणसांचें साहाय्य घ्यावें लागेल. तें साहाय्य त्यांना कामाचा थोडाबहुत मुशाहिरा देण्याची व्यवस्था करून मागणें कार्यसिद्धीला अधिक हितावह होईल. मराठी भाषेच्या विस्तारकार्यांत लेखकाला मोबदला हातीं होईतों न मिळावा अशा तऱ्हेचें जें वातावरण आजकाल अनुभवास येतें तें बदललें तरच अशा प्रकारच्या गोष्टी घडून येतील. विशिष्ट व्यक्तींच्या बाबतींत त्यांचे निवडक लेख प्रसिद्ध करण्याची व्यवस्था झाली आहे व ती ठीक आहे. पण टिळक किंवा आगरकर किंवा महाजनी किंवा हरिभाऊ आपटे यांच्यासारख्यांनीं लिहून निरनिराळ्या ठिकाणीं प्रसिद्ध झालेल्या सर्व लेखांच्या नांवांचें टांचण व त्यांतील विषयांची थोडक्यांत कल्पना येण्यासारखा सारांश हीं मराठी वाचकांना मिळणें महत्त्वाचें आहे. विविधज्ञानविस्ताराप्रमाणेंच हयात असलेल्या सर्व नियतकालिकांनीं त्यांत प्रसिद्ध झालेल्या लेखांची जंत्री तयार करण्याचें मनावर घेतल्यास हें कार्य चांगल्याप्रकारें सुरू होईल. अशा जंत्र्यांमुळें आधुनिक मराठी वाङ्मयाचा व भाषेचा इतिहास तयार करण्यालाहि पुष्कळ साहाय्य होईल.

आज चालू असलेल्या नियतकालिकांची गोष्ट सोडली तर मराठींत मासिकें आणि वर्तमानपत्रें सुरू झाल्यापासून त्यांत आलेल्या लेखांची जंत्री तयार करण्याचें काम बरेंच कष्टाचें आहे व त्याला

(१०) चित्त नाहीं थारी, बावन्न तीर्थें करी.
(११) स्वस्ताचा माल, हगवर्णाला काळ.
(१२) कौतुकाचें धिरडें, खाऊं कशाशीं कोरडें ?
(१३) नाल्याला नाहीं पारा, वसायला नाहीं थारा.
(१४) सगळा गांव मामाचा, एक नाहीं कामाचा.
(१५) रोडक्याचें चित्त मडक्यांत.
(१६) कोणाला कशाचें, वलुल्याला पशाचें.
(१७) घरासारखा गूण, सासू तशी सून.
(१८) माकड गेलें लुटी, आणल्या दोन मुठी.
(१९) कांग बाई रोड, गांवाची ओढ.
(२०) नाकांत नाहीं काटा, रिकामा ताठा.
(२१) बारा गांव सासरं, आधींच भेकाड वासलं.
(२२) तुझ्याशिवाय गमेना, तुझें माझें पटेना.
(२३) पुरुषांच्या कष्टाचें खावें, पण दृष्टीचें खाऊं नये.
(२४) वाणी देईल काय आणि प्राणी खाईल काय ?
(२५) कामाची कसू, साऱ्या गांवाची सासू.
(२६) सणांत सण, नवलाइला खण.
(२७) भुकेल्याचा भात शिजत नाहीं, विजवराची बायको वाट पाही.
(२८) दिवसभर चरते, मंगळवार करते.
(२९) लोकांचें शिकलें, वडगांव विकलें.
(३०) दिवस गेला हिटीमिटी, चांदिण्यांनीं कापूस निटी.
(३१) नमस्कार फुकाचा, आशीर्वाद लाखाचा.
(३२) गोड तोंड, सोनाराची जोड.
(३३) बोल ग वाचे, तुझें काय वेचे
(३४) शेंडी झाडली, माकरी मोडली.
(३५) शृंगार केला तातडी, निघाली अंगाची कातडी.
(३६) जिकडे गेली वांझ, तिकडे झाली सांज.
(३७) मूल नाहीं तोंवर खाऊन घ्यावें, सून नाहीं तोंवर लेवून घ्यावें.
(३८) लाडं लाडं झालं वेडं
(३९) जिथें मिळाला थारा, तोच गांव बरा.
(४०) सहज पडे, दंडवत घडे.
(४१) दुबळ्याला यात्रें किती, फाटक्याला शिवावें किती ?
(४२) चावल्याशिवाय गिळत नाहीं, अनुभवाशिवाय कळत नाहीं.
(४३) कारे भाता थोडा, तर कोंड्यांनीं घातला वेढा.
(४४) कधीं न घडे, अवसेपौर्णिमेला घडे.
(४५) शेत गेलें कटाळ्यानें, घर गेलें इटाळानें.

नीळकंठ शंकर नवरे.

# "ज्याचें नांव तें"

'रत्नाकर' मासिकाच्या एप्रिलच्या अंकांत कोणी 'जिज्ञासु' श्रीयुतांनीं **'एकपानी शंका'** या मथळ्याखालीं मराठी भाषेंतील सर्वत्र तोंडीं असलेल्या वरील ह्मणीचा अर्थ सांगण्याविषयीं महाराष्ट्रभाषाभिज्ञांस कांहीसें अवधीरणापूर्वक आव्हान केलें असल्यामुळें यथामति उत्तर देणें प्राप्त झालें आहे.

या कामीं श्रीयुतांनीं शंकाप्रदर्शनार्थ जे स्वरचित प्रयोग उदाहृत केले आहेत तेच तपासून पाहूं (१) 'अप्पा, मला साईनीं एक पुस्तक दिलें आहे, तें असें आहे कीं **ज्याचें नांव तें** (२) **आमची** म्हणाली शारदाबाईचा शालू पाहिला का? त्याचे पोत काय नामी आहे म्हणून सांगूं कीं "**ज्याचें नांव तें**" (३) काय हो बाबूराव? काल टी पार्टीला कां आलां नाहीं? काय मजा आली म्हणतां "**ज्याचें नांव तें**" (४) दादंभटजी म्हणाले भय्या आला --- सोंवळयांत होतों, नाहींतर अशी भडकावून दिली असती कीं "**ज्याचें नांव तें**" --- या चारहि उदाहरणांत "**ज्याचें नांव तें**" या संहित विशेषणाचा अर्थ एकच आहे. तो अर्थ म्हणजे = नामांकित, प्रख्यात, उत्कृष्ट, सर्वोत्तम, श्रेष्ठ, फर्स्टक्लास, (१) साईनीं मला पुस्तक दिलें तें नामांकित, किंवा सर्वोत्कृष्ट आहे. (२) शारदाबाईचे शालूचे पोत केवळ फर्स्टक्लास आहे. हाच अर्थ विशद करण्यासाठीं थोडया फेरानें [illegible] वापरतात तिकडे पाहूं. समजा, आमचीनें तो शारदाबाईचा शालू प्रत्यक्ष आम्हांपुढें मांडून [illegible] म्हटलें कीं पाहिला हा शालू. याला **म्हणतात** पोत, **याचें नांव पोत,** म्हणजे **सर्वोत्त**[illegible] या प्रयोगांत श्रीयुतांना कोणीच मायेचा पूत **त्यांचें नांव सांगत** नाहीं **म्हणून** जें गूढ पडलें आहे, तें साफ उलगडलें आहे असें वाटतें. कारण, **'आमची'** प्रत्यक्ष वस्तु पुढें करून 'याचें **नांव पोत' 'पोत याला म्हणतात'** या शब्दांनींच नांव सांगते आहे, याचें **नांव** पोत म्हणजे हें सर्वोत्कृष्ट, अस्सल, जातिवंत पोत. मोरोपंत म्हणतात 'नर रत्न तोचि, तूंचि स्त्री रत्न, उदंड आड नांवाचीं' किंवा 'आहेत मंत्र पुष्कळ, श्रीपासुनि ज्यांत वर्ण तेरा हो' या ठिकाणीं वक्ता वस्तूला निराळें **नांव** देत नाहीं, पण **'याचें नांव'** या शब्दांनींहि आपल्या जातींत **अस्सल, खरा, सर्वोत्कृष्ट,** इतरे नामधारकाः असें ध्वनित करितो. पोरी कधीं कधीं म्हणतात-फुलांत फूल जाईचें फूल' म्हणजे इतर फुलें फुलें नव्हत असा भाव नसून जाईचें फूल त्यांत **सर्वोत्कृष्ट** ऊर्फ नामांकित असा भाव आहे. **'नांव'** शब्दाचा अर्थ, सर्वोत्तम, श्रेष्ठ, उत्कृष्ट हाच होतो. याचीं आणखी उदाहरणें- गामाचें मल्लयुद्धांत सर्वत्र **नांव** झालें, म्हणजे ख्याति, प्रसिद्धि झाली; तो सर्वोत्तम मल्ल असें ठरलें. त्याला पैशाची काय वाण आहे; पण सारी धडपड **नांवा**साठीं–प्रसिद्धि–ख्याति उत्तमत्व.

मराठी भाषेंत नपुंसकलिंगाला सामान्य लिंगाचाहि अधिकार असल्यानें **ज्याचे नांव तें** हा नपुंसकी प्रयोग क्षम्य आहे हें चाणाक्ष वाचकांच्या व जिज्ञासु श्रीयुतांच्याहि लक्षांत येईल. शिवाय ज्याचें नांव तो असाहि पुंस्थानीं प्रयोग कोणी कोणी करितात; त्यानेंहि अर्थहानि होत नाहीं.

**महादेव हरि मोडक.**

---

| | | |
|---|---|---|
| लांकूड-तोडणें | लांकूडतोड्या | लांकडें तोडणारा |
| नाक-तोडणें | नाकतोड्या (कीटकविशेष) | नाक तोडणारा |
| प्राण-घेणें | प्राणघेण्या | प्राणघातकी |

कित्येक अ-कारान्त गुणविशेषणांचीं आ-कारान्त रूपेंहि आढळतात, पैकीं पण-पणा-प्रत्ययापूर्वी अ अविकृत राहतो, आणि आ-चा ए होतो. उदा०—

| | |
|---|---|
| गोड-गोडपणा | गोडा-गोडेपणा |
| जाड-जाडपणा | जाडा-जाडेपणा |

यांप्रमाणेंच चोखट-चोखटें, तुरट-तुरटा, इत्यादि जोड्या समजाव्या.

दासबोधांत **कळकटा** हें विशेषणहि प्रत्यक्ष आलें आहे. ज्यासीं त्यासीं **कळकटा**, स्वयें **सदाचा चोरटा, परघातकी घाटामोटा,** वाटा पाडी. (१९।३।९).

या ठिकाणीं 'भांडण करणारा' हा या शब्दाचा अर्थ उघड आहे.

**४ मस्तुती** =मुस्ततीर=बराच अरुंद पण लांबच लांब असा जमिनीचा पट्टा.

**५ च-ज.** चच्या ऐवजीं ज येतो असें कांहीं शब्दांत आढळतें. उदा०—

कुचका-कुजका । खाजकुइली-खाचकुइली । चोचंले-चोजले । बोचकें-बोजकें । जाचला-जाजला टीचभर-टीजभर । मेचकें-मेजकें । ज्ञानदेवींत 'नाराच' (=बाण) शब्द 'नाराज' लिहिलेला आढळतो.—

आणि मन सर्पाची सृष्टी, डोळे **नाराजांची** वृष्टी,
बोले ते वृष्टी इंगळांची. (राजवाडे, ज्ञानेश्वरी १६।२४१).

या न्यायानें षष्ठीच्या चा-प्रत्ययाचा जा होणें स्वाभाविक आहे. आजमितीसहि कांहीं स्थळीं आपण तो वापरीत असतों.—उदा०—

माझा, तुझा, त्याजपासून, तिजकडे, तिजकरीं (तिच्या करीं), इ०. ज्ञानेश्वरीच्या साखरेबोवांच्या प्रतींत एके ठिकाणीं हा प्रत्यय आढळतो—

**ज्वराजेनि** आटोपें रोगी भलतेंसें जल्पे
चावळती संकल्पें जाण ते तैसे. (१६।३६४)

ज्वराजेनि आटोपें=तापाच्या भरानें.

**६ ख** आणि **र, व.** शब्दांत र आणि व एकत्र आले म्हणजे त्यांची आकृति ख-सारखी होते. यामुळें भ्रम उत्पन्न होऊन, कांहीं शब्द चमत्कारिक भ्रष्ट रूपांत रूढ झालेले दिसतात.

उदा०—

**सुरवाडलें,** खरें रूप **सुखाडलें**=सुखाढ्य झालें.

**रवंदळ,** खरें रूप **खंदळ**=कंदळ, युद्ध.

**अंबुखा,** खरें रूप **अंबुरवा**=पाण्याचा कण.

[ मोक्षमार्गाकडे जयाचा **आंबुखा** पडे न निघे म्हणौनि बुडे संसारीं जो.—कुंटे व साखरे ज्ञानदेवी १६।२६१]

**गोखामाजीं,** खरें रूप, **गोरवा**माजीं=गौरवामध्यें, मोठेपणांत.

[ म्हणे ईश्वरातें खाए, तेया वेदा कायी विष तुए ? **गोखामाजीं** त्रागे भंगितसे.—-राजवाडे व साखरे ज्ञानदेवी १६।२३१.]

वा. अ. भिडे.

३

**सवरात**:—त्याला फार सवरात सुटला आहे अलीकडे. ह्याच शब्दाचें 'स्वरात' असेंहि रूप कधीं कधीं आढळतें. हा शब्द शुद्ध संस्कृत 'स्वार्थ' शब्दाचाच अपभ्रंश आहे. स्वार्थ-स्वारथ-स्वारत-सवारत-सवरात.

**पडसें, परसें** = (संस्कृत) प्रतिशीन = पडिशीन-पडसें (श्यै = शुष्क होणें, गोठणें).

**नवरी, नोवरी** = (सं०)नववरिका (वृ = वरणें )-नोवारिका-नोआरिआ-नवरिआ-नवरी.

**नवरा** = (सं)नववरः- नोवरा.

**पाद्‌डणें** = (सं०)प्रद्रु = पळून जाणें.

**वरंड** = (सं.)वरंड(भाताची रास) रास (गवताचा भाराहि) (व्हरांडा हा इंग्रजी शब्दहि ह्याच मूळापासून), उतरण (वरंघळणें), भिंत (वरंड बांधली).

**वोडण** = बुद्, (वोद्) ह्या सं. धातूपासूनच व्युत्पादणें योग्य दिसतें. बुद् ( वोद् ) ह्या धातूचा अर्थ ऐकणें, पहाणें, समजणें, ओळखणें असे अनेक आहेत आणि बुध् धातूचेच हे सर्व अर्थ असल्यानें बुध् जागृत करणें, जागवणें हाहि अर्थ ह्या बुद धातूस असणें संभवनीय आहे. ह्या वोडणांतून कित्येक प्रसंगीं कोणातरी सुवासिनीच्या अंगांत देवी जागृत करण्यांतहि येत असते. अवसर येणारी सुवासिनी बाई वोडणास शक्य तर बोलावण्याचा आणि तिच्याकडून इष्ट प्रश्नांचीं उत्तरें ऐकून घेण्याचा प्रघात आहे. **मोटन** म्हणून जो एक पर्याय ह्या वोडण शब्दाचाच रा. चाफेकर दर्शवितात तो तर शुद्ध संस्कृत शब्दच आहे. त्यांत मूळ धातु मुट् (मोटति-मोटयति) असा असून त्याचे अर्थ चूर्ण करणें, चिरडणें, मोडणें असे आहेत. आणि मोटन शब्दाचा वारें असाहि अर्थ आहे. मोटनाची क्रिया अन्न, पक्कानें चिरडण्याची, कालविण्याची, त्यांचि मूळचे आकार मोडण्याचो, चूर्ण, पीठ करण्याचीच असते. आणि त्यांत अवसर, वारें येत असतें.

नारायण कृष्ण गद्रे

---

# स्त्रियांच्या म्हणी

माझ्या भगिनी श्रीमती बाळूताई खानवेलकर यांच्या तोंडून जातां येतां मोठ्या म्हणी ऐकण्या त्या मला नवीन वाटल्यामुळें त्यांचा संग्रह करून आपणांकडे पाठवीत आहें.

( १ ) असेल तें विटवा, नसेल तें भेटवा.
( २ ) बोलण्यांत पट्टराघू, कामाला आग लागू.
( ३ ) तुम्ही करा वटवट, मी आहें निगरगट्ट.
( ४ ) मिठाची वाण, लोणच्याची घाण.
( ५ ) फाडी तिला साडी, तगवी तिला भगवी.
( ६ ) पायलीची सामसूम, चिमट्याची धामधूम.
( ७ ) संसार केलन् घाईघाई, म्हातारपणास कांहीं नाहीं.
( ८ ) अकाबाईच्या म्हशी, बकाबाईला उठाबशी.
( ९ ) धुवावें तितका मळ, भांडावें तितकी कळ.

# शब्दसंग्रह.

१

साहित्यपत्रिकेच्या पहिल्या अंकांत शब्दसंग्रह या लेखांत बैलगाडीसंबंधानें जे शब्द दिले आहेत त्यांत आमचे माहितीप्रमाणें खालीं लिहिल्याप्रमाणें अधिक भर घातली पाहिजे.

साटीचे विवरणांत आपण ज्यांस पोटखुंटे असें नांव दिलें आहे त्यांस तडशे असेंहि म्हणतात. एकवचन तडशा.

धुऱ्या यास धुरांडखुव्या असेंहि म्हणतात.

**डोंवाळयाचा दोर**:— साटी व ढेवरें धुरांडीवर बांधण्याचा दोर.

**डोंवाळा**:—साटी व ढेवरें यांतून धुरांड्यांस जो दोर बांधला जातो तो दोर घट्ट करण्याकरतां साटीपासून जोकडापर्यंत जाड काठी अगर रीप बांधतात ती.

**चाक क्रमांक ५**:—सरी. हीस आटाहि म्हणतात.

**चाक क्र० ७**:—कानखीळ हीस कुणि असेंहि म्हणतात. चाक आसांतून पडूं नये म्हणून आंसाच्या टोकाला भोक पाडून त्यांत ही घालतात.

**ढकली**:—उतरणीवर गाडी घसरून बैलांचे अंगावर येऊं नये व संथपणानें ओढतां यावी याकरतां चाकास मागें लाकूड बांधतात तें.

**घट**:—गाडींत बारदान भरतांना गाडीचा मागें तोल जाऊं नये म्हणून मागील बाजूस जमिनीपासून साटीचे बावखंडास टेकून पुढच्या शिपायाप्रमाणें उभें करावयाचें दुबेळक्याचें लाकूड.

**डाळ**:—गवत अगर पेंढा रचल्यामुळें गाडी उलटूं नये म्हणून साटीहून सुमारें दोन हात रुंदी वाढवून दुसरी दांडकांची चौकट साटीवर बांधतात ती.

**पिळकावणें**:—जोकडास बांधलेला नाडा पीळ भरून घट्ट करण्याचें दांडूक.

**रामचन्द्र वासुदेव सोमण,**
(मोहपाडा, जि. कुलाबा).

२

आपण पत्रिकेच्या पहिल्या अंकांत शब्दसंग्रह या मथळयाखालीं 'गाडीचे अवयव' दिलेले आहेत. त्यास पुरवणी म्हणून कुलाबा प्रान्तांतील अष्टागर टापूंत व्यवहारांत असलेले कांहीं शब्द देत आहें. आपल्या शब्दसंग्रहांत ज्या वस्तूंचे शब्द आले आहेत, त्याच वस्तूंच्या दर्शक शब्दांपुढें आपण दिलेले शब्द प्रतिशब्द म्हणून दाखविले आहेत. अगदीं नवीन शब्दांचे मात्र अर्थ खुलाशानें दिले आहेत.

**बावखड**-बावखंड. बाहु+काष्ठ. साटीचीं दोन बाजूंचीं लांकडें.

**दांडी**-धुरांडी. धुर्+दांडी.

**दुर्खीळ**-धुऱ्या. धुर्+कीलक.

**दोरणी**-जुंपणी.

**पट्टा, शिकारी**-अनेक दोरण्या एकत्र विणून केलेलें बैल जुंपण्याचें जाळें.

**वांकें**-पाटे.

**रखे**-अरे.

**कलमदान**-खोबळा.

**बीड, पाग, निवळी**(स्त्री ना.)-कासरा.
**भोंगळें**-आंबवण.
**शिंगोटी**-बैलाच्या शिंगाभोंवतीं बांधलेली दोरी.
**पालवा**-बैलास हांकलण्याकरितां घेतलेली बारीक काठी.
**खुट्या**-खिळ्या
**मोरकी, म्होरकी**-बैलाच्या तोंडाभोंवती घातलेली फांसाची दोरी.

**बाळकृष्ण अनंत भिडे.**

## व्युत्पत्ति, शंका, चर्चा, इत्यादि.

१ **ढवळा** = ज्यांत एकाद्याची धवल कीर्ति गाइली आहे, असें उत्सवप्रसंगीं (विशेषतः विवाहोत्सवांत) गाण्याचें बायकांचें गीत. महाराष्ट्रांत खेडवळ जातींत ढवळे अजूनहि म्हणतात. गुजराथ प्रान्तांत विवाहोत्सवांत ढवळे म्हणत, टाळ्यांनीं ताल धरीत, रंगणांत नाचण्याची बायकांची चाल पुष्कळ आहे.

२ **आठवर**-ज्यांचा विवाहयोग्यकाळांत नुकताच प्रवेश झाला आहे त्यांना नव+वर म्हणजे नोवरा-नवरी असें म्हणतात. विवाहयोग्य काळ सुरू होऊन अर्धवट गेला तरीहि ज्यांचा विवाह झाला नाहीं त्यांना अर्धवर म्हणजे आडवर किंवा आठवर म्हणतात. पुढील शब्दांत 'अर्ध' शब्दाचें अड किंवा आड असें रूप झालेलें आढळतें-आडवाप्या, आडवायको, आडगांव, आडखोल (अर्धवट खणलेली किंवा बांधलेली विहीर), आडका (अर्धा पैका), अडकी (अर्धी पै). 'ड' व 'ट' याची उलटापालट पुष्कळ शब्दांत आढळते. शिवाय, 'ढ' व 'ठ' अशीं त्या वर्णांचीं सघोपरूपेंहि व्यक्तिपरत्वें किंवा प्रान्तपरत्वें त्यांच्याऐवजीं येत असतात. उदा०- पुट, पुड । पडळ, पटळ । अटकणें, अडकणें । आठवण आटवण । साठीं, साटीं । कुटकन्, कुडकन् । ठेव, टेव । काठी, काटी, काडी । पाडशी, पाटशी (गाय वगैरे) । हठयोग, हट्योग । साटी, साठी (गाडीची) । वरिष्ठ, वरिष्ट । नाठाळ, नाटाळ । इ०

३ **कळकटेपणा**-मराठींत अकर्मक क्रियापदापासून 'या' प्रत्ययानें गुणविशेषणें सिद्ध होतात. नामाच्या लिंगाप्रमाणें यांचें रूप आ (या)-इ-एं-कारान्त होतें. उदा०-

| क्रियापद | विशेषण | अर्थ |
|---|---|---|
| रोडणें | रोड्या | रोडलेला |
| बाटणें | बाट्या | बाटलेला |
| भरकटणें | भरकट्या | भरकटलेला |
| नव-शिकणें | नवशिक्या-का | नुकताच शिकलेला |
| कान-फाटणें | कानफाट्या-टा | कान फाटलेला |
| डोळे-फुटणें | डोळेफुट्या | डोळे फुटलेला |
| **कळकटणें** | **कळकट्या-टा** | **कळकटलेला** |

आ-कारान्त विशेषणांना पण-पणा हे प्रत्यय लागतांना, आ-चा ए होतो. अशा रीतीनें कळकटापासून '**कळकटेपणा**' हें रूप सरळ गळीं उतरतें.

सकर्मक क्रियापदांना हाच 'या' किंवा 'आ' प्रत्यय लागून कर्तृत्ववाचक विशेषणें तयार होतात. उदा०-

| | | |
|---|---|---|
| गोड-बोलणें | गोडबोल्या | गोड बोलणारा |
| वाट-मारणें | वाटमाऱ्या | वाट मारणारा |
| धसाडणें | धसाड्या | धसाडणारा |
| हुमणें | हुम्या | हुमणारा |

कित्येक अडचणी येतील हें उघड आहे. सर्वांत मोठी अडचण म्हणजे या नियतकालिकांचे पहिल्यापासूनचे सर्व अंक मिळण्याची मुष्किल ही होय. मुंबईच्या किंवा ठाण्याच्या ग्रंथसंग्रहालयांत कांहीं नियतकालिकांचे सट मिळतात पण बऱ्याचशा नियतकालिकांचा नामनिर्देशापलीकडे पत्ता लागत नाहीं. तर महाराष्ट्रांत आणि मराठी भाषा चालू असलेल्या सर्व प्रदेशांत मराठी नियतकालिकांच्या फायली व सट जेथें जेथें असतील तेथून ते मिळविण्याची खटपट महाराष्ट्र-साहित्य-परिषद, मराठी ग्रंथसंग्रहालय, वाङ्मयसेवामंडळ अशा संस्थांनीं सहकारितेनें केली पाहिजे. हीं जुनीं मासिकें व वर्तमानपत्रें मिळवण्यासाठीं तीं देणाऱ्यांनीं किंमत मागितली तर ती शक्य तेवढ्या रास्त रीतीनें देण्याचीहि व्यवस्था झाली पाहिजे. मध्यंतरी रजिस्टर झालेल्या वाचनालयांतून कांहीं वर्तमानपत्रें वगैरेंना मज्जाव झाला. त्या वेळीं त्या वर्तमानपत्रांच्या पूर्वीच्या फायलीहि तेथून काढण्यांत आल्या आणि अशा प्रकारें बऱ्याच जुन्या फायली मिळणें फार कठीण झालें आहे. अशा कांहीं जबर अडचणी आहेत तथापि जबाबदार संस्थांतील कार्यकर्त्या माणसांनीं हें कार्य करण्याचा निश्चय केल्यास या अडचणींतून पार पडण्याचें त्यांना अशक्य होईल असें नाहीं. महाराष्ट्रसाहित्य-परिषदेचें त्रैमासिक आतां सुरू झालेलें आहे. त्याला चांगलें पाठबळ मिळाल्यास त्याच्या संपादकांना हें काम करून घेतां येणार नाहीं असें नाहीं. या विषयासंबंधीं थोडीबहुत चर्चा व्हावी म्हणून हा लेख लिहिला आहे. त्यांतील मुख्य गोष्टीला उपकारक अशा सूचना आल्यास मला आनंद होईल. मी केवळ सर्वांच्या नजरेला ही गोष्ट यावी म्हणून कांहीं विचार पुढें ठेवले आहेत. एकंदर कार्य उत्तमपणें होण्यासाठीं कोणते उपाय मुक्रर करावेत यासंबंधीं निर्णय देण्याचें काम अर्थात् मजपेक्षां कार्यकर्त्या व विद्वान मंडळींचें आहे. या लेखामुळें त्यांचें लक्ष्य या विषयाकडे वळावें एवढीच माझी इच्छा आहे.

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची पूर्वपीठिका

(लेखक- **नारायण कृष्ण गद्रे.**)

साहित्यसंमेलनाची कल्पना प्रथम लोकप्रसिद्धीस आली ती शके १८०७ (इ. स. १८८५) त पुणें येथेंच आली. त्या वर्षी तेथें पहिलें साहित्यसंमेलन भरलें. तत्संबंधीं जें विनंतिपत्र लोकप्रसिद्धीसाठीं निघालें त्यावर नीळकंठराव कीर्तने, माधवराव कुंटे, हरिभाऊ दामले, काशिनाथपंत मराठे, नाना योगी, व्यंकटराव बाबा वकील अशा व्यासंगी, विद्वान् आणि थोडेंफार सरळ मराठी गद्य-पद्य लेखक सद्गृहस्थांच्या नाममुद्रा होत्या. "नव्या व जुन्या ग्रंथांचें संगोपन, संशोधन, व प्रकाशन या गोष्टी करण्याकडे लोकांचें लक्ष वेधावें, साहित्यव्यासंगी लोकांच्या अडचणी व अनुभव एकमेकांस सांगण्यास संधि मिळावी " असा संमेलनाचा उद्देश होता. या पहिल्या संमेलनांत माधवरावजींनींच मागील चाळीस वर्षांतील मराठी ग्रंथांचें तुलनात्मक सिंहावलोकन केलें होतें. 'दक्षिणा प्राइझ कमिटीचें' काम अधिक व्यवस्थित व फलदायी करावें असें पुण्यांतील मंडळीस वाटत असल्यानें त्याही गोष्टीची चर्चा त्यावेळीं झाली. त्या चर्चेचें फल पुढें नऊ वर्षांनीं डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटी या नांवाची संस्था आस्तित्वांत येण्यानें मिळालें. नवीन ग्रंथांचें परीक्षण करून त्यांतील कांहींना बक्षिसें देणें, निवडक इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करविणें; आणि पेशवेदफ्तर तपासून त्यांतील उपयुक्त लेखांचें प्रकाशन करणें हीं कामें ह्याच

संस्थेमार्फत होऊं लागलीं. परंतु ज्या साहित्यसंमेलनाच्या नऊ वर्षांपूर्वी लावलेल्या रोपट्यास हें फळ लागलेलें दिसलें तें साहित्यसंमेलन मात्र सन १९०६ पर्यंत वीस वर्षांत कांहीं पुण्यास फिरून भरलेलें दृष्टीस पडलें नाहीं ! शके १८२८ (स. १९०६) त प्रथमदर्शनानंतर २१ वर्षांनीं (महाराष्ट्र) साहित्य-संमेलन, शके १८२७ सातारा येथें पुनरुज्जीवन मिळून पुणेकरांस दुसऱ्यांदा दर्शन देतें झालें. सातारा येथें जें ह्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनास नवें जीवन मिळालें तें अनेक कारणांनीं संस्मरणीय आणि बरेच टिकाऊहि झालें. हें जीवन देणारे गृहस्थ म्हणजे सुप्रसिद्ध लोकप्रिय चरित्रलेखक, मासिकपुस्तक-संपादक, इतिहास संशोधक पारसनीस होत. हे आपल्या झांशीच्या राणीच्या विस्तृत आणि वाचकांस चटका लावून सोडणाऱ्या अशा चरित्रपुस्तकानें चांगलेच प्रसिद्धीस आले असून सामान्य तरुण साक्षरापासून तो विद्वद्वर्य पोक्त आणि वृद्ध पंडितापर्यंत सर्वांच्या आदरास पात्र झाले होते. सातारा हीं पूर्वस्वराज्याची राजधानी. त्या पूर्वस्वराज्याच्या राजमंडळाशीं आणि राजकारणांशीं ज्या पारसनीस कुलाचा पिढीजाद जिव्हाळयाचा संबंध त्या पारसनीस कुलांत जनन आणि ह्या नैसर्गिक पूर्वानुकूलतेंत ऐतिहासिक लोकप्रिय चरित्रलेखनादि प्रयत्नांची भर पडल्यानें पारसनीस ह्यांस एक प्रकारचें पुढारीपण सहजच प्राप्त झालें होतें. त्या पुढारीपणाचा योग्य वेळीं कसा उपयोग करावा हें ओळखून त्यांनीं जो हा साताऱ्यास महाराष्ट्र-साहित्यसंमेलन भरविण्याचा अभिनव प्रयत्न केला त्याचा परिणामहि पूर्वींपेक्षां अधिक फलदायी झाला नसता तरच नवल वाटण्यास कारण होतें. परंतु समाधानाची गोष्ट कीं ह्या वर्षापासून पुढें ह्या साहित्यसंमेलनरूप रोपट्यानें चांगलाच टिकाव धरला आणि तें वारंवार फलें धरावयास लागलें. कोणत्याहि फळझाडाचीं पहिलीं पहिलीं फळें मोठीं आणि रमणीय त्याचप्रमाणें बहुसंख्य अशीं त्यावर लागतांना दिसलीं तरी तितकीं तीं उतारवयास आणि पिकवून आस्वाद घेण्यास सांपडतातच असें नसून उलट त्यांतील वरीच वारा, पाऊस इत्यादींच्या मारानें गळतात आणि शेवटीं एखाद दुसरेंच पक्क होतें.

साताऱ्याच्या संमेलनाचे अध्यक्ष रा. रा. रघुनाथ पाण्डुरंग करंदीकर हे होते. ह्या प्रसंगीं विशेष उपयुक्त किंवा कल्पकतेचे असे कोणते ठराव झाले ह्याचा स्पष्ट उल्लेख कांहीं आज करितां येण्यास साधनें नाहींत; आणि तसे कांहीं विशेष संस्मरणीय ठराव तेथें झाले असतील असें मानण्यासहि फारसा आधार नाहीं. त्या संमेलनाचे अध्यक्ष कांहीं स्वतः साहित्योत्पादक किंवा साहित्याचे नितान्तवाचक म्हणून त्या वेळपर्यंत तरी लौकिक असणारे असे नव्हते. तथापि तेव्हां काय किंवा आजहि काय प्रासंगिक स्फूर्तीनें निरुपद्रवी विनोदपूर्ण भाषण-वक्तृत्व करण्यांत मात्र त्यांचा लौकिक चालत आला होता आणि आहेहि. आणि ह्या साताऱ्याच्या संमेलनानें केलेल्या जागृतीनें अथवा झालेल्या पुण्याच्या गर्भित अपमानानें पुणे-करांस विशेष उत्तेजन येऊन त्यांनीं जें तिसरें-स्थानिक दुसरें- संमेलन पुढील वर्षीं भरविलें तें खरोखरच दणदणीत झालें. त्या वेळेस पुण्याचेच एक नागरिक प्रेमळ साहित्यसेवक गोविंद वासुदेव कानिटकर हे अध्यक्षाच्या पदावर होते. हे गद्य पद्य असे दुहेरी सव्यसाची लेखक असत आणि वक्तेहि चांगल्या प्रकारचे होते असें हा लेखक स्वानुभवानें सांगूं शकतो. " मुंबई युनिव्हर्सिटीमध्यें मराठी भाषेचा प्रवेश करविणें, ऐतिहासिक व वाङ्मयात्मक लेखांचा संग्रह करणें, इतिहाससंशोधनास व्यवस्थित स्वरूप देणें, शिलालेखाचें वाचन करणें, आधुनिक कवींचा परामर्ष घेणें, मराठी भाषेचा कोश, विश्वकोश यांसारखे प्रचंड ग्रंथ निर्माण करविणें, इत्यादि उच्च प्रतीच्या विषयांची चर्चा पुण्यास भरलेल्या या दुसऱ्या व एकं-दरीनें तिसऱ्या साहित्य-संमेलनांत प्रथम झाली. **याचवेळीं ( महाराष्ट्र- ) साहित्यपरिषद् या नांवाची कायमची संस्थाहि स्थापण्यांत आली ".** पुढील लागोपाठच्या दोन वर्षांतहि पुण्यासच संमेलनें भरलीं आणि त्यांतूनहि वरीलच सर्व विषयोपविषयांची चर्चा आणि ठराव करण्यांत आले.

साहित्यभक्तांचें सहभोजन-आजच्या सहभोजनाच्या कल्पनेप्रमाणें मात्र नव्हे तर पूर्वीच्या जाति-परत्वें भिन्न भिन्न पंक्तीच्या रूढीप्रमाणें घडविण्याचा उपक्रमहि पुण्यांतील ह्या संमेलनांतच करण्यांत

आला. गद्यपद्यसारस्वतोत्पादकांचीं एकत्र छायाचित्रें काढविण्यासहि येथेंच प्रारंभ झाला. अशीं हीं छायाचित्रें मुंबईच्या मराठी ग्रंथसंग्रहांत ठेवण्यांत आलीं आहेत. ह्या पुण्याच्या संमेलनांत हा लेखकहि जातीनें उपस्थित होता.

स्थापित झालेल्या साहित्य-परिषदेनें पुढें शकाब्द १८२९ आणि १८३० ह्या वर्षींहि पुण्यासच साहित्य-संमेलनें भरविलीं. त्या दोनहि संमेलनांतून जुन्या ठरावांचें दृढीकरण आणि कांहीं नव्या तऱ्हेचें प्रतिपादन व क्वचित एखादा दुसरा नवा ठरावहि करण्यांत येई. पुणें येथील ह्या दोन संमेलनांचे अध्यक्ष अनुक्रमें ( कै० ) विष्णु मोरेश्वर महाजनि आणि रा. चिंतामण विनायक वैद्य असे होते. तथापि साहित्यपरिषदेचें असें कांहीं सतत चालणारें कार्य आणि नियतकालिक इत्यादि गोष्टींस यापुढें प्रारंभ व्हावयाचा तों " हिंदुस्थानांतील राजकारणाच्या वातावरणांत वादळ व उत्पात यांना सुरवात झाली आणि तेव्हांपासून " साहित्य-संमेलनें जीं प्रतिवर्षीं किंवा वर्षा दोन वर्षांआड आणि एकदां तर चवथे वर्षींहि अशीं भरावयास लागलीं तीं सर्व पुण्याबाहेरच कोठेंतरी भरलीं.

६वें-- श. १८३१त बडोदें येथें भरलेल्या संमेलनांचे अध्यक्ष (कै०) कान्होबा रणछोडदास कीर्तिकर.
७वें-- " " ३४ अकोला...........................हरि नारायण आपटे.
८वें-- " " ३७ मुंबई..................................श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन.
९वें-- " " ३९ इंदूर...................................( कै० ) गणेश जनार्दन आगाशे
१०वें-- " १८४३ बडोदें..................................रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर.
११वें-- " " ४८ मुंबई.................................सरदार माधवराव किबे.
१२वें-- " " ४९ पुणें..................................श्रीपाद कृष्ण कोल्हटकर
१३वें-- " " ५० ग्वालेर*..............................रा. रा. माधव श्रीहरि अणे.

या प्रमाणें महाराष्ट्र-साहित्य-परिषद आणि महाराष्ट्र-साहित्यसंमेलनें यांची पूर्वपीठिका आहे.

* ह्या तेरा साहित्यसंमेलनांपैकीं ६, ७, ८, ९, १० आणि बारावें इतक्या संमेलनांचे छापील वृत्तांत मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयांत बघण्यास मिळतात. ते सर्व पुष्कळ बोध देणारे म्हणून अभ्यसनीय आहेत. ( ना. कृ. गद्रे. )

---

# तेरावें महाराष्ट्र-साहित्यसंमेलन

( ले. यशवंत रामकृष्ण दाते )

पुणें येथें बारावें साहित्यसंमेलन झालें त्या प्रसंगीं नेहमींप्रमाणें समारोपाच्या वेळीं पुढील साहित्य-संमेलनास आमंत्रण द्यावयाचा औपचारिक विधि असतो त्यावेळीं ग्वाल्हेर व नाशीक या दोन ठिकाणची मंडळी पुढें आली. साहित्यसंमेलनाचा मागील इतिहास पाहिला म्हणजे जेथें अनेक वर्षांचे मोठमोठे खंड

दिसतात, तेथें एकाच प्रसंगीं दोन आमंत्रणें आलेलीं पाहून मंडळास सानंदविस्मय वाटला यांत शंका नाहीं. मुंबईस अकरावें साहित्यसंमेलन बडोद्याच्या दहाव्या संमेलनानंतर पांच वर्षांनीं व मोठ्या मारा-कुटीनें भरलें. त्यानंतर पुढील वर्षीच पुण्यास बारावें समेलन होऊन लगेच तेरावें संमेलन भरविण्याची लोकांची उत्सुकता पाहून सर्वांसच आनंद वाटला. अखेरीस ग्वाल्हेर व नाशीक यांपैकीं आमंत्रण कोणाचें स्वीकारावयाचें याबद्दल चर्चा होऊन ग्वाल्हेर हें बृहन्महाराष्ट्रांतील व उत्तरेच्या सीमेवरचें ठिकाण असल्यामुळें व सध्यां महाराष्ट्राबाहेर मराठी भाषेचा संकोच होण्याकडे जी प्रवृत्ति वाढत आहे तिच्याकडे लक्ष्य देऊन ग्वाल्हेरचें आमंत्रण स्वीकारणें अधिक इष्ट आहे असें मत व्यक्त करण्यांत आलें. अर्थात् प्रत्यक्ष आमंत्रण कोठील घ्यावयाचें व कोणत्या संस्थेस संमेलन भरविण्यास परवानगी द्यावयाची ही गोष्ट साहित्यपरिषदेच्या अधिकारांतील असल्यामुळें संमेलनाच्या अधिवेशनांत त्याबद्दल निश्चित कांहींच ठरवितां येत नाहीं; पण जमलेल्या साहित्यभक्तांचें मत व्यक्त करतां येतें व तें ग्वाल्हेरच्या बाजूनें असल्याचें स्पष्ट दिसून आलें. असो.

यानंतर रीतसर परवानगी वगैरे घेऊन ग्वाल्हेरच्या माधव-मराठी-वाङ्मय-मंडळानें हें संमेलन भरविण्याचें कार्य अंगावर घेतलें व त्याकरितां पूर्व तयारी सुरू झाली.

स्वागताध्यक्षांच्या जागीं ग्वाल्हेर येथें पूर्वी मुख्य न्यायाधिशाचें काम केलेले रा. चिंतामणराव वैद्य यांची योजना करण्यांत येऊन कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष सरदार चंद्रोजीराव आंग्रे यांस नेमण्यांत आलें व डॉ. यशवंतराव आपटे, कॅ. मोडक वगैरे चार चिटणीस नेमण्यांत येऊन कार्यास सुरुवात झाली. निरनिराळ्या कार्यांकरितां एकंदर बारा पोटमंडळें नेमण्यांत येऊन त्यांजकडे प्रसिद्धि, हिशेब, लेखन-व्यवसाय, द्रव्यनिधि, उद्यमनगर, भोजन, स्वयंसेवकस्थान, आरास, औषधी, मनोरंजन, चौकशी वगैरे कामें सोंपविण्यांत आलीं.

प्रसिद्धिमंडळामार्फत रा. साकोडे यांनीं महाराष्ट्रांत अनेक पत्रकें पाठवून बरीच जागृति उत्पन्न केली होती.

संमेलन ग्वाल्हेरसारख्या महाराष्ट्रापासून दूरच्या जागीं भरल्यामुळें व त्याच वेळीं जबलपूर येथें हिंदु-महासभा व शुद्धिसभा यांच्या परिषदा असल्यामुळें शुद्ध महाराष्ट्रांतील बऱ्याच मंडळांस उत्सुकता असतांहि हजर राहतां आलें नाहीं. तथापि गोव्यापासून झांशीपर्यंत सर्व प्रांतांतील थोडीबहुत साहित्य-भक्त मंडळी संमेलनांत दृग्गोचर होत होती. परंतु बृहन्महाराष्ट्रांतील मंडळी विशेष आधिक्यानें उप-स्थित झाल्याचें दिसून येत होतें व या दृष्टीनें ग्वाल्हेरीस संमेलन भरविण्याचा मुख्य हेतु जो मराठी भाषे-संबंधीं त्या बाजूस वसाहत करून राहिलेल्या लोकांमध्यें प्रेमवृद्धि करून आपल्या मातृभाषेची जोपा-सना करण्याकडे त्यांची प्रवृत्ति वळविणें तो हेतु बराचसा सफल झाला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

संमेलनप्रसंगीं स्वागताध्यक्षांनीं आपल्या भाषणांत ग्वाल्हेरसंस्थानचें महत्त्व व ग्वाल्हेर शहराचें ऐतिहासिक व इतर दृष्टीनें महत्त्व वर्णन करून मराठी संस्थानांतील सर्वांत मोठ्या संस्थानच्या राज-धानीच्या ठिकाणीं हें संमेलन भरत असल्यामुळें त्याचें महत्त्व वर्णन केलें.

संमेलनाचें अध्यक्षपद वऱ्हाडांतील प्रसिद्ध देशभक्त रा. अणे यांजकडे देण्यांत आलें होतें; त्यांनीं आपल्या भाषणांत अलीकडे प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांची चर्चा केली. त्यांत विशेषतः टिळकचरित्र, मध्ययु-गीन भारत व दिवेकरांनीं प्रसिद्ध केलेलें शिवभारत या तीन ग्रंथांचा महत्त्वाचे म्हणून निर्देश केला. काव्याविषयीं बोलतांना यमक व नियमक कवितेविषयींच्या वादविवादावर त्यांनीं बराच वेळ खर्च केला. यानंतर त्यांनीं शुद्धलेखनासंबंधीं सध्यां चाललेल्या वादविवादाचा व लिपिसुधारणेच्या प्रश्नाचा निर्देश केला. शेवटीं त्यांनीं साहित्यपरिषद सुसंघटित होऊन कार्यक्षम व्हावी अशी इच्छा प्रदर्शित केली.

संमेलनाचें अधिवेशन तीन दिवस चालून नेहमींप्रमाणें बरेच ठराव पास करण्यांत आले. हे ठराव संमेलनाच्या अधिकाऱ्यांकडून आल्यावर प्रसिद्ध करण्यांत येतील. एकंदर पास झालेल्या ठरावांमध्यें बृहन्महाराष्ट्रांतील प्रश्नांविषयीं ठराव बरेच होते व ही गोष्ट ज्या ठिकाणीं संमेलन भरतें त्या ठिकाणीं स्थानिक प्रश्नास महत्त्व दिलें जातें, या सामान्य नियमास अनुसरूनच झाली. खुद्द ग्वाल्हेरसंबंधींच चार पांच ठराव होते. नंतर बृहन्महाराष्ट्रांत मराठी भाषा शिकण्याची सोय व्हावी अशा अर्थाचे कांहीं ठराव असून एक त्या प्रांतांत मराठी नियतकालिक सुरू व्हावें अशा अर्थाचा होता. शुद्धलेखनासंबंधीं रा. केळकर यांनीं अनुस्वारांच्या बाबतींत 'बंडखोरपणा' केल्यामुळें बराच वादविवाद झाला व त्यासंबंधीं निर्णय करण्याचा प्रयत्न करण्याकरितां एक कमिटी नेमण्याचा ठराव पास झाला. पारिभाषिक संज्ञा तयार करण्याकरितांहि एक कमिटी नेमण्यांत आली. याखेरीज युनिव्हर्सिटी व कॉलेजें यांतील अभ्यासक्रमांत मराठीचा विशेष प्रवेश होण्याच्या दृष्टीनेंहि कांहीं ठराव करण्यांत आले व मराठी ही माध्यम म्हणून स्वीकारली जावी अशा अर्थाचाहि एक ठराव करण्यांत आला. यंदां ग्वाल्हेरच्या मंडळींच्या मनांत संमेलन भरविण्यामध्यें मराठी वाङ्मयासंबंधीं कांहीं तरी कायमचें कार्य करावें अशी विशेष इच्छा होती व याकरितां एखादी कायमची संस्था स्थापन करण्यांत यावी असेंहि संमेलनाच्या पुरस्कर्त्यांच्या मनानें घेतलें होतें. या हेतूच्या सिद्ध्यर्थ 'महाराष्ट्रीयशारदामंडळ' या नांवाची एक संस्था स्थापन करावी व तिची घटना वगैरे ठरविण्याकरितां एक कमिटी नेमावी असा एक ठराव पास करण्यांत आला. ही शारदामंडळाची कल्पना आज इंदूरच्या साहित्यसंमेलनापासून लोकांपुढें आहे व त्यानंतर मुंबईच्या संमेलनांत यासंबंधीं बऱ्याच लोकांचीं मनें साशंक असल्यामुळें त्या बाबतींत निश्चयात्मक कार्य करण्यास कोणी आतांपर्यंत धजावत नव्हतें. परंतु यंदां एक कमिटी नेमून त्या कार्यास चालना देण्यांत आली आहे. ग्वाल्हेरच्या साहित्यसंमेलनांत पास झालेल्या एकंदर ठरावांत हाच ठराव विशेष महत्त्वाचा मानला गेला.

काव्यगायनाचा कार्यक्रम एका स्वतंत्र रात्रीं ठेवण्यांत आला होता व त्यावेळीं बऱ्याच कवींनीं आपलीं काव्यें गाऊन दाखविलीं. शेवटच्या दिवशींहि कांहीं कवींस मधून मधून काव्यगायनाची संधि दिली गेली होती. त्याचप्रमाणें संमेलन आटोपल्यानंतर एक आठवडाभर कांहीं निवडक वक्त्यांचीं निरनिराळ्या विषयांवर भाषणें करण्यांत आलीं.

मुख्य संमेलनासंबंधीं एवढें सांगितल्यानंतर इतर अवांतर गोष्टींविषयीं लिहावयाचें म्हणजे ग्वाल्हेरीस साहित्यसंमेलन प्रथमच भरलें असल्यामुळें व अशा तऱ्हेचा महाराष्ट्रीय मंडळीस तेथें जमण्याचा प्रसंग नवीनच असल्यामुळें तेथील जनतेंत एकंदर उत्सुकता अपूर्व दिसत होती व यामुळें संमेलनाची व्यवस्था व आलेल्या पाहुण्यांची बरदास्त फारच उत्तम तऱ्हेनें ठेवण्यांत आली होती. संमेलन चालू असतां पाहुण्यांच्या मनोरंजनार्थ दोन रात्रीं गायनाचा कार्यक्रम ठेवण्यांत आला होता व हिंदी काव्यगायनाचाहि एक कार्यक्रम करण्यांत आला. त्यामुळें महाराष्ट्रीय कवींस हिंदी कवींचा व अर्वाचीन कवितेचा परिचय होण्यास चांगली मदत झाली व श्रोत्यांसहि तुलनात्मक निरीक्षणाची संधि मिळाली. जमलेल्या पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्यांत तेथील लोकांत जणूं अहमहमिका लागली होती त्यामुळें पुराणवस्तुसंशोधन खातें, सेक्रेटरिएट, मिलिटरी खातें वगैरेंनीं पाहुण्यांस मेजवान्या दिल्या व आपलीं कामें दाखविलीं. याखेरीज ग्वाल्हेरच्या आसपास असलेलीं प्रसिद्ध स्थळें पाहुण्यास दाखविण्याची वाहनांसुद्धां सर्व तजवीज करण्यांत आल्यामुळें त्यांस अनेक गोष्टी सहज पाहण्यास मिळाल्या. तथापि ग्वाल्हेरीस जाऊन तेथील बालमहाराजांचें प्रत्यक्ष दर्शन घेण्याची संधि त्यांच्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें कोणासच मिळाली नाहीं याबद्दल सर्वांसच विषाद वाटला. थोरल्या राणीसाहेब मात्र एक दिवस सकाळच्या अधिवेशनास हजर होत्या.

एकंदरींत ग्वाल्हेरचें संमेलन ज्या मुख्य उद्देशानें भरविण्यांत आलें होतें तो उद्देश म्हणजे महाराष्ट्राच्या दूर पसरलेल्या वसाहतींमध्यें मराठी भाषेबद्दलचा अभिमान व प्रेम यांची पुन्हा जागृति करणें व मराठी भाषा व वाङ्मय यांची वृद्धि होण्यास महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत परस्परसंघट्टन व सहकार्य घडवून आणणें तो उद्देश या संमेलनानें बराचसा सफल झाला व त्या दृष्टीनें हें संमेलन अत्यंत यशस्वी झालें यांत शंका नाहीं व याच हेतूनें पुढील संमेलन बेळगांव येथें भरविण्यासंबंधीं आलेलें आमंत्रण मोठ्या आनंदानें स्वीकारण्यांत आलें. अर्थात् सदरहू ग्वाल्हेर येथें संमेलन भरवून तें यशस्वी करण्याचें बरेचसें श्रेय या कार्याकरितां गेलें सबंध वर्ष अव्याहत खटपट करणारे सरदार श्रीमंत चंद्रोजीराव आंग्रे व त्यांचे सहकारी यांस आहे.



# परिषद्वार्ता

## सूचना

### वार्षिक सभा

नियम १९ प्रमाणें परिषदेची वार्षिक सभा ता. ८ जुलै १९२८ रोजीं परिषदेच्या कचेरींत दुपारीं ४॥ वाजतां भरेल. त्यावेळीं अहवाल वाचला जाईल आणि अंदाजपत्रक व हिशेब सादर करण्यांत येतील. तसेंच गेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत ठरल्याप्रमाणें फेरनिवडणुकीच्या आवश्यकतेविषयीं विचार होऊन जरूर तर फेरनिवडणुकी केल्या जातील. शुद्धलेखनाचा विचार करण्याकरतां परिषदेनें कमिटी नेमावी अशी प्रो. पोतदार यांची सूचना आहे ती सभेपुढें मांडण्यांत येईल. शिवाय प्रो. आळतेकर व रा. भिडे यांचे ग्रंथ छापण्यासंबंधानें काय तजवीज करावी याचा निर्णय लावण्याकरतां हीहि बाब सभेपुढें मांडण्यांत येईल. तरी सर्व सभासदांनीं सभेला हजर राहण्याची कृपा करावी.

## ग्रंथकर्त्यांस विनंति

मराठींत दरतिमाहींत प्रसिद्ध होणाऱ्या सर्व लहान मोठ्या पुस्तकांची संपूर्ण यादी महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या अंकांतून प्रसिद्ध व्हावी अशी सर्वांचीच इच्छा असणार व तसें करण्याचें आम्ही योजिलेंहि आहे. तथापि ही गोष्ट सिद्धीस नेण्याचें सर्वस्वी ग्रंथकारांच्याच हातीं आहे. पुस्तक प्रसिद्ध होतांच एक प्रत परिषदेकडे ग्रंथकारानें पाठवून दिल्यास वरील हेतु साधणार आहे. करतां ग्रंथकर्त्यांस अशी विनंति आहे कीं त्यांनीं आपापल्या पुस्तकाची एक प्रत परिषदेकडे तावडतोब पाठविण्यास चुकूं नये.

### कार्यकारी मंडळाच्या सभा

### (जानेवारीपासून तो मे अखेरपर्यंत)

ता. २२ जानेवारी रोजीं म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा भरली होती, त्यावेळीं श्री. बाळकृष्ण अनंत भिडे यांनीं 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अभ्यास' या संबंधीं जी हस्तलिखित प्रत सादर केली आहे ती पत्रिकेंतून छापावी किंवा स्वतंत्र पुस्तकरूपानें छापावी याचा विचार करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली. त्याचप्रमाणें 'महाराष्ट्रसाहित्यपत्रिका' या नांवाचें परिषदेचें त्रैमासिक काढावें व त्याची सुमारें १०० पृष्ठसंख्या असावी असें ठरलें. नवीन नियमावलीचा विचार होऊन ती पास करण्यांत आली. इतर कांहीं बाबतींत विचारविनिमय होऊन सभेचें काम आटोपलें,

त्यानंतर एप्रिल ता. ४ रोजीं परिषदेच्या कचेरींत कार्यकारी मंडळाची सभा भरली होती. तेव्हां साहित्यपत्रिकेच्या अंकासंबंधीं वगैरे चर्चा होऊन किरकोळ कामें झालीं.

---

एप्रिल ता. २८ रोजीं फिरून कार्यकारी मंडळाची सभा भरून रा. ब. पाध्ये यांजकडून आलेली रु. १५०० ची रक्कम खजिनदाराच्या नांवानें बँक ऑफ इंडियामध्यें चालू खात्यांत ठेवावी असें ठरलें. यावेळीं पत्रिकेच्या धोरणाविषयीं चर्चा होऊन नवीन अधिकारी मंडळ निवडावयाचें कीं काय हें ठरविण्यास व जरूर तर नवीन निवडणुकी करण्याकरितां परिषदेची सर्वसाधारण सभा बोलावण्याचें ठरलें. परिषदेच्या कामाकरितां पगारी कारकून नेमून त्यापासून दिवसांतून कांहीं ठराविक वेळ काम करून घ्यावें अशा आशयाचाहि ठराव पास झाला.

---

## सर्वसाधारण सभा

रविवार ता ४ मार्च रोजीं महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची सर्वसाधारण सभा मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या दिवाणखान्यांत सायंकाळीं ४॥ वाजतां भरली होती. सदर सभेचें अध्यक्षस्थान श्रीमंत माधवराव किबे यांनीं मंडित केलें होतें. यावेळीं श्री. ज. र. घारपुरे, पां. वा. काणे, माधवराव बोडस, शिवाजी कृष्ण परुळकर, सुंदरराव वैद्य, ग. त्र्यं. देसाई, दा. प. वैद्य, ना. गो. चापेकर, रा. का. तटणीस, वा. सि. बेंद्रे, रावसाहेब कृ. वि. वझे, श्री. अं. गो. पुणतांबेकर, द. गो. काळे, न. र. फाटक वगैरे सभासद हजर होते. प्रथम मागील झालेल्या बैठकीचा अहवाल वाचण्यांत येऊन तो एकमतानें मंजूर झाला. नंतर श्री. घारपुरे यांच्या सूचनेवरून हजर असलेल्या सर्व सभासदांची कमिटी बनविण्यांत येऊन या कमिटीनें कार्यकारी मंडळानें सुचविलेल्या नवीन नियमांचा विचार केला. त्यांत महत्वाचा व जास्त चर्चात्मक असा नियम ट्रस्टींसंबंधाचा होता. या बाबतींत एका पक्षाचें असें म्हणणें होतें कीं ट्रस्टींची नेमणूकच करण्याची जरूर नाहीं. दुसरा पक्ष असा होता कीं ट्रस्टी हे तहहयात असावेत. तिसऱ्या पक्षाचें असें मत होतें कीं ट्रस्टींची निवडणूक नियमित काळानें करावी व ती दर सहा वर्षांनीं व्हावी. कालावधीनें यावर बरीच चर्चा झाल्यावर पहिला मुद्दा मताला घालण्यांत आला व ट्रस्टी असावे असें बहुमतानें ठरलें. दुसऱ्या मुद्यावर मतें घेतां १८ अनुकूळ व १ प्रतिकूळ अशीं मतें पडून ट्रस्टींची निवडणूकच व्हावी व ते तहहयात नसावेत असें ठरलें. पुढें सदर निवडणूक नियमित कालावधीनें केली जावी व ती मुदत सहा वर्षें असावी असें एकमतानें ठरलें. याशिवाय संमेलन व परिषद, शाखासभा संलग्न, व सहकारी संस्था या बाबतींतहि कांहीं आवश्यक असे नियम करण्यांत आले. या नियमांच्या विचाराचें काम फार वाढल्यामुळें रविवारची सभा सोमवार ता. ५ रोजीं रात्रौ ८ वाजतां पुन्हा भरली होती. त्यावेळीं सर्व नियमांचा विचार झाल्यावर कमिटीचें साधारण सभेंत रूपांतर झालें व हे नियम सदर सभेनें एक मतानें मंजूर केले. त्याचप्रमाणें या सभेनें ट्रस्टींकडून परिषदेच्या कार्याकरितां तातडतोब १५०० रुपयांची मागणी करून ती रक्कम खजिनदारांकडे जमा करावी असें ठरविलें. त्यानंतर ग्वाल्हेर येथें भरणाऱ्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षाच्या निवडणुकीबद्दल तीव्र नापसंती व्यक्त करणारा व तेथील मंडळींनीं या गोष्टीचा फेरविचार करावा अशा आशयाचा ठराव पास होऊन तो ठराव तारेनें अध्यक्षांच्या सहीनें पाठविण्याचें ठरलें. शेवटीं कांहीं पत्रें वाचून दाखविणें व महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेबद्दल विचारविनिमय वगैरे किरकोळ कामें झालीं.

एप्रिल ता. ९ रोजीं ग्वाल्हेर येथें परिषदेची संमेलनाच्या ठिकाणीं सर्वसाधारण सभा भरून श्री. वझे यांची परीक्षेची योजना वाचण्यांत येऊन ती पत्रिकेंतून छापून काढावी असें ठरलें. त्याशिवाय पगारी प्रचारक नेमावे व तहहयात सभासदांची वर्गणी ५० रु. असावी अशा आशयाचे ठराव पास झाले.

## पोंच व अभिप्राय

### मासिकें

लोकमित्र, सद्विचार, महाराष्ट्र सारस्वत, काव्यरत्नावली आणि लोकशिक्षण हीं मासिकें साहित्य-पत्रिकेला भेट म्हणून आलीं आहेत. त्याबद्दल त्या त्या संपादकांचे आम्ही आभारी आहों.

लोकशिक्षणाला महाराष्ट्रांतील नामांकित विद्वानांचें लेखनसहाय्य मिळत असल्यामुळें गहन विषयांची चर्चा करण्याचें हें मासिक अत्युत्कृष्ट साधन झालें आहे. विविधज्ञानविस्तार, चित्रमयजगत्, रत्नाकर यांच्या वर्गांतच लोकशिक्षण पडत असल्याकारणानें महाराष्ट्रांतील वरच्या दरजाच्या वाचकांची सोय यां मासिकानें होणार आहे.

### पुस्तकें

श्रीमाघकाव्य सर्ग १ ३ (त्र्यंबक मोरेश्वर पाढरकर); माझीं फुलें, गुच्छ १ ला (श्री. वा. गाडगीळ). विचारविलास, (वा. म. जोशी): परळीची यात्रा (य. रा. गुप्ते); मंडलिकांचें चरित्र (ग. रा. हवालदार); धार संस्थानचा इतिहास (लेले व ओक).

परळीची यात्रा हें लहानसें पुस्तक पुराणवस्तुसंशोधक य. रा. गुप्ते यांनीं लिहिलें आहे. प्रवास-वर्णन चटकदार आहे. हेमाडपंती देवळांची ओळख करून देणारें पुस्तक या दृष्टीनें रा. गुप्ते यांच्या या कृतीचें महत्त्व फार आहे. तसेंच श्रीसमर्थांचे अस्सल चित्रावरून घेतलेलें छायाचित्र दिल्यामुळें पुस्तकाची उपयुक्तता द्विगुणित झाली आहे. सज्जनगडच्या प्रवासाचें हें चित्ताकर्षक वर्णन तरुणांना आवडल्यावांचून राहणार नाहीं अशी आमची खात्री आहे. (किंमत ४ आणे; पुस्तक ग्रंथकर्त्याकडे खेड येथें मिळेल)

मंडलिकांचें चरित्र, विचारविलास व धार संस्थानचा इतिहास यांवर अभिप्राय पुढच्या अंकांत येईल.

रा. द्वा. गो. वैद्य यांच्याकडून नवयुगधर्म या ग्रंथावर त्यांनीं लिहिलेल्या टीकात्मक लेखांचें पुस्तक आलें आहे. हें पुस्तक ग्रंथकर्त्याकडे मागितलें असतां फुकट देण्यांत येतें असें त्यांनीं कळविलें आहे.

---

५ प्रो. म. दा. आळतेकर
६ रा. रा. वा. गो. आपटे
७ रा. ब दा. ग. पाध्ये
८ रा. रा. वसंत नारायण नाईक
९ प्रो. द. वा. पोतदार
१० प्रो. श्री. नी. चाफेकर
११ रा. रा. कृ. प्र. खाडीलकर
१२ रा. रा. ना. के बेहेरे
१३ रा. रा. दाजी नागेश आपटे
१४ " " नी. के. भवाळकर
१५ रा. ब. रा. वि. महाजनी
१६ रा. रा. म. त्रिं पटवर्धन
१७ प्रो. अब्दुल कादर सर्फोज
१८ रा. रा. कृ. वि. वझे
१९ प्रो. वामन मल्हार जोशी
२० प्रो. ल. वा. देव
२१ रा. रा. द. ग. दळवी
२२ –"– इझीकेल सालेमन
२३ –"– जी. व्ही. मावळणकर
२४ –"– जी. व्ही. लाड
२५ –"– ग. त्रिं. कोल्हटकर
२६ प्रो. वा. गो. मायदेव
२७ रा. रा. रा. का. तटणीस

**हिशेब तपासनीस**

रा. रा. जिवाजी कृ. परळकर

**ट्रस्टी**

रा. रा. एन् वी. भाटवडेकर        रा. ब. दा. ग. पाध्ये

**हिशोबाचा तक्ता**

( जानेवारी ते मे अखेर पर्यंत )

**जमा**

६०–०–० सभासदांची वर्गणी.
रा. दाते व फाटक यांच्याकडे कांहीं वर्गणी आली आहे ती. याशिवाय )
रा. ब. पाध्ये यांजकडून आलेली रक्कम
१०००–०–०
५००–०–० " " "
१५६०–०–० एकूण

**खर्च**

रु.
३८३ पहिल्या अंकाचा खर्च.
२०० रा. अळतेकर यांस ग्रंथलेखनाबद्दल
९२-९–० किरकोळ छपाई (विशेषतः दुरुस्त नियमांचीं पुस्तकें )
११-१४-३ कचेरीचें सामान
२८–८–० टपालखर्च
८–१–० रेल्वेखर्च ( पुण्याहून मुंबईस अंक पाठविण्याचा
७२४-०-३

